मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

# बाळमित्र.

## भाग १.

हा ग्रंथ

बर्किनकृत मूल ग्रंथाच्या इंग्रेजी भाषांतराच्या आधारें



**सदाशिव काशीनाथ छत्रे**

ह्यांनीं मराठींत उतरला, त्याची आवृत्ति



मूल प्रतीवरुन शुद्ध करुन

**रा. रा. श्रीकृष्णशास्त्री तळेकर**

**माजी मराठी ट्रॅन्सलेटर, शाळाखातें, ह्यांनीं तयार केली.**

---

चवथी आवृत्ति.-३,००० प्रती.

---



मुंबईः
गवर्नमेंट सेंट्रल बुक डीपो.



---

सन १९०२.



---

किंमत ८ आणे.

# सूचना.

मेहेरबान डैरेक्टर आफ पब्लिक इन्स्ट्रक्शन साहेब बहादूर ह्यांनीं ह्या पुस्तकाची एक प्रत आमच्याकडे पाठवून तिची पुनरावृत्ति काढण्याकरितां ती नीट करावी म्हणून कळविलें. जी प्रत आमच्याकडे पाठविली ती रा० रा० नारायण विश्वनाथ शास्त्री, हेडमास्तर सरकारी मराठी शाळा लोहारचाळ, मुंबई, ह्यांनीं तपासलेल्या प्रतीच्या दुसऱ्या आवृत्तीची होती. रा० रा० नारायणशास्त्री ह्यांनीं आपल्या तपासलेल्या आवृत्तीच्या आरंभीं जी सूचना दिली होती ती एणेंप्रमाणेंः—

"एतद्देशीय वाचणारे लोक हे, बाळमित्र भाग १ ह्याच्या 'तपासून शुद्ध केलेल्यां' पेक्षां जुन्या प्रती पसंत करितात, असें समजुतींत येऊन मीं (खालीं सही करणारानें) मेहेरबान डैरेक्टर आफ पब्लिक इन्स्ट्रक्शन साहेब ह्यांची परवानगी घेऊन मूळ ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढिली आहे. ह्यांत सर्व मराठी भाषेचे मर्मज्ञ पसंत करितील अशा मात्र चुक्या नीट केल्या आहेत."

हल्लींच्या आवृत्तींत जें नीट केलें आहे तें मुख्यत्वेंकरून मराठी भाषेच्या भाषणपद्धतीविषयींचें आणि मधून मधून कोठें कोठें जे अयोग्य शब्द आले होते त्यांविषयींचें आहे. ह्या बुकाची मराठी भाषा इंग्रजी भाषेच्या पद्धतीवर फार होती, ती आतां पुष्कळ फिरवून नीट केली आहे.

**श्रीकृष्ण शास्त्री.**

---

## दुसऱ्या आवृत्तीची सूचना.

ह्या नवीन आवृतींत, पूर्वींच्या आवृत्तींत नजरचुकीनें राहिलेल्या अल्पस्वल्प चुका दुरुस्त केल्या आहेत; तसेंच हल्लींच्या मराठी भाषेच्या रीतीस न शोभणारे जे भाषणसंप्रदायाचे प्रकार कोठें कोठें आढळले तेही सुधारून नीट केले आहेत.

**रा० स० गो०.**

# प्रस्तावना.

## ( छत्र्यांची )

जे मुलांच्या शिक्षारूप ग्रंथांविषयीं परिश्रम करितात, त्यांस यद्यपि इतर ग्रंथकर्त्यांसारिख्या कीर्तीचा लाभ होत नाहीं, तथापि वास्तविक पहातां असें वाटतें कीं, असल्या कवींचे ग्रंथ मोठमोठ्या काव्यांहून अधिक उपयोगी व अधिक उपकारक आहेत. लहान मुलांस मर्यादा व सद्गुण लावणें; त्यांस कुमार्गापासून राखणें; त्यांस ज्ञानाचें खाजें देणें; आणि त्यांची बुद्धि विचारक्षम करणें; ह्यांविषयीं उद्योग करणें महापंडितांसही योग्य होय. अल्पमति आहेत ते मुलांची प्रवृत्तिनिवृत्ति, त्यांचें खेळणें, रुसणें, त्यांचे हर्षविषाद इत्यादि गोष्टी आपल्या मनास आणायास योग्य नाहींत म्हणून म्हणोत; परंतु ज्यांची लोकहितावर दृष्टि आहे, जे दीर्घदृष्टीनें जाणतात कीं, एका मनुष्याच्या सत्कर्मदुष्कर्मानें सगळ्या सृष्टीचा फेरफार होत असतो, ते मुलांच्या ठायींही सद्गुणदुर्गुण पाहून त्यांच्या विचारांविषयीं अनास्था करीत नाहींत. पहाणारे होते त्यांनीं शिकंदर बादशाह मूल होता, तेव्हांच त्याच्या बुद्धींत व्यापकता पाहिली. पुढें त्यानें सर्व पृथ्वीचीं राज्यें उलटपालट केलीं. शरीर तर सर्वांचें तेवढेंच, पण त्यांतल्या रहाणारांची योग्यता भिन्नभिन्न आहे; ती बहुतकरून लहानपणापासून बऱ्यावाईट शिक्षेप्रमाणें परिणामास पावते; म्हणून मनुष्यांचें भावी स्वरूप उत्तम शिक्षेवर आहे. ह्यासाठीं जो मनुष्य मुलांच्या शिक्षेकडे आपल्या गुणांचा व्यय करितो, त्याचा परिश्रम किती स्तुत्य म्हणावा !

ह्या ग्रंथकर्त्यानें दोन गोष्टी मनांत आणून हा ग्रंथ केला आहे; एक तर मुलांचें रंजन; आणि दुसरें, त्यांस सद्गुण सहज लागावे. प्रत्येक गोष्टींत सदाचरण, सुजनता, ह्यांची प्रशंसा आहे; ह्यांत

मोठ्यामोठ्या अघटित घटनेच्या गोष्टी सांगितल्या नाहींत; ज्या मुलांच्या नित्य परिचयांतल्या, त्याच सांगितल्या आहेत. त्यांस जे सद्गुण लागावे म्हणून योजिले आहेत, ते त्यांच्या सामर्थ्याबाहेर नाहींत. गोष्टी सांगितल्या आहेत, त्या त्यांच्या सारिख्या मुलांच्या; त्यांच्या खेळगड्यांच्या; त्यांच्या आईबापांच्या; त्यांच्या बहीणभावंडांच्या; ज्यांच्याशीं नित्य प्रसंग असतो अशा चाकरांच्या; आणि नित्य पहाण्यांतले जे पशु त्यांच्या सांगितल्या आहेत. भाषाही बालबोध योजिली आहे. हर्षविषादांचीं कारणें आणि त्यांमुळें त्यांच्या मनांत उत्पन्न होणारे विकार, हे स्पष्ट दाखविले आहेत. त्यांच्या अन्यायाचे जे वाईट परिणाम तेच त्यांच्या बुद्धीस आणून देऊन तीं त्यांचीं पारिपत्यें म्हणून सुचविलें आहे; आणि सदाचरणानें जें मनास समाधान उत्पन्न होतें, तेंच त्यांच्या सत्कर्माचें फळ म्हणून सांगितलें आहे. एथें जें जें सांगितलें आहे, त्याचा उद्देश, त्यांनीं सदाचरण हें सर्व सुखाचें साधन म्हणून त्यावर प्रीति करावी, आणि दुराचरण हें सर्व दुःखांचें आणि पश्चात्तापाचें उत्पत्तिस्थान म्हणून तें वर्जावें, असा आहे.

हा ग्रंथ मुली आणि मुलगे ह्या उभयतांसही उपयोगी आहे; आणि हा दोहोंस उपयोगीं पडावा, म्हणून दोहोंचे प्रसंग एकत्र आणून गोष्टी योजिल्या आहेत. प्रत्येक गोष्टींत भिन्नभिन्न प्रकार दाखविले आहेत. अनेक सद्गुणदुर्गुणांची प्रशंसा किंवा निंदा गोष्टींच्या प्रसंगानें आणिली आहे. बहुतेक गोष्टींचे मुलांच्याठायीं अनुभवही घेऊन पाहिले आहेत. कोठें कोठें नाटकें योजिलीं आहेत; त्यांवरून त्यांस हावभावयुक्त निर्भीडपणानें चौघांत बोलतां यावें असा उद्देश आहे; लज्जेनें तोंड मुरडतात तें मुरडूं नये. पात्रांत आईबापेंही मिश्रित केलीं आहेत, तेणेंकरून मुलांचे आनंद भोगायास त्यांसही सवड दिली आहे.

हा ग्रंथ मुलांस पढविल्यानें त्यांस लहानपणापासून अनाया-सानें बोलायाचा अभ्यास होईल; त्यांचा शब्दसंग्रह वाढेल; त्यांस अनेक व्यवहार, अनेक रीति आणि नीति समजतील; बुद्धि सद-सद्विचारक्षम होईल; आणि त्यांचें हृदय कोमल होईल. माता-पितरांच्याठायीं त्यांचें प्रेम वाढेल; बहीणभावंडांच्याठायीं प्रीति वाढेल; ईश्वराच्याठायीं भक्ति वाढेल; आणि पुढें मोठमो-ठाल्या विद्या शिकायास सुगम होतील. सांप्रत त्यांच्या हातीं जे ग्रंथ पडतात, ते त्यांच्या बुद्धींत भरायास अवघड आहेत. ह्या ग्रंथापासून जसा उपदेश मनांत भरेल, तसा अन्य ग्रंथांपासून भरणार नाहीं; ते समजुतीस खोल, अभिरुचीस रुक्ष, आणि उपदेशास कटु असे असल्यामुळें मुलांच्या चित्तांत वाचण्यावि-षयीं व्हावी तशी प्रीति उत्पन्न करणार नाहींत. ह्या ग्रंथांत तसें नाहीं; एथें त्यांची भाषा, त्यांचे खेळ, त्यांचे उद्योग व त्यांचीं अपेक्षितें हीं सांगितल्यामुळें, त्यांस वाचतां वाचतां आवड उ-त्पन्न होऊन इकडे त्यांस न कळत सहज चांगले गुण लागावे म्हणून ह्यास 'बाळमित्र' हें नांव दिलें आहे, आणि तें योग्य आहे.

ह्या ग्रंथाचा कर्ता बर्क्विन म्हणून कोणी महाविद्वान फ्रान्स देशांत होऊन गेला. त्याचे उपकार सर्व विलायतेंत आठ-वित आहेत. त्याच्या वाणींत जो रस म्हटला तो उभा राही; त्याचें वर्णन यथातथ्य आहे; बाल्यांतील मानसिक विकार, रु-चिवैचित्र्य, इत्यादि गोष्टींचें यथातथ्य स्वरूप वर्णन करण्या-विषयीं त्याची मोठी प्रशंसा आहे. त्याचा लेख अचेतनास चे-तना आणितो; आणि ह्यानें आदरिल्यामुळें कोणताही विषय श्रवणयोग्य होतो.

हा बाळमित्र ग्रंथ पूर्वी फ्रेंच भाषेंत होता, त्यांतून इंग्रेजींत आला, आणि त्यावरून मराठींत आणिला आहे. फ्रेंच व इं-

ग्रजी भाषा ह्यांचा विचार करितां, ह्या भाषा आज शेंकडों वर्षे सुधारत आल्या आहेत, त्यांत सर्व विषयांवर ग्रंथ आहेत, आणि त्यांत मनांतील सर्व अभिप्राय शब्देंकरून व्यक्त करितां येतात. ह्या भाषा महान महान बुद्धिमानांना परिचित आहेत, तर असल्या भाषांत जो रस आला आहे, तो रस मराठी भाषेंत कसा येईल? ह्या भाषेंत आज दिवसपर्यंत व्याकरण आणि कोश हे कोणीं केलेच नाहींत, व विद्वान लोकांचें चित्त कधीं रमलेंच नाहीं. ह्या भाषेंत शब्दसंग्रह थोडा असून भाषणांची शैलीही प्रौढ नाहीं. तशांत माझें भाषांतरही यथामति आहे, म्हणून सर्वांनीं कृपा करून ह्यांतील दोषांकडे लक्ष्य न देतां गुणमात्र घेऊन माझी सेवा स्वीकारावी ही माझी प्रार्थना आहे.

---

१ ज्या वेळीं कैलासवासी सदाशिव काशीनाथ छत्रे ह्यांनीं हा ग्रंथ लिहिला, त्या वेळच्या मराठी भाषेच्या स्थितीचें हें वर्णन आहे. आतां ही भाषा पुष्कळ अंशीं उत्तम स्थितीस आली आहे हें सांगणें नको.

# चवथ्या आवृत्तीची प्रस्तावना.

मे० डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन साहेब बहादूर पुणें यांचे परवानगीवरून पुणें ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल रा. सा. काशिनाथ गणेश केळकर यांच्या संमतीनें ह्या आवृत्तींत खालीं लिहिल्याप्रमाणें फेरफार केला आहे.

कांहीं ठिकाणीं शब्द व वाक्यें फार जुनीं असून हल्लींचे संप्रदायांतून गेलेलीं आढळलीं, त्याठिकाणीं तीं कायम राखून त्यांचे स्पष्टीकरणार्थ खालीं, टिपा दिल्या आहेत; तसेंच हल्लींच्या मराठी भाषेच्या भाषणपद्धतीस विसंगत असें जेथें मुळाचें भाषांतर झालें आहे, तेथें तें सांप्रतच्या भाषा–पद्धतीस अनुसरून दुरुस्त केलें आहे; व जेथें इंग्रजी भाषणसंप्रदायाचें केलेलें भाषांतर मराठीसमाजाचे चालीरीतीस धरून न होतां विशोभित, किंबहुना विपरीत झालें होतें, तेथें जरूर तो फेरफार करून शोभेलसें केलें आहे. अर्थदृष्ट्या तसेंच व्याकरण दृष्ट्या चुकलेले शब्द व अशुद्ध रूपें दुरुस्त केलीं आहेत. व कोठें कोठें ग्राम्य व तऱ्हेवाईक शब्द आणि वाक्यें आढळलीं तीं बदलून त्यांचे जागीं योग्य शब्दांची व वाक्यांची योजना केली आहे. व जेथें वगळलेले शब्द अर्थबोधाकरितां घालणें जरूर वाटलें तेथें ते घातले आहेत. छपाईच्या व शुद्ध लेखनाच्या वगैरे चुकाही जागजागीं दुरुस्त केल्या आहेत.

ट्रेनिंग कॉलेज,<br>पुणें, ता० १२ जून.<br>सन १९०१ इसवी.

म० धों० जोशी.<br>व्हाईस प्रिन्सिपॉल.

# अनुक्रमणिका.

# बाळमित्र.

## १. धाकटा भाऊ.

एके दिवशीं सुप्रभातीं, बागांत जाऊन फुलें आणावीं, आणि आई जागी झाली नाहीं तों त्यांच्या माळा करून तीस द्याव्या, म्हणून वेणू उठली आहे आणि माडीवरून खालीं यावयास सिद्ध झाली आहे तों तिचा बाप गोविंदशर्मा तिच्या खोलींत आला; आणि तिला कडेवर घेऊन हसत म्हणाला, "बेटा, तूं माझ्या बरोबर लवकर चल, मी तुला कांहीं मौज दाखवितों; ती पाहून तुला फार हर्ष होईल." वेणूनें मोठ्या उत्कंठेनें पुसलें, "बाबा, ती काय ती मला सांगशील?"

बाप म्हणतो, "मुली, देवानें तुला गेल्या रात्रीं धाकटा भाऊ दिला आहे;" ती म्हणाली, "धाकटा भाऊ! कोठें आहे तो मला पाहूं दे; मला त्याजकडे लवकर ने." मग बापानें तिची आई बाळंत झाली होती त्या खोलीचें दार उघडून तिला आंत नेलें. तेथें बाजेजवळ एक परकी बायको होती, तिला वेणूनें पूर्वीं कधीं घरांत पाहिलें नव्हतें. ती त्या उपजलेल्या लेंकरास बाळंत्यांत गुंडाळीत होती, तें पाहून वेणूनें बापास नानाप्रकारचे प्रश्न केले. त्यांचीं उत्तरें तीस देऊन, बापास वाटलें कीं, आपण तिचें कोड पुरविलें. त्या वेळीं ती आणखीही त्यास पुसूं लागली, "बाबा, ही म्हातारी कोण आहे? पहा, ती कशी माझ्या धाकट्या भावास बांधिते आहे! त्याला ती दुखवील म्हणून तुला भय नाहीं वाटत बाबा?"

**गोविंद०**— तूं भिऊं नको मुली, ही म्हातारी भली आहे; हिला मीं बाळाची जतन करण्याकरितां बोलाविलें आहे.

**वेणू**— पण बाबा हें बाळ माझ्या वयेचें? तिणें ह्याला अजून पाहिलें आहे कीं नाहीं?

**गंगाबाई**— ( बाजेचा पडदा सारून ) होय मुली, मीं त्याला पाहिलें आहे. मला सांग बरें, त्याला पाहून तुला हर्ष झाला कीं नाहीं ?

**वेणू**—होय बये, मला मोठा हर्ष झाला; तूं मला चिमणासा चांगला संवगडी खेळायास दिला; त्याचें तोंड पहा कसें ठक आहे तें! आणि तांबडेंच, जसें कोणी म्हणेल, तो कोठून धावत आला आहे ! बाबा, मी त्यासंगतीं खेळूं !

**गोविंद०**—तें कसें होईल बेटा ? त्याच्यानें उभें रहावत नाहीं; तूं पहा त्याचे पाय किती सुकुमार आहेत ते !

**वेणू**—अरेरे! पाय चिमकुले आहेत खरे! आतां मी समजलें ह्यास मजबरोबर धावायास अजून फार दिवस पाहिजेत.

**गोविंद०**—तें सगळें व्हायाच्या वेळीं होईल; पहिल्यानें तो चालायाला शिकेल, मग तुम्ही दोघें बागांत उड्या माराल आणि खेळाल.

**वेणू**—खरेंच काय ? अरे बाळा, मी तुला कांहीं देतें, म्हणजे तूं माझ्यावर माया करिशील. हें माझ्याजवळ चित्र आहे, घे हें तुला खेळावयास. हें काय बाबा ? हा लबाड घेत नाहीं त्यानें मुठी बळकट मिटून धरिल्या आहेत !

**गोविंद०**—हात कसे करावे, हें त्याला अजून ठाऊक नाहीं; त्यास तें कळायास कांहीं महिने पाहिजेत.

**वेणू**—असें आहे ! अहारे माझ्या धाकट्या! मी तुला आपलीं सगळीं खेळणीं देईन; सांग आतां तूं खुशाललास काय ? मला उत्तर कर. बाबा, तो हसतो. मला वेणू म्हण वेणू ! काय, तूं बोलत नाहींस ?

**गोविंद०**—तो बोले तों अजून दोन वर्षें पाहिजेत. पण वेण्ये, तूं टकळी लावून आईस कंटाळा आणशील हो.

**वेणू**— पहा बाबा, त्याणें मुद्रा अगदीं फिरविली, तो रडत आहे; मला वाटतें कीं, त्यास भूक लागली आहे. रे माझ्या

लहानग्या, उगी तूं उगी ! मी तुला कांहीं चांगलें खायास आणितें.

**गोविंद०**—माझे लाडक्ये, त्याच्या खाण्याच्या खटपटींत तूं पडूं नको. अजुन त्यास दांत आले नाहींत; तो खाईल कसें ?

**वेणू**—त्याच्यानें खाववत नाहीं ? तर तो वांचेल कसा ? त्यानें काय उपाशीं मरावें ?

**गंगाबाई**—नाहीं मुली; त्याकरितां देवानें माझ्या मामूंत दूध दिलें आहे. तो आतां अशक्त आहे, पण कांहीं दिवस गेल्यावर तूं पहाशील तो भुईवर कसा लोळूं लागेल तो.

**वेणू**—तें मी कधीं पाहीन ? पण आई पहा तूं, त्याचें डोकें काय चांगलें गुळगुळीत दिसतें ? त्यास हात लावावयास मला भय वाटतें.

**गोविंद०**—तूं हात लाव हवा तर, पण हळूच लाव हो !

**वेणू**—होय होय ! फार हळु लावतें! अहाहा ! किती तरी मऊ आहे हें ! जसा कापसाचा गोळा !

**गोविंद०**—मुली, लहान मुलांचीं डोकीं अशींच असतात.

**वेणू**—बाबा, जर तो पडला, तर त्याचें डोकें फुटून तुकडे तुकडे होतील नाहीं बरें ?

**गंगाबाई**—ह्यांत काय भ्रांत ? पण आह्मी ह्यास जपून धरीत जाऊं, ह्मणजे तो पडणार नाहीं.

**गोविंद०**—मुली, तुला ठाऊक आहे, पांच वर्षांमागें तूं अशीच लहान होतीस ती ?

**वेणू**—ह्याच्या इतकी लहान? नाहीं बाबा, तूं माझी थट्टा करितोस.

**गोविंद०**—थट्टा नाहीं मुली, मी हें खरेंच सांगतों.

**वेणू**—तर, मला आठवत नाहीं तें ?

**गोविंद०**—तें खरेंच, पण हा हिंदोळा मीं दारीं कधीं टांगला, त्याची तुला आठवण आहे काय ?

वेणू— कां! तो आहे तसाच आहे.

गोविंद०— तसें कसें होईल मुली! तूं ह्या लहान्या बाळाएवढी होतीस त्या वेळीं हा हिंदोळा टांगला आहे.

वेणू— खरेंच काय! तर तें माझ्या लक्ष्यांत कसें राहिलें नाहीं?

गोविंद०— लहानगीं बाळें असतात त्यांस जवळ काय होतें तें समजत नसतें. हा तुझा लहान भाऊ तुझ्याएवढा होईल तेव्हां तूं त्यास आजच्या गोष्टी पूस कीं, "मी त्या दिवशीं तुला नांव घ्यायास शिकवीत होतें, त्याची तुला आठवण आहे?" मग तुला समजेल त्याला आठवतें कीं नाहीं तें.

वेणू—काय? आणि मीही अशीच आईच्या आंगावर पीत होतें?

गोविंद०—होय, ह्यांत काय संशय? तुजकरितां आम्हांला काय काय श्रम पडले आहेत मुली! तूं अशी अशक्त होतीस कीं, तुला कांहीं खाववत नसे; आम्ही प्रतिक्षणीं भिऊं, कीं तूं आतां मरशील. तुझी आई म्हणे, "अगे माझे बापडे, तुझे प्राण घाबरे होतील." असें म्हणून तिनें तुला मोठ्या श्रमानें थोडथोडें आंगावर प्यायास शिकविलें.

वेणू— अहागे माझे बये, तर मला प्रथम खायास तूं शिकविलें, नाहीं?

गोविंद०— होय माझ्या लेंकरा, तुझ्या आईनें तुला आंगावर प्यायास शिकविलें; तेव्हां तुला शक्ति येऊन तूं हसूं खेळूं लागलीस. असे श्रम तिनें तुजकरितां दोन वर्षेंपर्यंत रात्रंदिवस केले. कोणे समयीं, भागवट्यामुळें तुझ्या आईस अमळ नीज लागली असतां, तूं रडून तिला उपद्रव करावा, मग तिनें लगबगीनें उठून तुझ्या पाळण्यापाशीं येऊन म्हणावें, "वेण्ये वेण्ये, बेटा उगी रहा; तुला भूक लागली असेल, माझे बये." मग तिनें तुला आंगावर पाजावें.

वेणू—आणि बाबा, माझेंही डोकें ह्याच्या डोक्यासारखें तेव्हां मऊ होतें?

**गोविंद०**— असेंच होतें माझे लाडक्ये.

**वेणू**— काय! माझें हें डोकें! हें आतां इतकें कठीण आहे हें! ओहो! तसें असतें तर केव्हांच फुटून गेलें असतें!

**गोविंद०**— तें खरें मुली, पण आह्मीं तुला फार संभाळिलें आहे. किती दिवसपर्यंत तुझ्या आईनें सर्व सुखें एकीकडे टाकिलीं, आणि तूं दृष्टीवेगळी होशील ह्मणून कोठें जाणें सोडिलें. जेव्हां जेव्हां तिला कामामुळ तुला सोडून जायाचें पडे, तेव्हां तेव्हां ती तुझी मोठी काळजी करी. दाईच्या स्वाधीन तुला करावें, आणि तिला ह्मणावें, " शेंवताऊ, मी हिला तुझ्या स्वाधीन करतें; तूं पोटच्या लेंकराप्रमाणें हिला संभाळ बरें." आणि तुझी चांगली जतन करावी ह्मणून तिनें दाईस वेळोवेळीं देणगी द्यावी.

**वेणू**— अहागे माझे भल्ये आई! पण बाबा मला धावतां येत नव्हतें, अशी कधीं मी होतें? जी मी आज अर्धकोश धावेन ह्मटलें असतां धावेन. पहा, मी तीन चार पावलांनीं खोली पार होतें; हें काय कोणीं मला शिकाविलें होतें?

**गोविंद०**— तुझ्या आईनें आणि मीं तें तुला शिकविलें. तूं पडलीस तर डोक्यास लागूं नये ह्मणून आह्मीं मखमालीचा पट्टा करून तुझ्या डोकीस बांधावा; मग तुला मऊ दोरी धरवून चालवावें. एकादे वेळेस आह्मीं बागांत गवतावर एकासमोर एकानें बसावें; तुला मध्यें निराधार उभी करून, "मजकडे ये" असें ह्मणून, एकदा मीं, एकदा तुझ्या आईनें हात पुढें करावे; त्या समयीं, तूं किंचिन्मात्र कललीस कीं, आमचा जीव घाबरा व्हावा. कधीं आह्मीं तुजकडून पांगुळगाडीस हात धरवावे आणि चालवावें. अशा युक्त्यांनीं आह्मीं तुला चालायास शिकविलें आहे.

**वेणू**— मजविषयीं तुह्मांस इतके श्रम पडले आहेत, हें मला ठाऊक नव्हतें. तर मला बोलायासही तुह्मींच शिकविलें असेल?

**गोविंद०**— त्यासही आह्मींच कारण; मी तुला मांडीवर घेऊन बाबा, आई हे शब्द तुला क्षणक्षणीं ऐकवीं. तेव्हां तूं ते मला उलटून ह्मणून दाखवीस. आज जो जो शब्द तूं बोलत आहेस, तो तो आह्मीं तुला शिकविला आहे; आणि तुला वाचायासही आह्मींच शिकविलें; त्याची तर तुला आठवण असेलच.

**वेणू**— होय, तें मला चांगलें आठवतें. तूं मला पाटीवर अक्षरें काढून देस; आणि शिकवीस तसें मी शिकलें ह्मणजे तूं मला खारीक खाऊ देईस; तो घेऊन मला फार हर्ष होई.

**गोविंद०**— जर आह्मीं तुजकरितां इतके श्रम केले नसते, आणि जर जसें तुझें होईल तसें होऊं दिलें असतें, तर तुझी अवस्था काय होती बरें ?

**वेणू**— तर मला मरून आज फार दिवस झाले असते. अहा ! माझे चांगल्ये आई ! आणि अहारे माझ्या चांगल्या बाबा ! तुमची उतराई मी कशी होईन ?

**गोविंद०**— इतकें करीत असताही, तूं एकादे वेळेस बापास कंटाळा आणितेस, आणि आईचें ऐकत नाहींस !

**वेणू**— माझा जीव आहे तोंपर्यंत आतां मी असें कधीं करणार नाहीं. तुह्मीं मजकरितां इतके श्रम घेतले, हें मला ठाऊक नव्हतें बाबा.

**गोविंद०**— आतां तुझ्या भावाकरितां आह्मीं किती श्रम भोगूं तें तूं पहात जा; ह्मणजे त्यावरून तुला वाटेल कीं, मजकरितांही ह्यांस असेच श्रम पडले असतील.

असें भाषण झालें तेणेंकरून, वेणूच्या मनांत सगळ्या गोष्टी पक्क्या ठसल्या. आपल्या धाकट्या भावाकरितां आईस श्रम किती पडतात; तो अमळ बरा नसला ह्मणजे तीस काय वेदना होते; त्याच्या पोटांत अन्न जावें ह्मणून ती किती कष्ट पावते; तो रडतो तेव्हां तिला गहिंवर येतो; आईस विसांवा द्यावयाकरितां

किती ममतेनें आपला बाप मुलाला संभाळितो; आणि दोघेंही त्यास चालायास किंवा बोलायास शिकविण्याविषयीं किती परिश्रम घेतात; हें सर्व पाहून ती आपल्या मनांत म्हणे, या "माझ्या आईबापांनीं मजकरितांही असेच श्रम घेतले असतील." मग तिची त्यांजवर ममता फारच जडली: आईबापांची मी सर्वप्रकारें आभारी, असें तिच्या मनांत बाणलें. नंतर तिनें कधीं त्यांची आज्ञा मोडिली नाहीं; आणि त्यांना तिळप्राय दुःख होई असें कधीं जाणून बुजून केलें नाहीं.

---

## २. वर्षाचे तीन मुख्य काळ.

बाळा नुकताच शेकून आणि ओल्या गव्हांच्या ओंब्या खाऊन आला होता; तो म्हणतो, "अहाहा! असा सदा हिंवाळाच असता तर बरें होतें; याचें सुख काय सांगूं! यांत नद्यांचें पाणी किती स्वच्छ आणि किती मिष्ट! लोंकरीचीं वस्त्रें किती सुख देतात! पोटांत कशी भूक वाटते, अन्नास किती रुचि येते, आणि निद्रा तरी काय गाढ लागते!" तें ऐकून त्याचा बाप गोविंदशेट त्यास म्हणाला, "बरें तर, तूं म्हणतोस असेंच माझ्या स्मरणवहींत लिहून ठेव." बाळानें तसें केलें. पुढें हिंवाळा निघून गेला, आणि उन्हाळा आला, तेव्हां संपूर्ण वृक्ष पालवी फुटून फलपुष्पयुक्त झाले आहेत; वायु मंद, सुगंध, शीतल वहात आहे; लोक चंदनाच्या उटया घेऊन गळ्यांत पुष्पांच्या माळा घालून फिरताहेत, नानाप्रकारचे शीतल उपचार करिताहेत; बागांमध्यें कारंजीं उडताहेत, त्यांचे तुषार अंगास लागून अत्यंत सुख करिताहेत; तसेंच पिकलेलीं फळें, आंबे, फणस, जांब, अंजीर, द्राक्षें इत्यादिक जिव्हेस अमृतासारखी रुचि देताहेत; हें सर्व सुख पाहून बाळा म्हणतो, "अहाहा! असाच सदा उन्हाळा असता तर बरें होतें." गोविंदशेट ह्मणाला, "मुला, तूं ह्मणतोस असेंच माझ्या स्मरणवहींत लिहून ठेव." बाळानें तसें केलें. नंतर

पावसाळा आला. त्या समयीं जिकडे तिकडे हिरवीं चार गवतें व नानाप्रकारचीं झाडें उगवलीं आहेत; नद्यांचे प्रवाह चालले आहेत; शाकभाज्या पुष्कळ झालेल्या आहेत, जिकडे तिकडे पाणी जमलें आहे; त्यांतून कागदाचीं तारवें करून मुलें तीं चालविताहेत; डोईवर छत्र्या, सखलादीच्या टोप्या वगैरे घेऊन पावसांतून लोक चालले आहेत; पुढें शेतें पिकलीं, त्यांत नानाप्रकारचीं धान्यें झालीं आहेत; तें पाहून बाळा ह्मणाला, "बाबा काय चमत्कार हा! हा पावसाळा सदा असाच असता तर बरें होतें." बाप ह्मणाला, "मुला, हें त्या वहींत लिहून ठेव." बाळानें तसें केलें. पुढें कांहीं दिवसांनीं हिंवाळा येणार तों बाळा बापास ह्मणतो, "हा हिंवाळा न येता आणि पावसाळाच रहाता, तर बरें होतें." बाप ह्मणाला, "असें होईल तर तुला संतोष होईल मुला?"

**बाळा**—फारच संतोष होईल बाबा.

बापानें ती स्मरणवही काढून बाळास दाखविली आणि ह्मटलें, "हें एथें काय लिहिलें आहे तें वाच बाळा."

**बाळा**—(वाचतो) "अहाहा! असा सदा हिंवाळाच असता, तर बरें होतें."

**गोविंद०**—बरें, आतां पुढें चार पानें उलटून पाहूं या. हें वाच.

**बाळा**—(वाचतो) "अहाहा! असाच सदा उन्हाळा असता, तर बरें होतें."

**गोविंद०**—(आणखी चार पानें उलटून पुसतो) बाळा, हें अक्षर कोणाचें तें ओळखिलें?

**बाळा**—हें माझें अक्षर.

**गोविंद०**—हें काय लिहिलें आहे तें वाच.

**बाळा**—(वाचतो) "हा पावसाळा सदा असाच असता तर बरें होतें."

**गोविंद०**—हें मला विचित्र दिसतें; हिंवाळ्यांत तूं ह्मणालास

सदा हिंवाळा असेल तर बरें; तोच तूं उन्हाळ्यांत म्हणतोस, उन्हाळा चांगला; आणि पावसाळ्यांत म्हणतोस पावसाळा चांगला. आतां ह्यावरून काय समजावें ?

बाळा—कीं सर्वही काळ चांगले आहेत.

गोविंद०—होय मुला, त्या त्या काळीं त्या त्या काळचे अनेक प्रकारचे पदार्थ विपुल उत्पन्न होतात; आणि प्राणिमात्रास अनेक प्रकारचीं सुखें होतात. हें विश्व कसें चालवावें, हें ईश्वरास चांगलें ठाऊक आहे; ह्याचा विचार करायास आपली बुद्धि किती ? जर तूं म्हटलेंस तसें होतें, तर ह्यापुढें आपणांस हिंवाळा आणि उन्हाळा नाहींसा होता, व सदासर्वकाळ पाऊस पडून जिकडे तिकडे जलमय होतें. लोक घरांत अडकून रहाते; धान्यें कुजून जातीं; व दुष्काळ पडून लोकांचा संहार होता. इतका नाश होऊन तुझा स्वार्थ किती होता म्हणशील तर, तुला आणखी कितीएक दिवसपर्यंत कागदांचीं तारवें पाण्यांत खेळायास सांपडतीं. म्हणून, देवानें ही गोष्ट केवढी चांगली केली आहे पहा बरें कीं काळांची वांटणी आपल्या हातीं ठेविली आहे. ह्या गोष्टी आम्हां जीवांच्या हातीं असत्या तर, कोठेंही सुख नाहींसें होऊन अनर्थ होता !

---

## ३. लक्ष्मण.

एक संताजी नांवाचा अतिदरिद्री मोलकरी होता. त्याला लहान लहान सहा मुलें होतीं. त्यांचें पोषण कसें होईल ह्मणून त्यास एके समयीं मोठी काळजी पडली; आणि त्यांत दुसरें असें झालें होतें कीं, त्या वर्षीं पीक चांगलें आलें नव्हतें, ह्मणून आदल्या वर्षापेक्षां दाणा दुप्पट महाग झाला होता. संताजी रात्रंदिवस खपे, तरी मुलांस जाडीभरडीही भाकर पोटभर घालायापुरते पैसे त्याला मिळत नसत. असा तो पराका-

ठेच्या क्लेशांत पडला. एके दिवशीं त्यानें आपल्या सगळ्या मुलांस जवळ बोलाविलें, आणि डोळ्यांत आसवें आणून तो म्हणाला, "अरे माझ्या जिवलगांनो, यंदा महागाई फार आहे; मी एवढा खपतों तरी तुमचें पोट भरायापुरता दाणा मला मिळत नाहीं; अशी माझी अवस्था आहे. तुम्ही पहा कीं, सगळ्या दिवसाची माझी मजूरी ह्या एवढ्याशा भाकरीसाठीं खर्च होते; म्हणून, मला जें मिळतें तितक्यांत तुम्हीं निर्वाह केला पाहिजे; दुसरा उपाय नाहीं. तितक्यानें तुमचें पोट भरणार नाहीं खरें, पण प्राण तरी वांचतील." इतकें बोलून तो उगा राहिला. त्या बापड्याच्यानें पुढें बोलवलें नाहीं. तो वर देवाकडे डोळे करून रडूं लागला. तें पाहून मुलेंही रडूं लागलीं आणि आपापल्या मनांत म्हणूं लागलीं, "हे देवा, हे ईश्वरा, आम्ही गरीब, आम्ही लहान, आम्ही भाग्यहीन आहों. आम्हांवर करुणा कर, आमच्या बापास सहाय हो, आम्हांस उपाशीं मरूं देऊं नको."

संताजीनें मग त्या भाकरीचे सारखे सात तुकडे केले. आणि एक त्यांतला आपण घेऊन बाकीचे मुलांस वांटून दिले. त्यांत एक लक्ष्मण म्हणून मुलगा होता, त्यानें आपला भाग घेतला नाहीं. तो म्हणाला, "बाबा मला नको; आज माझ्यानें खाववत नाहीं. मला बरें वाटत नाहीं; माझा वांटा तूं खा; नाहीं तर माझ्या भावंडांस वांटून दे." संताजी लक्ष्मणास पोटाशीं धरून विचारितो, "बाळा, तुला काय होतें?" तो म्हणाला, "बाबा, मला बरें वाटत नाहीं; मला अगदींच बरें वाटत नाहीं. मी निजायास जातों." संताजीनें मुलास नेऊन खाटेवर निजविलें. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं, संताजी मोठा कष्टी होऊन तसाच एका वैद्याच्या घरीं गेला आणि त्याच्या पायां पडून म्हणाला, "वैद्यबावा, माझा मुलगा घरीं दुखण्यांत पडला आहे; मज दीनावर दया करून त्याला पहाल आणि औषध द्याल, तर मी तुमचा उपकार जन्मभर विसरणार नाहीं." तो

वैद्य मोठा सज्जन होता. आपणास संताजीकडून कांहीं मिळायाचें नाहीं, हें त्यास पक्कें ठाऊक होतें. तरी तो त्याच्या घरीं गेला; आणि खाटेजवळ जाऊन त्यानें लक्ष्मणाची नाडी पाहिली; तों रोगाचें लक्षण कांहींच दिसलें नाहीं; परंतु तो अशक्त फार झाला आहे, इतकें मात्र त्यास दिसून आलें. नंतर तो कांहीं औषधांची याद लिहीत आहे, इतक्यांत लक्ष्मण म्हणतो, "वैद्यबावा, मी तुमच्या पायां पडतों, मजकरितां कांहीं औषध आणवूं नका; मी तें साफ घेणार नाहीं."

**वैद्य**—कां बरें घेणार नाहींस?

**लक्ष्मण**—तें मला विचारूं नका, माझ्यानें सांगवत नाहीं.

**वैद्य**—तें सांगायास तुला काय अडचण आहे? तूं तरी मला भला हट्टी पोरगा दिसतोस.

**लक्ष्मण**—वैद्यबावा, हट्टामुळें मी सांगत नाहीं असें नव्हे.

**वैद्य**—बरें तर, मी तुला आग्रह करीत नाहीं; तुझ्या बापास विचारितों. मला वाटतें कीं, तो तें गुप्त ठेवणार नाहीं.

**लक्ष्मण**—नका नका वैद्यराज, तुम्हाला शपथ आहे ही गोष्ट बाबाला कळवूं नका!

**वैद्य**—मुला, तुला काय म्हणावें! असो, पण जर तूं मला सांगत नाहींस, तर मला ही गोष्ट तुझ्या बापास कळविणें प्राप्त आहे.

**लक्ष्मण**—अरे देवा! नको बाबा नको! त्यापेक्षां आतां मीच तुम्हांला सांगेन तें बरें. पण दया करून माझ्या भावांना आणि बहिणींना आधीं बाहेर घालवा.

वैद्यानें दुसऱ्या मुलांस बाहेर घालविल्यावर, लक्ष्मण त्यास म्हणतो, "वैद्यबावा, ह्या दुष्काळांत माझ्या बापास मोठ्या श्रमानें एका भाकरीपुरते पैसे मिळतात. तिचा एकेक तुकडा एकेकाच्या वांट्यास येतो, आणि अगदींच लहान तो बाबा आपण घेतो. माझे भाऊ आणि बहिणी भुकेनें व्याकुळ पाहून मला भारी वाईट वाटतें. सर्वांत मी वडील, सर्वांपेक्षां

मला अधिक शक्ति आहे, त्या अर्थी मला वाटतें कीं, माझा वांटा भावांबहिणींनीं खावा; मी खात नाहीं ह्याचें कारण हें आहे; ह्यासाठीं मीं दुखणें घेतलें आहे, आणि माझ्यानें खाववत नाहीं असें मी सांगतों. परंतु मी फिरून तुमच्या पायां पडतों, ही गोष्ट बाबाला सांगूं नका." तें ऐकतांच वैद्यास गहिंवर येऊन त्याच्या डोळ्यांस पाणी आलें, आणि तो म्हणतो, "पण बाळा तूं भुकेनें व्याकुळ होत नसशील?"

लक्ष्मण—असें कसें होईल? मला भुकेपासुन व्यथा होते. पण त्यांची भूक पाहून जशी मला व्यथा होते, तशी माझ्या भुकेनें होत नाहीं.

वैद्य—पण जर तूं कांहींच खाल्लें नाहीं, तर लौकर मरशील.

लक्ष्मण—हें तर मी जाणून आहें. पण मी संतोषानें मरणार. माझ्या बापाला तितकें एक पोट तरी कमी होईल. दुसरें, मी मरून देवाजवळ जाईन, आणि प्रार्थना करीन कीं, "ईश्वरा, माझ्या भावांना आणि बहिणींना अन्नावांचून मारूं नको."

त्या मुलाचे असे शहाणपणाचे बोल ऐकून वैद्यास बहुत विस्मय झाला. त्याचे अंतःकरणास करुणा येऊन त्यानें लक्ष्मणास दोहों हातीं उचलून उराशीं धरिलें आणि म्हटलें, "भिऊं नको माझ्या सख्या, तूं मरणार नाहींस. सर्वांचा बाप जो ईश्वर तो तुझें आणि तुझ्या कुटुंबाचें संरक्षण करील. मला त्या ईश्वरानेंच एथें आणिलें असें समज. तर मी आतां घरीं जाऊन लवकरच येतों." असें बोलून वैद्य आपल्या घरीं धावत गेला, आणि चाकराच्या डोईवर नानाप्रकारचे शिजविलेले पदार्थ देऊन लागलाच परत आला. त्यानें संताजीस आणि त्याच्या मुलांस पंक्तीनें बसवून त्यांस पोटभर जेवायास घातलें. त्या गरीब मुलांचा यथेष्ट जेवतांना उत्साह पाहून त्या धार्मिक वैद्यास फार फार समाधान झालें. तो जातेवेळीं लक्ष्मणास म्हणाला, "मुला, तूं कांहीं काळजी करूं नको; मी

तुम्हांस लागेल तें पुरवीत जाईन." ती प्रतिज्ञा त्यानें मोठ्या आवडीनें पाळली. तो नित्य त्यांस अन्न पाठवून देई. त्या गांवीं दुसरे कितीएक त्या वैद्यासारखे धार्मिक पुरुष होते, त्यांस ती गोष्ट समजली तेव्हां तेही त्या मुलांचा समाचार घेऊं लागले. कोणी अन्न, कोणी पैसा, कोणी वस्त्रें, असें त्यांस देत. ह्याप्रमाणें थोडकेच दिवसांत तें लहान मुलांचें कुटुंब दारिद्र्यांतून मुक्त झालें.

ह्याप्रमाणें आपल्या बापाकरितां आणि आपल्या लहान भावंडांकरितां त्या उदार मुलानें जें आचरण केलें, तें त्या देशाच्या राजानें ऐकिलें; तेव्हां तो मोठा विस्मित झाला, आणि संताजीला आपणाजवळ बोलावून म्हणाला, "तुझा मुलगा मोठा साधु आहे. मी त्याला लेंकराप्रमाणें पाळीन. मीं भांडारी ह्यास सांगून ठेविलें आहे; तो तुला दर वर्षी पांचशें रुपये देईल. लक्ष्मण आणि दुसरे तुझे मुलगे आहेत ह्यांनीं इच्छेस येईल तो धंदा शिकावा. त्यांस मी आपल्या खर्चानें शिकवीन, आणि ते जर चांगल्या मार्गानें चालले तर मी त्यांस भाग्यास चढवीन.

संताजी मोठा हर्षित होऊन घरीं आला, आणि दंडासारखा भुईवर पडून आपणास इतका योग्य पुत्र देवानें दिला म्हणून त्याचा स्तव करूं लागला.

---

## ४. चिमणी.

गोदावरीबाई म्हणून एक शहाणी, भली आणि मायाळू बायको होती. तिची वडील मुलगी गंगा म्हणून होती. तिनें एके दिवशीं कांहीं अन्याय केला, म्हणून आईनें तीस ममतेनेंच धमकाविलें. ते आईचे मायाळू शब्द ऐकून आणि आपला अन्याय स्मरून गंगा रडूं लागली. तें पाहून तिची लहान बहीण चिमणी तीन वर्षांची होती, तिनें हळूच मागून येऊन एका हातानें परकराचा पदर घेऊन आपल्या बहिणीचीं आ-

सर्वं पुसिलीं, आणि दुसऱ्या हातानें आपल्या तोंडांतला खडी-साखरेचा खडा तिच्या तोंडांत घातला.

मला असें वाटतें कीं, एकाद्या चांगल्या चितार्‍यानें ह्याविषयीं चित्र काढलें असतां तें फारच वेधक होईल.

---

# ५. लहान किनऱ्या.

## नाटक एकअंकी.

### पात्रें.

| | |
|---|---|
| मालोजी................. | एक गृहस्थ. |
| चांगू.................... | मालोजीचा मुलगा. |
| सगुणी ................. | मालोजीची मुलगी. |
| गोविंदा.................. | मालोजीचा भाचा. |
| यमुना, चिमणी | सगुणीच्या संवगड्या, रंगरावाच्या मुली. |
| दौलतसिंग ............. | लहान किनऱ्या. |
| भिऱ्या.................. | पोरगा. |

स्थळ.

## मालोजीचें घर.

### प्रवेश १.

चांगू आणि गोविंदा.

**चांगू**—(गोविंदास) ऐकिलेंस गड्या भाऊ, तुला माझें एक काम केलें पाहिजे.

**गोविंदा**—बरें पाहूं तर खरें काय काम आहे तें, तुझी सदा कांहींना कांहीं वेठ असतेच.

**चांगू**—ह्याचें कारण असें कीं, तूं मजपेक्षां बुद्धिवान आहेस. गड्या, आज मला गुरुजींनीं पंचतंत्रांतली गोष्ट संस्कृताची

प्राकृत करावयास सांगितली आहे. तें काम तुला चांगलें येतें.

**गोविंदा**— काय? ती तूं अजून पुरती केली नाहींस?

**चांगू**— पुरती कोठून होईल? तिचा आरंभच करायास अजून कोणास फावलें आहे?

**गोविंदा**— काय? सकाळच्या प्रहर दिवसापासून संध्याकाळच्या प्रहर दिवसापर्यंत तुला वेळ सांपडला नाहीं?

**चांगू**— तूं पहा बरें मला फावेल कसें तें. मी आठ घटिका दिवसास तोंड धुऊन मोकळा होतों. पुढें चांगली भूक लागली पाहिजे म्हणून मला दहा घटिकांपर्यंत बागांत इकडून तिकडे धावावें लागतें. नंतर चार घटिका जेवणाखालीं मोडतात. जेवलें आणि लागलेंच उद्योगास बसलें तर बाबाचा वैद्य सांगतो कीं, रोग होतो. म्हणून पोट भरून जेवलों तें जिरवायास कांहीं वेळ मला निजलें पाहिजे व कांहीं फिरलें पाहिजे, त्यापासून नुकता कोठें मोकळा होतों आहें.

**गोविंदा**— बरें, आतां तर व्यायाम पुष्कळ झाला. आतांपासून संध्याकाळपर्यंत कां करीनास तर?

**चांगू**— आतां मला गायास बसलें पाहिजे, तें तुझ्या लक्ष्यांत आहेच.

**गोविंदा**— पण गवयी अजून कोठें आला आहे? तो येईपर्यंत बसलास तर काय होतें?

**चांगू**— तोंपर्यंत मला त्याची वाट पहात बसलें पाहिजे. ज्या वेळीं जें काम करायाचें त्यांत दुसरें तिसरें घेतलें म्हणजे मी गोंधळून जातों बाबा.

**गोविंदा**— बरें तर, गाणें होऊन कांहीं दिवस राहील. करणार झालास तर रात्रीस निजेपर्यंत वेळ आहे.

**चांगू**— मला एक क्षणभरही अवकाश सांपडणार नाहीं. माझी बहीण सख्यांस बोलावणें करून त्यांची वाट पहात बसली आहे.

**गोविंदा**—त्यांचा तुझा काय संबंध? त्या आल्या तर तुझ्या बहिणीकडे येतील.

**चांगू**—खरें. पण त्यांबराबर खेळायास मला बहिणीनें बोलाविलें आहे.

**गोविंदा**—बरें तर, त्या गेल्यावर मग तुला कसची अडचण आहे?

**चांगू**—वाहवारे! वः! मग दिव्याउजेडीं काम करा आणि डोळ्यांस उपद्रव करून घ्या. चांगली गोष्ट सांगतोस! आणि तसें केलें तरी, सकाळला गोष्ट तयार झाली पाहिजे ती कशी होते?

**गोविंदा**—बरें, नाहीं झाली तर माझें काय गेलें?

**चांगू**—तर काय, बाबानें आणि गुरूनें मला रागें भरावें असें तुझ्या मनांत आहे?

**गोविंदा**—मला फुसलावयाचें तुला बरें ठाऊक आहेरे चांगू. पाहूं बरें कोठें आहे ती गोष्ट—

**चांगू**—माडीवर माझ्या खोलींत आहे. मी जाऊन आणितों, नाहीं तर तूंच कां माझ्याबरोबर वर येस ना?

**गोविंदा**—तूं पुढें जा; मी मागून हा आलोंच. ती तुझी बहीण मजकडे कांहीं बोलायास येते आहे.

**चांगू**—पण तूं ह्यांतली गोष्ट तिला कांहीं सांगूं नको हो—समजलास?

---

## प्रवेश २.

### सगुणी आणि गोविंदा.

**सगुणी**—काय भाऊ, दादाचें तुझें काय चाललें होतें? मला वाटतें कीं, नेहमींप्रमाणें त्यानें तुझी कांहीं तरी कुचेष्टा केली असावी.

**गोविंदा**—नेहमींप्रमाणें कुचेष्टा तर नाहीं. पण नेहमींप्रमाणें

काहीं प्रार्थना आहे, कीं मीं उद्यांसाठीं त्याच्या वाटचें काहीं काम करून ठेवावें.

**सगुणी**—आणि काय, हा त्याचा आळशीपणा बाबाला कळवायास नको?

**गोविंदा**—तें मी तर कळविणार नाहीं. कां कीं, तुला ठाऊकच आहे कीं, तुझी आई वारल्यापासून मामाची प्रकृति अशी जर्जर झाली आहे कीं, अमळ त्याचें मन खवळलें तर तो दुखण्यांत पडतो. आणखी दुसरें असें. मी त्याचें अन्न खातों. कदाचित् त्यास असें वाटेल कीं, हा माझ्या मुलावरून माझी ममता काढून आपल्याकडे वळवायास पहातो.

**सगुणी**—बरें तर माझी गांठ पडली ह्मणजे मीच दादाला छेडीन. पण मी काय बोलायाला आलें आहें तें समजलास? रंगरावाच्या मुली आपल्याकडे येणार आहेत, त्यांच्या आदरसत्कारास तूं मजला साह्य केलें पाहिजे.

**गोविंदा**—बरें ताई, माझ्यानें होईल तें मी करायास सिद्ध आहें.

**सगुणी**—अगाई! ह्या त्या आल्याच, चला माडीवर जाऊं.

---

## प्रवेश ३.

### गोविंदा, सगुणी, यमुना आणि चिमणी.

**सगुणी**—या माझ्या सख्यांनो. (त्या परस्पर भेटतात; गोविंदास विचारपूस करितात तोही त्यांची विचारपूस करितो.)

**चिमणी**—आपली भेट होऊन वर्ष लोटलेंसें वाटतें बाई!

**यमुना**—खरेंच पुष्कळ दिवस झाले.

**सगुणी**—मला वाटतें कीं, एक सगळा महिना झाला असावा

(गोविंदा बसायास सत्रंजी टाकितो.)

**चिमणी**—तूं कशाला एवढी मेहनत घेतोस?

**गोविंदा**— जें उचित तें मला केलें पाहिजे.

**सगुणी**— मी निभ्रांत आहें; भाऊ हर्षानें करितो. माझ्या दादाच्या आंगांत इतका विनय असता तर मग काय पाहिजे होतें !

---

## प्रवेश ४.

गोविंदा, सगुणी, यमुना, चिमणी आणि चांगू.

**चांगू**— ( मुलींचें कांहींच आगतस्वागत न करितां ) हें तूं फार चांगलें केलें गोविंदा ? आपण एथें खेळायास बसलास, आणि मला तिकडे वाट पहावयास लाविलें !

**गोविंदा**— मला वाटलें होतें कीं, तूं पहिल्यानें मुलींचा सत्कार करिशील, पण तूं आधीं माझीच पूजा केलीस.

**चांगू**— ( चमकून ) ओहो ! मुलींनो, मी प्रार्थना करितों कीं, तुमचा सत्कार केला नाहीं, म्हणून मनांत राग आणूं नका. मी आतां तुमच्या सेवेस हजर आहें.

**यमुना**— तूं आमच्या सेवेविषयीं काळजी वाहूं नको. आपलें काम कर.

**चांगू**— ( गोविंदास एकीकडे नेतो, आणि मुलींचें लक्ष्य गोष्टींकडे पाहून हळूच खिशांतून संस्कृत कागद काढून देतो ) हें घे, समजलास ? आणि ह्याचें प्राकृत लवकर करून दे.

**गोविंदा**— सहा ओळी ! वाहवारे ! भारी मेहनत ! तुला लाज वाटत नाहींरे ?

**चांगू**— चुप. बोलूं नको. त्या ऐकतील.

**गोविंदा**— मुलींनो, आज्ञा द्याल तर मी क्षणभर जाऊन येतों.

**चिमणी**—लवकर ये, आम्ही वाट पहात आहों.

**सगुणी**—तूं जातोस तर भाऊ, ती मिठाई आणि कांहीं मुरांबा भिव्यास वर आणायास सांग.

---

## प्रवेश ५.

चांगू, सगुणी, यमुना आणि चिमणी.

**चांगू**—(सत्रंजीवर बसून लोडाशीं टेंकून हात पाय पसरून म्हणतो.) मी आपला एथेंच बसतों.

**सगुणी**—मला वाटतें कीं, तूं आमच्या आधीं आम्हांस पुसल्यावांचून बसूं नयेस. हें गृहस्थपणाचें लक्षण नव्हे.

**चांगू**—कोणास, तुला पुसावें?

**सगुणी**—मी एथें एकटीच नाहीं.

**चिमणी**—आतां मी समजलें, तुझ्या दादाच्या लक्ष्यांत आम्ही हीं कांहींच नव्हों.

**यमुना**—त्याला असें वाटतें कीं, मी एथें असलों म्हणजे तेवढ्यानेंच ह्या धन्य झाल्या—

**चांगू**—हंः हंः हंः! मला पक्कें ठाऊक आहे, बायांनो, कीं, मजवांचून तुमचें चालेल; पण तुम्हांवांचून माझें चालणार नाहीं.

**सगुणी**—बरें बाबा, इतकें तरी सत्कारासारखें बोललास.

**चांगू**—पण मी खरेंच सांगतों ताई, तूं समजूं नको कीं, मी एथें तुजकरितां बसलों आहें.

**सगुणी**—ह्याची तर मला खात्री आहे. मी म्हणजे काय पदार्थ! कांहींच नव्हे, पण असल्या शहाण्या भावाची मी बहीण, इतकें मनांत आणून खुशाल आहें. (इतक्यांत भिव्या येतो, आणि पेढेबरफी तबकांत मांडून जातो.)

**चांगू**—आतां ही मिठाई मींच वांटिली असतां बरें नव्हे?

**सगुणी**—नको नको बाबा, तें मी करीन. तूं असल्या कामांत अडाणी आहेस, तूं जर कांहीं करणारच, तर मुलींपुढें वाट्या ठेव.

**यमु०**—मला बाई इतके पेढे नकोत.

**सगुणी**—पाहिजेत तितकेच घे.

(सगुणी तिजपुढें बरफी करिते. चांगू तिच्या हातच्या तबकास झोंबतो.)

**सगुणी**—(चांगूस) तुला अगोदरच मीं तीन मोठाले तुकडे दिले, नव्हे?

**चांगू**—तरी मला पुरले नाहींत ताई. अगे, गोड पदार्थावर माझी भारी भक्ति. (तो एकामागें एक, दोन, तीन, चार तुकडे घेतो. सगुणी तबक ओढिते.)

**सगुणी**—दादा, तुला लाज नाहींरे वाटत? तूंच सगळी घेतलीस तर मग आम्हीं काय करावें बरें?

**चांगू**—बरफीची बरणी कोठें आहे ती तुला ठाऊक नाहीं काय? तेथून आणखी आण म्हणजे झालें.

**सगुणी**—(दुसऱ्या मुलींस) मला श्रम दिल्यावांचून आमच्या दादास चैन पडत नाहीं.

**चांगू**—पुरे आतां. तूं अमळ आतां जाशील तर ह्या मुलींची सेवा मी एकटाच करीन.

**यमु०**—ऐकिलेंस ना सगुण्ये, आतां तुझ्या दादास कोणी दांडगा म्हणेल?

**सगुणी**—(वाट्यांत मुरांबा वाढिते, आणि चांगूस म्हणते) दादा, ही वाटी यमनीस दे. (चांगू हातांत वाटी घेतो, आणि यमनीस देतांना तिच्या साडीवर उपडी करितो. तें पाहून त्या दोघी चमकून उठतात.)

**सगुणी**—हें पाहिलेंतना ह्याचें चरित्र. (हळूच, चांगूस) मी शपथ करीन, तूं हें दाटून केलें दादा.

**यमु०**—अरे देवा! माझी नवी साडी, हिला चिकट लागलें. आतां माझी आई मला काय म्हणेल? आणि तिला मी काय सांगूं?

**चिमणी**—अगाई! ही आज पहिल्यानेंच नेसली होती. लौकर लौकर लोटींत पाणी घेऊन ये.

**सगुणी**— नको नको, त्यापेक्षां सुक्या चिरगुटानें पुसावी तं

चांगलें. हा घे कोरा फडका, पुस ह्यानें. नाहीं तर मलाही वाटतें कीं, धुवावी तेंच चांगलें. (सगुणी पाणी आणिते, चिमणी आणि ती यमनीपाशीं जातात. एकजण तिची साडी धरिते, आणि एकजण वर पाणी घालिते. तितक्यांत त्यांची नजर चुकवून भांड्यांतला सगळा मुरांबा घेऊन चांगू लोडाशीं स्वस्थ बसतो आणि खुशाल खातो.)

**चिमणी**—पुरे पुरे, धुतलें; आतां वाळवूं या.

**यमु०**—इतकें तरी माझ्या दैवानें चांगलें झालें कीं, रस निऱ्यांवरच पडला.

**चांगू**—(आपणाशीं, कुशीस वळून) हा कांहीं माझा अन्याय नाहीं.

**सगुणी**—हें घे वाळलें, आतां मला वाटतें कीं कोणाच्या समजण्यांत येणार नाहीं.

**चिमणी**—बरें झालें, डाग गेला, नाहीं तर आज घात झाला असता.

**यमु०**—चांगोबा, झालें तें झालें; पण आतां आपण फिरून माझी सेवा करायाच्या श्रमांत पडूं नये.

**सगुणी**—गड्यांनो, आपण पुन्हा बसूं. (ती मुरांबा वाढायाकरितां भांडें हातीं घेते; तें रिकामें पाहून चांगूवर रागानें डोळे वटारून म्हणते.) अशी अमर्यादा कोठें पाहिली नाहीं बायांनो. आपण सगळीं घाबरीं झालों होतों, त्या वेळेस हा असें करील हें माझ्या लक्ष्यांत नव्हतें. असो, अमळ थांबा मी दुसरा मुरांबा आणवितें.

**चिमणी**—पुरे बाई आतां; मला आणखी नको.

**यमु०**—माझी साडी नासली, त्यानें माझें मन खट्टू झालें, बाई.

**चांगू**—पण इच्छा असून आग्रहाची वाट पाहूं नका. बाजारांत जें म्हटलें तें मिळतें. कमी येईल तें ताई आणवील, चिंता करूं नका.

**यमु०**—सगुणा, तुझा दादा एथें येणार हें तुला ठाऊक नव्हतें गे?

**सगुणी**—नाहीं बाई, पण न बोलावितां जो आला, त्यानें दुसरा आपणास देईपर्यंत वाट पहावी; दांडगाईनें घेऊं नये.

**चिमणी**—आतां त्यास बोलून दुखवूं नको; मला कांहीं त्याचा खेद नाहीं.

**सगुणी**—बरें तर आतां आपण काय करावें? हां! तो आपला गडी गोविंदा येतो आहे. तो कांहीं तरी चांगला खेळ काढील.

**चांगु**—(वेंकावल्या दाखवून तिच्यासारिखा स्वर काढून) तो आपला गडी गोविंदा येतो आहे! बायांनो पण तुमच्या अगोदर माझें त्याशीं कांहीं बोलायाचें आहे. (चांगू गोविंदाकडे जातो. मुली आपल्यांत गोष्टी करितात.)

---

## प्रवेश ६.

सगुणी, यमुना, चिमणी, गोविंदा आणि चांगू.

**चांगु**—(हळूच फुसफुसून गोविंदास) कायरे, तें झालें?

**गोविंदा**—(हळूच) होय, हें घे; आणि तुला आपल्या आळशीपणाची कांहीं तरी लाज वाटूं दे. (मोठ्यानें मुलींस) बायांनो, तुम्ही काय खेळणार तें कांहीं ठरलें?

**यमु०**—ठरवायासाठीं तुझी वाट पहात होतों.

**गोविंदा**—मीं एक चिमणासा किनऱ्या खालीं बसविला आहे. तो तुमच्या सेवेस सिद्ध आहे. सांगाल तर वर बोलावितों. कांहीं गाणें वाजिवणें करील.

**सगुणी**—चिमणा किनऱ्या! कोठें आहे तो? कोठें आहे तो? लवकर बोलाव.

**यमु०**—संवगड्यांस कसें रमवावें हें भाऊस चांगलें येतें.

**गोविंदा**—ह्या करमणुकींत धर्मही घडेल; कां कीं त्याजवळ किनरीवांचून दुसरें कांहींच नाहीं.

**चांगू**—पण त्याला पैसा कोण देईल गोविंदा? (मुलींकडे पाहून) हा बोलतो चालतो; जसा जगत्शेटीचा नातू पण जवळ फुटकी कवडी तीही नाहीं.

**सगुणी**—असा कोणाचा उपहास करण्यांत तुला हलकेपणा नाहीं दिसत दादा?

**गोविंदा**—बोलूं दे गे ताई, मला त्याचा राग येत नाहीं. गरीबी हा कांहीं दोष नाहीं. मी चिमण्या किन्ऱ्यासारखा आहें. तो गरीब असून कसा चांगला मुलगा आहे! माझ्याजवळ एक पावला आहे, तो मी त्यास देईन. तेवढ्यावर त्यानें सांजपर्यंत गायाचा वाजवायाचा करार केला आहे.

**चिमणी**— आपण सगळीं मिळून त्यास वर्गणी देऊं.

**यमु०**—आपण त्याची पट्टी करूं.

**गोविंदा**—मी त्याला बोलावूं? तो खालीं दरवाजावर बसला आहे.

**सगुणी**—होय भाऊ, लवकर बोलाव. (गोविंदा जातो, इतक्यांत भिव्या तबकांत एक कलिंगड घेऊन येतो.)

## प्रवेश ७.

### यमुना, चिमणी, सगुणी आणि चांगू.

**चांगू**—(भिव्याच्या हातून तबक ओढायास जातो. सगुणी त्यास घेऊं देत नाहीं.) ताई, मी वांटायाकरितां म्हणून घेतों.

**सगुणी**—मी तुझी मेहनत वांचवितें, तुझ्या वांटचें तें मी करितें. कोण जाणे, तूं बरफी वांटलीस तसेंच हें वांटिशील. (ती त्याच्या फांका करिते आणि मुलींस देते.)

**चांगू**—(इतक्यांत त्यांतल्या दोन तीन फांका घेऊन) आतां तूं ह्या बाकीच्या फांका कोणास देणार?

**सगुणी**—आपला गोविंदा खालीं गेला आहे. त्याला कांहीं नकोत काय?

**यमुना**—मी त्याला वांटा देईन.

**चिमणी**—मीही आपला देईन.

**चांगू**—(वाईट वाटून) काय त्याचें दैव आहे पहा!

**सगुणी**—काय! एक कलिंगडाचा तुकडा त्याला मिळतो तें तुला साहत नाहीं!

---

## प्रवेश ८.

यमुना, चिमणी, सगुणी, चांगू, गोविंदा व किनऱ्या.

**गोविंदा०**—(किनरीवाल्यास हातीं धरून आणितो.) माझा चिमणा किनऱ्या तो हा; मी तुम्हांस भेटवितों हो.

**यमुना**
**चिमणी** }—मुलगा तर फार भला दिसतो.

**सगुणी**—तुझें नांव काय बाळा?

**किनऱ्या**—(हात जोडून) जी, गुलामकूं दौलतसिंग कहते हैं.

**सगुणी**—तूं कोठचा रहाणारा?

**किन०**—जी, मैं तो हिंदुस्तानका रहनेवाला हूं.

**यमुना**—तुला आपला देश सोडायाचें काय कारण झालें?

**किन०**—जी बाईसाब, येह बात तो जरा लंबी है. लेकिन आपकी मर्जी होगी तो नोकर थोडेमें कहेगा.

**चिम०**—बरें, सांग.

**किन०**—मेरा बाप तो कासीका रहनेवाला; मेरी मा मर गयी, जबसें ओ बहोत दुःखी होगया है. उसकू साथ लेकर मैं पेटके मारे भटकता फिरता हूं; ने किनरी बजाकर पेट भरता हूं.

**सगु०**—तुझें कांहीं कसब दाखीव पाहूं.

**किन०**—मैं बडा कसबी नहीं हूं, तोबि आपके आगे चाकरी करके दिखाऊंगा, गुना माफ होना.

**गोविं०**—जसें तुला येत असेल तसें होऊं दे. आम्हांस त्यांत समाधान होईल. तूं बेसूर गाइलें तरी आम्हांस कबूल आहे.

(किनऱ्या किनरी लावितो; "कूं, कूं, कूं, कं, आ." यमुना गोविंदास कलिंगडाचा तुकडा देते, तो हातांत घेऊन किनऱ्याकडे लक्ष्य देतो. किनऱ्या किनरी लावून गाणें गातो.)

इस तनधनकी कोन बढाई, देखत नयनोंमें मट्टी मिलाई ।। ध्रु० ।। हाड जले जैसी लकडीकी मोली, बाल जले जैसी घासकि पोली ।। १ ।। आपनेखातर मेहेल बनाया, आपही जाकर जंगल सोया ।। २ ।। कहत कबीरा सुन मेरे भैया, आप मुवे पर डुबगई दुनिया ।। ३ ।।

**गोविं०**—अहाहा! काय गोड गाणें गाइलें! बापड्या, तूं फार विपत्तींत आहेसना?

**किन०**—हां सच, लेकिन अभी तो मेरी किनरी मेरे पेटकूं देती है. बेजार पडूंगा तब भगवान है. और मरूंगा तब धरत्री माई मेरेकूं थोडीशी जग्गा देगी. और मुझे क्या चाहिये?

**गोविं०**—पण बिचाऱ्या, तूं आतां उपाशीं असशील नव्हे? ही माझी बर्फी आणि कलिंगडाचा तुकडा घे, आणि खा.

**किन०**—नहि मेरे खावंद; ओ तुमही खावो. मेरेकूं जरा रोटीका तुकडा देओ; सो बस होगा.

**गोविं०**—नाहीं, हें तूं घेच; आणखी तुला भाकरीचा तुकडाही देतों. (तो घरांतून भाकर आणून त्यास देतो.)

**किन०**—मेरेउपर आपने बहुत एहसान किया. लेकिन मैं यहां खानेवाला नहीं. घरमें मेरा बुढा पिता है, ओ और मैं मिलकर साथ खायेंगे. उनने सारे जनममें बर्फी नहिं चख्खी होगी.

**सगु०**—तुझ्या म्हाताऱ्याकरितां हा माझा वांटा मी तुला देतें.

**चिम०**—आणि हा माझाही घे.

**यमु०**—माझा पण घे.

**किन०**—नहिं, नहिं, बाईसाब. तुझारी बर्फी तुमने रखना, हम लोकोंकूं मीठा खानेकी आदत नहिं है. (त्या फारच आग्रह करितात तेव्हां तो बर्फी घेऊन एका बाजूस ठेवितो.)

**चांगू०**—(थट्टेनें) तो खरें ह्मणतो, त्यानें त्याचा गोड गळा बिघडेल.

**सगु०**—तूं कां रे उगीच मध्यें बोलतोस? तुझी बर्फी तर कोणी मागत नाहीं ना?

**चांगू०**—मागून फळ काय? मीं ती केव्हांच गट्ट केली.

**गोविं०**—(किनऱ्यास) मुला, थोडीशी बर्फी तोंडांत कां टाकीनास?

**किन०**—ओ! नहिं नहिं. आपने इत्ती मेहेरबानी करके मेरेकूं दियी है, तो मेरेकूं रजा होना. मैं रुमालमें लपेटके जातेबखत घरकूं लेजाऊं गा. (तो एक मळका रुमाल काढतो.)

**सगु०**—थांब अंमळ; मी तुला त्याहून धुवट फडका देतें तोंपर्यंत थोडकीशी भाकर खाऊन हुशार हो. (ती फडका आणून देते.)

**किन०**—नहीं मेरी माई, मैं यहां गानेकों आया हूं; खानेकों नहिं आया.

**यमु०**—मी गोविंदासंगतीं नाचतें. तूं गत वाजविशील?

**किन०**—तुम चाहो वह बजाऊंगा.

**यमु०**—चांगू ये, आपण सगळींच नाचूं.

**चांगू०**—अँहँ, आज माझे गड्या पाय वळताहेत.

(तीं नाचतात; चांगू बाहेर जातो.)

**सगु०**—गेला तर पीडा गेली.

**चिम०**—आतां आपण कांहीं पैसे जमवूं.

**यमु०**—होय मी तयार आहें. ही घे चवली.

**सगु०**—ही माझी चवली.

**गोविं०**—पहिल्यानें मी आपली देणगी देईन.

(तो दौलतसिंगास पावली देतो.)

**किन०**—इतना मैं नहिं लेऊंगा, मेरी बोली दो आनेकी है.

**गोविं०**—मुला नको म्हणूं नको. आम्हीही संतोषानें देत आहों तें घे.

**किन०**—भगवान तुमकों सोगणा देगा.

**सगु०**—हें घे तुझ्या बापासाठीं जुनें अंगवस्त्र.

**किन०**—भगवान तुम्हारा कल्याण करे. (तो बर्फीचे तुकडे बाजूस ठेविले होते ते पहातो, आणि खंती होऊन म्हणतो.) अरे इत्तेमें कौन ले गया!

**सगु०**—काय लबाड तरी चांगू! मला वाटतें ह्याची बर्फी त्यानेंच नेली असावी.

**किन०**—बाईसाब, लेगया तो कुछ फिकर नहीं. मैं पिताजीके वास्ते जरा दिलगीर हुवा.

**गोविं०**—जर चांगू तुझा भाऊ नसता तर आज त्याची कशी फजीती केली असती तें समजतें. असो, मी ह्यास आणखी एक पावली कोठून तरी उसनी आणून देतों, म्हणजे तो आपल्या बापाला तिची बर्फी घेऊन जाईल.

**सगु०**—तो खर्च मी तुजवर पाडीत नाहीं. मीच देतें. (किनऱ्यास) ही घे मुला पावली. (चिमणी आणि यमुना आपल्या पिशव्या चांचपतात.)

**चिम०**—हे घे आणखी चार पैसे.

**यमु०**—हे घे माझ्याजवळ दोन आहेत.

**किन०**—नहीं नहीं, बहुत हुवे, तुम मेरेपर जुलूम करतेहो.

**गोविंदा.**—काय करूं बाबा, माझ्यापाशीं दुसरे पैसे नाहींत. तुझ्यासारिखा मी येथें दुसऱ्याच्या धर्मावर पोट भरितों.

**किन०**—(गोविंदास) तुम हमकूं इदर नहीं ले आया होता

तो अछा होता. तुम मेरेपर इत्ती लगट करते हो, के मेरेसे ना नहीं कही जाती.

**गोविंदा.**—तूं खिन्न होऊं नको. आतां जा; आणि दुसऱ्या कोठूनही कांहीं मिळीव.

**किन०**—(जातांना सर्वांस) तुमारी अलाबला लेताहूं. भगवान तुमारी तनदुरुस्ती रखे,और तुमकों बहुत दौलत देवे.

---

## प्रवेश ९.

### सगुणी, चिमणी, यमुना, आणि गोविंदा.

**सगु०**—पाहिलेंत ना, आज चांगूनें काय लाजिरवाणें काम केलें तें!

**यमु०**—मी जर त्याची बहीण असतें, तर त्याला कसें तें समजलें असतें.

**चिम०**—आपण धर्म करीत होतों त्या आनंदांत त्यानें आपल्यास विरस केलें.

**यमु०**—असो, किनऱ्याचें तितक्यांत काम बरेंच होईल.

**गोविं०**—तें खरें, तुमचें देव बरें करो; पण किनऱ्याचें काम झालें ह्मणून चांगूचा अपराध उणा होत नाहीं. कोणीं दार उघडिलें? (पाहून) हा पुनः तुमचा किनऱ्या आला, कां बाबा? काय झालें?

**किन०**—येऊन (रडत) रे भगवान! रे भगवान! मेरी खराबी हुवी.

(तीं सगळीं त्याभोंवतीं मिळतात.)

**सगु०**—तुला काय झालें बाबा?

**किन०**—मेरा सब कुछ गया. देखो देखो, मेरी किनरी तोडडारी; मेरे पैसे लूटलिये; और मेरे पाससे सब लेगया.

**गोविं०**—तुझी किनरी कोणीं फोडिली? तुझे पैसे कोणीं नेले?

किन०—उननेही, जो मेरी बर्फी लेगया.

सगु०—काय, माझ्या दादानें ? असें कसें होईल ?

गोविं०—काय, त्यांनें ?

चिम०—असें होणार नाहीं.

यमु०—अरे दुष्टा !

किन०—उननेही, उननेही ए काम किया. मैं दरवाजेबाहेर निकलताहूं इतनेमें ओ आया, और मेरकूं पूछने लगा, के तूं आपनी बिदाई नहीं पाया होगा, तो मैं तुझको देऊंगा. मैं बोला मैंने पाई. ओ बोला उनलोकोंके पास इतने पैसे कहांके ? मेरेको दिखलाव क्या दिया सो. मैं बावरा हुवा; ओ बर्फी लेगया वुह बाद पैसे मिले यह आनंदसें भूल गया, और पैसे कित्तेथे ओ मैंने गिनेभी नहीं थे सो मैंने किनरी जमीनपर धरके रुमाल निकाला, और बोला देख ये है. पिछे मैं गांठ छोडताहूं इतनेमें उननें रुमालकुं हात डाला, तब उसकी लुच्चाई मेरे नजरमें आई; फेर रुमालकूं एकतरफ वह खेचनें लगा, और एकतरफ मैं; इतनेमें उननें अपने दो पगसें मेरी किनरी दाबी, सो फूट गई. मैं घाबरा होके रुमाल छोड दिया, और किनरी पकडनेकूं गया. इत्तेमें ओ रुमाल लेके भागा, मेरी किनरी टूट गई, पैसे गये, रुमालभी गया. अब मेरा पिता मेरेकूं क्या कहेगा ! अरे मेरा पिताजी ! अब तूं भूखा मरेगा रे ! हायहाय !

सगु०—भाऊ, माझ्याजवळ आतां दमडीच्याही कवड्या राहिल्या नाहींत.

चिम०—ह्या घे कांहीं नासऱ्या. माझ्यापाशीं इतक्याच होत्या.

किन०—मेरे खावंद, मेरेपर बहुत एहसान हुवा, पन उसमें किनरी बेचती नहीं मिलेगी. हाय रे मेरे बाबा ! वो उनकेपास पंधरा बरसलग थी.

यमु०—ह्या दोन दमड्या घे, ह्यावेगळें मजपाशीं कांहीं राहिलें नाहीं.

**सगु०**—(आपल्या पेटीकडे धावते) हें घे माझें अंगुस्तान. हें सोन्याचें आहे जा आणि वीक. माझ्याजवळ दुसरें हस्तिदंती आहे त्याजवर माझें काम चालेल.

**गोविं०**—ताई नको गे तें अंगुस्तान देऊं. तें तुला असूं दे. थांब रे मुला, मी तुझें साहित्य करितों. (तो करांगळींतली आंगठी काढितो, आणि त्याला देतो.) माझ्याजवळ दुसरी मुलाम्याची आंगठी आहे; तिजवर मी काम भागवीन. हिचे तुला पांच रुपये येतील. ही माझी आहे ह्मणून द्यावयास मला कोणाचें भय नाहीं. मावशीनें माझ्या वाढदिवशीं ही मला दिली होती. (तिकडून सगुणा अंगुस्तानाविषयीं आग्रह करिते. इकडून गोविंदा आंगटी घ्यायाविषयीं गळ घालतो; दौलतसिंग घेत नाहीं.)

**किन०**—नहीं, मैं उसमेंसें एक भी नहीं लेऊंगा! मेरा बाबा कहेगा के तूं चोरी करकर लाया.

**सगु०**—माझें अंगुस्तान तेवढें घेच.

**गोविं०**—तूं माझी आंगठी घेत नाहींस ना? तर मी तुजवर रागावेन. घे मी ह्मणतों घे—

**किन०**—रे भगवान, तुह्मारे ये भूखण मैं कैसा लेऊं? (मोठ्या जुलुमानें घेतो.)

**गोविं०**—त्याविषयीं तूं कांहीं चिंता करूं नको. भगवान मला आणखी देईल; ह्याहून दुप्पट देईल. तुला तुझ्या बापाचें पोट भरलें पाहिजे, मला बापच नाहीं; ह्मणून तुला हें फार उपयोगीं पडेल.

**सगु०**—जा, जा, आतां संभाळून जा हो.

**किन०**—इतना अंगुस्तान तोभी पिछे ले, ओ मेरी मा.

**सगु०**—नाहीं आतां तें माझें नाहीं.

**चिम०**—(किनऱ्यास) कधीं तूं आमच्या दारावरून आलास तर मजकडे ये, मी तुला कांहीं देईन.

**यमु०**—आमचें घर आदितवार पेठेंत दौलतरावाच्या घरा-

पाशीं आहे. तेथें कोणालाही पुसलें तर रंगरावशेटीचें घर दाखवील.

**किन०**—बडे लोकोंके घरमें जानेकी हमसरिखेकूं बहोत मुषकील है. कभी मैं गया होगा तो कोई बखत दो धक्के मारकर दरवाजेबाहर निकाल दिया होगा.

**सगु०**—आतां पुरे हें. तुझा बाप तुझी वाट पहात असेल आणि आमच्याही बाबाची घरीं परत यावयाची वेळ झाली.

**किन०**—क्या बाईसाब? तुमारा बाबा? जलदी घरकूं आवेगा?

**सगु०**—होय, पण तूं आतां एथून लवकर जा. नाहीं तर ज्यानें तुझा रुमाल नेला तो येईल आणि तुला पुनः नागवील.

**किन०**—पन तुह्मारी निश्चा है के मेरेवास्ते तुमकूं गाली नहीं मिलेगी?

**गोविं०**—नाहीं नाहीं, जा तूं भिऊं नको. राम राम, ये आतां.

**किन०**—(जातांना) अहाहा! कैसे अछे छोकरे लोक हैं.

---

## प्रवेश १०. 

सगुणी, चिमणी, यमुना आणि गोविंदा.

**चिम०**—गोविंदा तुझी आंगठी गेली त्याचें मला फार वाईट वाटलें.

**यमु०**—तूं आह्मांस आज चांगल्या मार्गाची शिक्षा लावली.

**गोविं०**—मला ह्याविषयींची शिक्षा सगुणीनें लाविली. चांगूच्या नीच कर्माचा माझ्या चित्तास खेद झाला. एरवीं एकादें धर्मकृत्य करायास मला मोठा उत्साह वाटतो. आतां आपल्या मुलाम्याच्या आंगठीकडे पाहून मी किती समाधान पावेन.

---

## प्रवेश ११.

मालोजी, सगुणी, यमुना, चिमणी, गोविंदा व दौलतसिंग.

( तीं मुलें जवळजवळ आलीं आहेत. सगुणी आणि गोविंदा चोरून दौलतसिंगाकडे पहाताहेत आणि एकमेकांच्या कानीं लागताहेत. )

मालो०—( यमुनेस आणि चिमणीस ) सुखी असा मुलींनो. माझ्या सगुणीकडे येऊन तुह्मी तिला मान दिलात तेणेंकरून मी तुमचा उपकारी आहें. आतां हा किनऱ्या काय सांगतो आहे, हें मी तुमच्यासमक्ष ऐकणार, तर ह्याविषयीं मला तुमची सला असावी. हा जिन्यांत माझी वाट पहात उभा होता; मी येतांच मला ह्मणाला कीं, तुह्मी आणि मी समक्ष असतां आपणांस कांहीं बोलावयाचें आहे. ( दौलतसिंगास ) ये मुला, तूं काय ह्मणतोस ?

दौल०—( सगुणी आणि गोविंदा ह्यांस ) तुमने किरपा करिके मेरेपर घुसा नहीं होना, ये मैं तुमसें मंगलेताहूं. मेरेकूं बोलना जरूर हुवा; क्यौंकि तुमने जो मेरेपाससे लिवाया ओ मैं तुमारे बाबाकि सलाबिना रखा, वो दुरुस्त नहीं है. मैं खूब जानताहूं के छोकरे लोकोंकेपास आपसकी ऐसी कछु जिनस रहती नहीं है.

मालो०—हा हें काय म्हणतो आहे ?

दौल०—नौकर बोलताहै के ए छोटे महाराजनें मेरेकूं हाक मारी के, आकर इन बीबीलोकोंके सामने किनरी बजाना. इनके साथ दुसरेभी एक छोटे महाराज थे; खूब सुरते, लेकिन बडे लुच्चे.

मालो०—काय माझा मुलगा ?

दौल०—महाराज मेरेकूं माफ करना. यह सखुन मेरे मुहसें आगया. पिछे मैं आया, और जो मेरेकूं आता था सो

हजर किया. इन सखी लोकोंनें मेरेकुं कछु बर्फी, एक रुमाल और मुठी भरके पैसे दिये; कितने थे मेरेकूं मालूम नहीं.

**मालो०**—मग ?

**दौल०**—ओ बर्फी में मेरे अंधे बाबाकूं लेजानेवाला था, सो ओ दंडिला महाराज चोर ले गया. उसकी परवा मैं नहीं कियी होती, लेकिन बर्फी लेकर बाहर भागा. और रस्तेपर छुपकर बैठा. मैं बडे खुसीसें बाहर निकलकर जाने लगा, तद ओ ओचता मेरेपास आया; और उननें जोरा-वारीसें मेरे पाससें रुमाल और सब पैसे छीन लिये. और मेरी किनरी फोडडारी. ये देखो (रडत) मेरी सब दौ-लत; जिससें मेरा और मेरे बाबाका पेट भरताथा.

**मालो०**—अशी गोष्ट कशी होईल ? असें दुष्ट कर्म ! माझ्या मुलाच्या हातून !

**चिम०**—तो जिकडे तिकडे असेंच करितो. सगुणीस पुसाना?

**मालो०**—जा मुला, रडूं नको, मी तुझें भरून देईन. पण गोष्ट सगळी इतकीच ना ?

**दौल०**—( मराठी बोलायास लागतो ) नाहीं महाराज, माझा थोडा सुन. मैं तिकरे अशा दुःख पावला तें वरतमान या छोकरे साहेबापाशीं सांगायासाठीं आला. त्याचेपाशीं माझा तोटा साधायापुरते पैसे नहीं हथे. तवां या बाईसाहेबांनीं मला आपलें सोन्याचें अंगुथान दिलें, आणि या भाऊसाहे-बानें सोन्याची अंगुटी, ओ मेरेसें; अरे ! मैं चुकला, टों-डाशीं हिंदुस्थानी आवत्ये ! तवां ते मी कशी घेऊन जाऊं? माजा बाप मला सांगेल के ओ चोरी करकर मैं आणला तवां मला मोटा विचार पडला, आत्तड्यामंदीं मुजला सम-जला के तुमेरी सवारी घरीं लवकरच येल, तवां इकरेच् उभा रेहिला के ते जिनसा तुमचे सवाधीन करावी. ए घे ते. पण मला किनरी नहीं—हाय हाय रे मेरी किनरी ! ओ मेरे बाबा !

माळो०—आज काय आनंदाची गोष्ट तूं मला सांगितली! आतां मी तुला, कीं माझ्या उदार मुलांनो, तुम्हांला अधिक वाखाणूं? तूं मुळींच मोठ्या दारिद्र्यानें पीडिलेला, त्यांत आणखी तुझें सर्वस्व गेलें. असें असतांही, आपल्यापासून अन्याय्य कर्म घडूं नये म्हणून तुझी वासना! मुला तुझी शाबास आहे. तूं धन्य आहेस.

दौल०—हाँ! खोटा काम नहीं करना. उसमें इतना फायदा है ना? ओ सच है, बुरे काममे मिलाया, उसकूं बरकत कबू नहीं होती. मेरी मय्या और बाबा मुजकूं येहि कहते आये हैं, के बेटा जान गया तो खुब, पन बुरा काम मत कर, इसमें भगवान राजी. अभी महाराजनें मुजकूं किनरीकी मेहेरबानी करना. दुसरा मेरेकूं कछु चाहिये नहीं. सांजसुधी मैं इदर उदर फिरकर रोटी मिलाऊंगा.

माळो०—ह्यावरून मला दिसतें कीं, तुझा बाप आणि तूं कोणी मोठे साधु आहां. चिंता करूं नको, ईश्वर तुझें माझ्या हातून कल्याण करील. तूं आमच्या एथें रहा. प्रथम कांहीं दिवस गोविंदाजवळ ऐस, नंतर माझ्यानें तुझें जें बरें होईल तें मी करीन.

दौल०—क्या! ये छोटेसाहिबके खिजमतमें? क्या आनंदकी बात है! (गोविंदास नमतो) पण, नहिं; (खेद पावून) मेरेसें मेरे बाबाकूं अकीला नहि रखा जाएगा. मेरेबिना ओ बचेगा कैसा? क्या, मैं मीठा मीठा खाऊं और ओ भुका मरे? मैं नरम बिछानेपर सोऊं और उसकूं चटाईबी नहीं मिले. जिससें मैं पैदा हुवा हूं, जिनें मेरेतें बधाया, जिनें मेरेवास्ते आपकी सब कमाई खरची, जो मेरे सुखसें सुखी, और मेरे दुखसें जो दुखी, उसकूं आज बुढ्ढेपनमें मैं डार देऊं? मैं जब छोटा ने नाकुवत था, तद जिनें मेरा मलमूत उठाया; मनमें कछु बीट लाया नहीं, उसकी सेवा डारके आज मैं महाराज तुमारेपास सुख भोगनेकूं कैसा रहूं?

मेरेकूं लोक क्या कहेंगे ? भगवान क्या कहेगा ? मेरा मनभी क्या कहेगा ? और ऐसा करकें मेरेकूं सुख कैसा होवेगा? नहिं नहिं, ये बात कभी होनेकी नंहीं.

**मालो०**—सद्गुणी मुला, तुझा बाप कोण, कोठला आहे ?

**दौल०**—मेरा बाबा हिंदुस्तानका रहनेवाला, अभी बुढ्ढा ने अंधा हुवा है, आगे ओ बडा गावनेवाला था. उसकूं मैं किनरी बजाके पोसता हुं. ओ थोडासा खाता है, ने मैं बी बहोत खाता नहिं. जरासी रोटी और कछु तरकारी ये हमारा खाना, उतना हमकूं भगवान रोजकेरोज देता है. कलकी चिंता हम रखते नहिं. ओ भगवानपर सोंपते है.

**मालो०**—बरें तर, मी तुझ्या बापाचीही सोय करितों. त्याला धर्मशाळेंत आणून ठेवितों. तेथें दुसरे अशक्त ह्मातारे आहेत त्यांबरोबर ह्याचेंही संगोपन होईल. तुला हवें तेव्हां तूं त्यास भेटायास जात जा.

(दौलतसिंग तें ऐकून टिरी पिटून अति हर्षानें घरभर धांवतो.)

**दौल०**—क्या धर्मात्मा ये है! क्या मेरा बाबा ! नहिं, ये सुनकर ओ हरखसे मर जायेगा. मेरेसें अभी इदर रहा नहिं जाताहै, अभीही जाकर उसकूं लेकर आताहूं. (धावत बाहेर जातो; सगुणी आणि गोविंदा ह्यांहीं मालोजीचा हात धरिला आहे; त्याचे डोळ्यांत प्रेमानें आसवें आलीं आहेत तीं तीं पुसताहेत.)

---

## प्रवेश १२.

मालोजी, सगुणी, यमुना, चिमणी, आणि गोविंदा.

**मालो०**—माझ्या लाडक्या मुलांनो ! किती सुखाचा आजचा दिवस झाला असता बरें ! पण त्या पोराच्या द्वाड गुणांमुळें ह्यांत विरजण पडलें ! मला त्याचा खेद होऊं नये. कारण ईश्वरानें हाच मला दुसरा लेंक दिला आहे. माझ्या सद्गुणी

गोविंदा! पहातांना तूं पोटचा नाहींस खरा, पण तुझा थोरपणा पाहून माझें मन तुला पोटच्याहून अधिक समजतें. होय. तूंच माझा लेंक. चांगू कोठें आहे तो? जा! त्याला मजकडे असाच घेऊन ये. ( गोविंदा बाहेर जातो. )

**सगु०**—चार घटका झाल्या, तो मला कोठें दिसला नाहीं किनऱ्या वाजवूं लागला, तेव्हांचा तो त्याची बर्फी घेऊन नाहींसा झाला आहे.

**गोविं०**—( मागें येतो ) त्याला जवळच्या मिठाईवाल्याच्या दुकानाकडे जातांना मीं पाहिलें. मीं गोपाळाला पाठविलें आहे त्याला बलवायाकरितां.

**मालो०**—मुलांनो, माझ्या खोलींत जाऊन बसा. तो आला ह्मणजे मला उत्तर काय करितो तें पाहूं या. तुमच्या साक्षीचें काम पडेल तेव्हां मी तुह्मांस बाहेर हाक मारीन.

**चिम०** आणि **यमु०**—तर आतां आम्ही निरोप घेतों.

**मालो०**—नाहीं; माझ्या लाडक्यांनो! आज तुह्मी आमच्या एथेंच रहा. मी तुमच्या आईबापांस सांगून पाठवितों. आतां मला वाटतें कीं, दौलतसिंग आणि त्याचा बाप एथें येतील, आपण त्यांस मेजवानी करूं; चांग्यानें मला आज मोठ्या दुःखाचा घाय केला, त्याची वेदना तुमच्या संगतीवांचून कमी होणार नाहीं.

**सगु०**—( कानोसा घेते ) मला वाटतें चांगू येत आहे. ( मालोजी खोलीचें दार उघडतो. मुलें आंत जातात. )

---

## प्रवेश १३.

### मालोजी.

मला फार दिवस भय होतें कीं, एखाद्या दिवशीं कांहीं तरी पोराचें वाईट वर्तमान ऐकूं येईल; पण हा असा अधमपणा करील हें मला वाटलें नाहीं. असो, अजून वेळ आहे,

उपाय केला असतां त्याचे दुर्गुण टाकिवतां येतील. हरहर! देवा, इतक्या निकरावर गोष्ट कां रे आणिलीस!

---

## प्रवेश १४.

### मालोजी आणि चांगू.

**चांगू**—बाबा काय आज्ञा आहे?

**मालो०**— तूं कोठें गेला होतास? तूं घरीं नव्हतास काय?

**चांगू**—गुरुजी बाहेर गेले होते; गोविंदा खालीं होता. मी वेळभर वर पढत होतों तों एकट्याला कंटाळा आला.

**मालो०**—तर गोविंदा मुलींसंगतीं खेळायास गेला, तसा तूं कां नाहीं गेलास?

**चांगू**—मीही गेलों होतों, पण त्या माझ्याशीं चांगल्या वागल्या नाहींत.

**मालो०**—हें मला आश्चर्य वाटतें.

**चांगू**—पहिल्यानें त्यांनीं बर्फी खाल्ली, मला बलावलें नाहीं. नाहीं तर नाहीं, पण माझा तिरस्कार केला. मुरांबा, कलिंगड खाल्लें तेंही मला दिलें नाहीं. नंतर गोविंदानें रस्त्यांतला एक हेंदरा किनऱ्याचा पोर आणिला, त्याला त्यांनीं शेर दोन शेर बर्फी दिली; पण मला एक तुकडाही दिला नाहीं. तीं नाचलीं, बागडलीं, पण मला आपल्या मंडळींत घेत ना; तेव्हां मीं तेथें काय करावें? म्हणून दरवाजाकडे लोकांची मौज पहात उभा होतों.

**मालो०**—दरवाजाजवळच होतास, दुसरे कोठें गेला नाहींस? तर रस्त्याच्या नाक्यावर तुझें आणि त्या किनरीवाल्या पोराचें काय झालें? मला वर्तमान लागलें कीं, तूं त्याला मारलें, त्याची किनरी फोडली आणि तो रडत गेला.

**चांगू**—होय तें खरें बाबा; आणि दुसरा कोणी असता तर शिपाई आणून त्याला चौकींत नेता. ऐकावें बाबा, मीं

त्याला बाहेर निघतांना पाहिलें. तेव्हां मीं आपल्या मनांत ह्मटलें कीं, आपण ह्या गरीबास कांहीं द्यावें, कां कीं मला ठाऊक होतें कीं, गोविंदापाशीं कांहीं नाहीं; आणि एवढीशी बर्फी ह्याच्या श्रमाप्रमाणें फार थोडी देणगी आहे. असा विचार करून मीं आपल्या पिशवींतून कांहीं पैसे काढिले; ते मीं त्याला दिले, ते बांधायाकरितां त्यानें रुमाल काढिला. तो पहातों तों माझ्या ताईचा, हा पहा प्रत्यक्ष; मीं त्याला सामोपचारानें सांगितलें कीं, तो मला परत कर. तेव्हां तो शिव्यागाळीवर आला, रुमाल देईना; तेव्हां मला राग येऊन मीं त्याची गचांडी धरिली, आणि माझी त्याची धकाबुकी होतां होतां न समजून माझा पाय त्याच्या किनरीवर पडला.

**मालो०**—(क्रोधास चढून) चूप रहा लुचा! माझ्यानें तुझें ऐकवत नाहीं.

**चांगू**—(त्याजवळ येऊन त्याचा हात धरायास जातो) कां बाबा? माझ्या जिवलगा बाबा, तुला एवढा राग कां आला?

**मालो०**—(त्याचा हात झिटकारतो) जा दुष्टा. मला तोंड दाखवूं नको! तूं मला लाज आणिली. (तो मुलांस खोलींतून बाहेर बोलावितो.)

---

## प्रवेश १९.

मालोजी, सगुणी, यमुना, चिमणी, चांगू, आणि गोविंदा.

**मालो०**—माझ्या मुलांनो, इकडे या. जीं मुलें माझ्या ममतेस योग्य असतील त्यांवांचून मी दुसऱ्याचें तोंड पहाणार नाहीं. तूं चांग्या काळें कर, पुनः माझ्या दृष्टीस पडलास तर चिरीन. पण थांब, पहिल्यानें तूं आपलें पारिपत्य माझ्या मुखानें ऐक, मग जा. (सगुणी आणि गोविंदा ह्यांस) तुह्मांविषयीं काय हा बोलला, तें तुम्हीं ऐकिलेंच असेल.

**सगु०**—होय बाबा; आणि जर आमचा चोखपणा दाखवायाचें प्रयोजन नसतें, तर बाबा तूं अधिक संतापशील ह्मणून तुजपाशीं आह्मी कांहीं सांगतों ना.

**चांगू**—बाबा तिचें तूं कांहींएक खरें मानूं नको.

**मालो०**—( डोळे वटारून ) उगीच ऐस ! तूं लबाड आहेस ह्याविषयीं माझी अगोदरच खातरी आहे. चोरी, खून, हे लबाडीचे परिणाम. त्यांतून चोरी तर तूं केलीच; अंमळ आंगांत शक्ति आली म्हणजे कोणाचा जीवही घेशील ह्यांत संशय नाहीं. चालूं दे सगुणा.

**सगु०**—प्रथम तर आज दोन प्रहरांपासून ह्यानें कांहींएक काम केलें नाहीं. ह्यास भाषांतर गोविंदानें करून दिलें.

**मालो०**—हें खरें गोविंदा ?

**गोविं०**—माझ्यानें नाहीं म्हणवत नाहीं.

**सगु०**—नंतर ह्यानें मुरांब्याच्या रसाची वाटी यमनीच्या साडीवर सांडिली; आणि आम्ही डाग धुऊन काढायाच्या खटपटींत असतां ह्यानें मुरांब्याची बरणी रिकामी केली. आम्हांला थोडा देखील राहूं दिला नाहीं—नंतर बर्फीचें काय झालें तें ( यमुना आणि चिमणी ह्यांजकडे हात करिते ) ह्या सांगतील.

**मालो०**—आतां पुरे. ( चांगूकडे पहातो ) तुझी दांडगाई सगळी माझ्या ध्यानांत आली. जा आतां रात्रीचा आपल्या खोलींत जाऊन बैस; उद्यां सकाळीं मी तुला घराबाहेर हाकून देईन. त्यांत तूं ठिकाणीं आलास तर बरें झालें; नाहीं तर मग दुसरे पुष्कळ उपाय आहेत. तुझ्यासारिखीं द्वाड पोरें लोकांस उपद्रव करितील; त्यांस म्हणतोस काय उपाय नाहींत ? गोविंदा, गोपाळ्यास सांग कीं, हा आपल्या खोलींत असतो कीं नाहीं तें मला येऊन सांग; आणखी असें सांग कीं, गुरूजी बाहेरून आले म्हणजे त्यांना मजकडे पाठीव.

**सगु०** आणि **गोविं०**—( चांगूसाठीं रदबदली करितात. ) माझ्या बाबा ! माझ्या मामा ! आम्हांकडे पाहून त्याचा एवढा अन्याय क्षमा कर.

**माली०**—मी त्याविषयीं एक शब्द कोणाचाही ऐकणार नाहीं. गरिबानें आपल्या कष्टानें जें जोडलेलें त्यावर बलात्कार करून जो तें घेतो, त्याचें पोट भरायाचें साधन फोडितो आणि मातक्यान आपण केलें तें नीट म्हणून प्रपादितो, असा प्राणी ह्या सृष्टींत ठेवूं नये. मी ईश्वराचा मोठा उपकार मानितों कीं, अजून तुम्हांसारिखीं दोन रत्नें मजजवळ आहेत. ह्यापुढें मी तुमच्या सुखानें सुखी असेन. त्या द्वाड पोराचें मला दर्शन नको.

( सर्व निघून जातात. )

---

# मैना.

मैना घ्याहो मैना. कोणाला मैना पाहिजेत ? अहा ! काय चांगल्या मैना आहेत ! असें बोलत एक मनुष्य यमनीच्या दारावरून चालला होता. यमनी तें ऐकून दारीं गेली, आणि पहाते तों एक पांखरेंविक्या डोईवर मैनांचा पिंजरा घेऊन चालला आहे. त्या आंत उड्या मारीत आहेत, ह्या काठीवरून त्या काठीवर बसताहेत आणि मधुर शब्द करिताहेत; तेणेंकरून यमनी मोहित होऊन, केव्हां त्यांजवळ जाईन अशा उत्कंठेनें धांवली; थोडक्यांत चुकलें, नाहीं तर ती ओटीच्या कांठावरून पडलीच असती. " मुली, तुला मैना पाहिजेत ? " असें पांखरेंविक्यानें तिला पुसलें. ती म्हणाली, " पाहिजेत, पण थांब अंमळ, मी आंतून बाबाला पुसून येतें. " त्यानें बरें म्हणून पिंजरा ओसरीवर ठेविला. यमनी धावत धावत बापाकडे जाऊन म्हणते, " बाबा ! बाबा ! लवकर ये ! "

**त्र्यंबकशेट.**—एवढी घाई कशाची आहे यमने ?

**यमनी**.—बाबा, ओटीवर एक पांखरेंविक्या आला आहे. त्याजवळ मैना पुष्कळ आहेत, आणि त्या फार चांगल्या आहेत.

**त्र्यंबकशेट**.—मग, ह्याचा तुला इतका हर्ष कसचा झाला?

**यम**०—बाबा, जर तूं सांगशील तर मी त्यांतली एक मैना विकत घेईन.

**त्र्यंब**०—विकत घ्यायास तुझ्याजवळ पैसे आहेत काय?

**यम**०—हो, आहेत हे माझ्या पिशवींत.

**त्र्यं**०—पण त्या पांखराला चारा कोण घालील?

**यम**०—मी, बाबा, मी आपल्या हातानें चारीन; आणि तूं पहाशील कीं, ती आपणाला माझी म्हणविण्यास फार खुष होईल.

**त्र्यंब**०—होय, पण मला तुझें भय वाटतें.

**यम**०—कसचें बाबा?

**त्र्यंब**०—कीं तूं तिला उपाशीं किंवा तान्हेली एकाद्या दिवशीं मारिशील.

**यम**०—मी, तिला उपाशीं किंवा तान्हेली मारीन? तें मी कधीं होऊं देणार नाहीं. पहिल्यानें तिला खाऊं घातल्याशिवाय मी अन्नाला शिवणारही नाहीं.

**त्र्यंब**०—मुली, तूं विसराळू आहेस, एकाद्या दिवशीं तरी तुला विसर पडेल.

तेव्हां यमनीनें बापापाशीं मैनेस पाळायाचा करार करून आणि त्याचा पदर धरून अशी कांहीं आळ घेतली कीं, शेवटीं त्यानें मैना घेऊन देतों असें म्हटलें; आणि तो तिला घेऊन ओटीवर आला, आणि चांगल्या रंगाची एक सुंदर मैना त्यानें निवडून काढिली. मग यमनीचा हर्ष ब्रम्हांडांत माईना! तिनें पांखरेंविक्यास पैसे द्यावयाकरितां आपली पिशवी झटकन् बापाकडे केली. तींतील पैसे पांखरेंविक्यास देऊन त्र्यंबकशेटीनें आपल्या जवळच्या पैशांचा एक चांगला तारांचा

पिंजरा आणविला, त्याला खालीं खण होते, आणि त्यांत पाणी घालायास बिलोरी भांडें होतें. मग यमनी मैनेस पिंजऱ्यांत घालून सगळ्या घरभर फिरून आईस व बहिणीस आणि चाकरांस हाका मारमारून तिला दाखवूं लागली. कोणीही इष्टमित्र मुलें तिला भेटायास येत, त्यांकडे तिची पहिली गोष्ट मैनेची. ती सांगे कीं, "माझ्या मैनेसारिखा पक्षी त्रैलोक्यांत नाहीं. तिच्या पांखांचा रंग काय! पिसें किती मऊ! बोल काय गोड! चल मी ती तुला दाखवितें. तिचें नांव मीं छबेली ठेविलें आहे." ती मैना यमनीपाशीं फार सुख पावली. यमनी पहाटेस उठली म्हणजे तिचें पहिलें काम हें कीं, मैनेस ताजे दाणे आणि निर्मळ पाणी द्यावें; मग यमनीनें तोंड धुवावें. पोळीतुकडा घरांत झाला असेल तो पहिल्यानें मैनेकडेस यावा. कांहीं गोड तिनें मैनेसाठीं करून बरणींत घालून ठेविलेंच असे. तिला उन्हाचा उपद्रव होऊं नये म्हणून तिच्या पिंजऱ्यावर नित्य हिरवा पाला ती लावी. छबेलीही ते तिचे उपकार जाणे. ती लौकरच यमनीस ओळखूं लागली. यमनीचे पाय वाजले म्हणजे तिनें पांख उघडावे व शब्द करावे. यमनी मुके घेऊन तिचा अर्धा जीव करी. आठ दिवस झाले नाहींत तों ती मैना गायास शिकली आणि मधुर स्वर काढूं लागली. एकाद्या वेळेस तिनें टिपेचा सूर अतिशय लांबविल्यामुळें असें वाटावें कीं, हिचा श्वास जाऊन ही मरेल. तिनें मोठ्या सुरानें गावें, त्या वेळीं सगळ्या घरच्या मनुष्यांचा आत्मा प्रसन्न व्हावा. यमनी तिचे शब्द ऐकत चार चार घटिका तिच्या पिंजऱ्याजवळ बसे. कोणे वेळेस तिला पहात असतां यमनीनें हातांतलें काम विसरावें. यमनी तिला नित्य प्रहर प्रहर गायास शिकवी. असें तिला त्या पांखराचें वेड लागलें. असें चाललें असतां एके दिवशीं बापानें तिला एक चित्रांची वही दिली. तीं चित्रें फार सुंदर होतीं, त्यांकडे तिचें चित्त वेधलें. मग तिनें तीं नित्य पहात बसावें.

तेव्हांपासून तिला मैनेचा अंमळ विसर पडत चालला. मग तीस मैना साद घाली, तो तिनें ऐकूं नये. मैनेस हिरव्या-शेंगा किंवा भाकर जी नित्य मिळत असे, ती एकदा आठ दिवसांत मिळाली नाहीं. ती यमनीनें शिकविलेलीं गोड गोड गाणीं रागिणींवर म्हणे, परंतु व्यर्थ. यमनीचा वाढदिवस आला तेव्हां बापानें तीस एक बाहुली दिली, ती मिळाल्यापासून तर यमनी मैनेस अगदींच विसरली. त्या बाहुलीचें नांव तिनें आवडी ठेविलें. तिला नेसवण्याखालीं, शृंगार करण्याखालीं, तिच्यासंगतीं बोलण्याखालीं आणि तिला हातीं घेऊन इकडे तिकडे नाचिवण्याखालीं, सकाळपासून संध्याकाळपर्यंत यमनीचा सगळा वेळ जाई; मग कोठें संध्याकाळीं थोडेंसें खाणें मैनेस मिळे. कोणे दिवशीं तिला अगदींच उपास पडे. एके दिवशीं त्र्यंबकशेटीची दृष्टि पिंजऱ्याकडे गेली, आणि पहातो तों मैना आंत उपडी पडली आहे, तिचीं पिसें विखुरलीं आहेत, व मान पाय आंखडून तिचा गोळा झाला आहे. तिला किंचित् धुगधुगी मात्र राहिली होती; श्वास घ्यायासही शक्ति नव्हती. तें पाहून तो म्हणतो, "यमने, अग ह्या तुझ्या मैनेस काय झालें ?" तें ऐकून तिचें तोंड खरकन उतरलें. ती म्हणाली, "नाहीं बाबा, काय झालें तें कोण जाणे, मला हिचा अगदींच विसर पडला." असें म्हणून ती घाबरून कांपत कांपत दाण्यांचा करंडा आणायास घरांत धावत गेली. त्र्यंबकशेटीनें पिंजरा खालीं काढला; आणि पहातो तों दाण्याच्या खणांत व पाण्याच्या प्याल्यांत कांहीं नाहीं. मग तो म्हणतो, "अरेरे ! ह्यांत धान्याचा एक दाणाही नाहीं ! प्याल्यांत पाण्याचा थेंबही नाहीं ! हाय रे बिचाऱ्या पक्ष्या ! अरे तूं निर्दयाच्या हातीं कसा रे पडलास ! मला हें असें जर पुढच्यें समजतें, तर मीं तुला विकतच घेतलें नसतें." घरांतील माणसें त्या पिंजऱ्याजवळ येऊन म्हणूं लागलीं, "अहा ! गरीब बिचारी मैना! गरीब रे देवा !" मग त्र्यंबक-

शेटीनें भांड्यांत कांहीं दाणे घातले आणि निर्मळ पाणी प्याल्यांत ओतलें. त्याला त्या मैनेस सावध करायास मोठा प्रयास पडला. यमनी तोंड लपवून तेथून निघाली, ती आपल्या खोलींत जाऊन रडत बसली. तिनें रडून रडून आंसवांनीं ओंचे सगळे ओले केले. दुसऱ्या दिवशीं त्र्यंबकशेटीनें विचार केला कीं, ही मैना आपल्या शेजाऱ्याचा मुलगा मोरू आहे त्यास बक्षीस द्यावी; तो यमनीपेक्षां शंभर वांट्यांनीं हिचें पालनपोषण चांगलें करील असा आहे. तें ऐकून यमनीनें मोठा अनर्थ मांडिला, व मोठमोठ्यानें हेल काढून ती रडूं लागली; आणि दुःखाचे उद्गार टाकून म्हणाली, "अरे माझ्या पांखरा! माझे छबेले मैने! बाबा मी तुझ्या पायां पडतें! एक वेळ मला क्षमा कर; आणि ही मैना मजपाशीं असूं दे. आजपासून मी जीवंत आहें तोंपर्यंत कधीं हिला विसरणार नाहीं." त्र्यंबकशेटीस तिचा दया आली, आणि त्यानें पुनः ती मैना तीस दिली, आणि तीस फार रागें भरून सांगितलें कीं "पुढें असें झाल्यास क्षमा होणार नाहीं. कारण तूं विचार कर कीं, ह्या बिचाऱ्या पांखरास आपण बंदींत टाकल्यावर ह्यानें आपल्या पोटास दाणा कसा मिळवावा? तुला भूक लागेल तेव्हां तुला खायास मागतां येतें, पण छबेलीस भूक लागली तर तें आपल्या भाषेनें तिनें लोकांस कसें समजवावें? जर आतां कधीं तूं हिला उपाशीं किंवा तान्हेली ठेविशील तर मी—" ते शब्द ऐकून यमनीच्या डोळ्यांस पाण्याचें भरतें आलें. तिनें बापास वेंग मारिली; पण खेदानें तिला एक शब्द बोलवला नाहीं. मग यमनी पुनः छबेलीशीं खेळूं लागली. पुढें एक महिना गेल्यावर त्र्यंबकशेट बायकोस घेऊन कांहीं कामाकरितां दुसऱ्या गांवीं जाऊं लागला. त्या वेळीं तो यमनीस म्हणाला—"यमने, छबेलीस संभाळ हो." तीं उभयतां गाडींत बसून निघालीं नाहींत तों यमनी धावत पिंजऱ्याजवळ गेली आणि तिनें मैनेस दाणापाण्याची बेगमी केली. कांहींका घटिकांनीं तिला करमेनासें

झालें. तेव्हां ती सोबतिणींस बोलावून त्यांबरोबर बाहेर फिरायास गेली; संध्याकाळीं ती आपालिपा खेळली; नंतर तिनें फुगडी घातली. असें करितां करितां मोठी रात्र झाली, तेव्हां तिचा खेळ संपला. नंतर ती थकली आणि निजायास गेली. दुसऱ्या दिवशीं ती उजाडतां उठली. तिचें ध्यानमन सगळें खेळाकडे, म्हणून ती तशीच शेजारघरीं वाराणशी आणि बची यांकडे गेली; इकडे छबेलीस उपास पडला. असा दुसरा दिवसही तिचा खेळतांना गेला. छबेलीची आठवणही तीस झाली नाहीं. तिसऱ्या दिवशींही तसेंच झालें. चौथ्या दिवशीं त्र्यंबकशेट गांवाहून परत आला. तो त्या दिवशीं परत येणार हें यमनीच्या लक्ष्यांत राहिलें नव्हतें. त्र्यंबकशेटीनें येतांच यमनीचा मुका घेऊन आधीं छबेलीचें वर्तमान पुसलें. यमनी अमळ घाबरून म्हणाली, "ती बरी आहे बाबा." आणि तेव्हांच पाणी घेऊन ती पिंजऱ्याकडे धावली; आणि पहाते तों आंत मैना चोंच वांसून व पांख पसरून उलथी पडली आहे. तिचें प्रेत पाहून यमनीनें मोठ्यानें किंकाळी फोडिली. ती ऐकून घरांतील सर्व मनुष्यें धावलीं. तेव्हां पक्ष्याची ती दशा पाहून त्र्यंबकशेट म्हणाला, "अहा रे पक्ष्या! काय दुःखाचें हें मरण तुला आलें! जातेवेळेस मीच तुझी मान मुरगाळून गेलों असतों तर ह्यापेक्षां ती व्यथा तुला सुसह होती. हाय हाय! भुकेनें आणि तहानेनें व्याकुळ होऊन किती दुःखानें तुझा प्राण गेला असेल! असो, तूं दैवाचा, कीं असल्या निर्दय पोरीच्या हातून सुटलास!" त्या समयीं यमनीस असें झालें कीं, 'दे माय धरणी ठाय;' जर त्या वेळेस धरणी फाटती तर यमनी आंत उडी टाकिती!

त्र्यंबकशेटीनें त्या मैनेच्या पोटांत पेंढा भरून तीस कडीपाटास टांगून ठेविलें. तिजकडे यमनीच्यानें पहावेना. जेव्हां जेव्हां तिजवर तिची दृष्टि जाई, तेव्हां तेव्हां तिचे डोळे आंसवांनीं भरून येत. ती बापास नित्य विनवी कीं; "बाबा, ती

मैना माझ्या दृष्टीवेगळी काढ." तो ह्मणे, "नाहीं." नंतर किती एक दिवस तिची प्रार्थना ऐकुन त्यानें तो पक्षी तेथून काढिला. मग जेव्हां केव्हां यमनी कांहीं सांगितलेलें काम जपून करीत नसे, तेव्हां त्र्यंबकशेटीनें ती मैना पुनः तेथें टांगावी, आणि सर्वांनीं म्हणावें "अहा गे बिचारे छबेले! ह्या यमनीनें तुला कसें गे हाल करून मारिलें!" म्हणजे यमनीस मोठा पश्चात्ताप होऊन तिनें आईबापांच्या आज्ञेंत चालावें.

---

## स्वतंत्र व्हावयास इच्छिणारीं मुलें.

**कामू**—अहा बाबा! मला वाटतें कीं, मी मोठा असतों तर बरें होतें! मोठा तुझ्या इतका.

**आबाजी**—माझ्या लाडक्या, तुला असें कां वाटतें?

**कामू**—एवढ्यासाठीं कीं, मग मला कोणाच्या आज्ञेंत रहाणें नको; माझ्या मनास येईल तें मी करीन.

**आबा॰**—मला वाटतें कीं: मग तूं मोठे चमत्कार करिशील.

**कामू**—ह्यांत काय संशय? तसें होईल तर दाखवीन.

**आबा॰**—आणि जाई, तुला पण स्वतंत्र व्हावेंसें वाटतें गे?

**जाई**—होय बाबा, मलाही तसेंच वाटतें.

**कामू**—अहा! जर आम्ही दोघें स्वतंत्र झालों, तर मग काय पाहिजे?

**आबा॰**—बरें तर मुलांनो, हें तुमचें कोड मी पुरवीन. उद्यां सकाळपासून तुम्हांस मोकळीक देतों कीं, जें तुमच्या मनास येईल तें करा.

**कामू**—बाबा, तूं आमची थट्टा करितोस.

**आबा॰**—नाहीं, मी खरेंच म्हणतों. उद्यां तुमची आई, मी किंवा दुसरीं कोणी घरांतील मनुष्यें तुम्हांस कांहीं आडकाठी करणार नाहींत.

**कामू**—अहाहा! तशीं झालों असतां आम्ही किती सुखी होऊं!

**आबा०**—मुलांनो तितकेंच नव्हे, मी ती मोकळीक उद्यांचेच दिवसापुरती देतों असें नाहीं; तर जोंपर्यंत तुम्ही होऊन माझ्या पाठीस लागाल कीं, नको बाबा, आतां तुझा अधिकार तूं फिरून घे, तोंपर्यंत ती देईन.

**कामू**—अहा! असें झालें तर मग आम्ही फार दिवस स्वच्छंद वागूं.

**आबा०**—बरें तर, तुम्ही आपलीं आपणांस संभाळतीं झालींत हें पाहून मला संतोष वाटतो; तर आतां उद्यांपासून तुम्ही मोटीं मनुष्यें व्हायास सिद्ध व्हावें, आणि मनास येईल तें करावें.

असें बोलणें होऊन तीं मुलें निजायास गेलीं. दुसरा दिवस उगवला तों तीं उजाडतांच उठावीं तीं प्रहर दिवस येईपर्यंत आंथरुणावरच होतीं. अधिक वेळ निजतात त्यांचें आंग जड होतें, कांहीं सुचत नाहीं, तसें कामूस आणि जाईस झालें. शेवटीं कोणी हाक न मारितां, तीं आपले आपण कावरींबावरीं झालेलीं उठलीं. मग त्यांच्या मनांत आलें कीं, आपण सगळा दिवस हवें तें करूं. तेणेंकरून त्यांच्या जिवास अंमळ संतोष वाटला. मग कामू जाईस म्हणतो, "ताई, आपलीं जेवणें झाल्यावर आपण पहिल्यानें आज काय करावें बरें?

**जाई**—कां? खेळावें.

**कामू**—काय खेळावें?

**जाई**—आपण गंजिफांनीं खेळूं.

**कामू**—तो खेळ हिडिस, मला आवडत नाहीं गडे.

**जाई**—बरें तर, आपालिपा खेळूं.

**कामू**—काय! आपण दोघेंच?

**जाई**—तर विटीदांडू, नाहीं तर सुपाऱ्यांनीं.

**कामू**—मला असले खेळ आवडत नाहींत.

**जाई**—बरें तर तुझ्या आवडीचे कोणते असतील ते सांग.

**कामू**—गडे, आपण काठीचा घोडा करून खेळूं.

**जाई**—अहारे ! लहान मुलींस तो खेळ काय शोभेल !

**कामू**—तो नाहीं तर घोडा खेळूं. तूं घोडा हो, आणि मी हाकणार होतों.

**जाई**—होय तर ! चाबूक मारायाला ! त्या दिवसाची मला अजून आठवण आहे !

**कामू**—तें मी काय दाटून करितों गे ? तूं उडत चालत नाहींस म्हणून मारायाचें कारण पडतें.

**जाई**—होय, पण मला लागतें, म्हणून मी तसला खेळ खेळत नाहीं.

**कामू**—नाहीं, नाहीं, नाहींना तूं खेळत ? बरें तर ससा कुत्रा खेळशील ? मी पारधी होतों, आणि तूं ससा हो, चल धावूं लाग, मी पाठीस लागतों.

**जाई**—छत् ! मला तुझी पारध नको ती, माझ्या पाठीस लागून तूं मला घाबरें करणार !

**कामू**—तुला माझा कोणताही खेळ आवडत नाहीं, तर मी तुशीं कधीं खेळणार नाहीं; ऐकिलें ?

**जाई**—मी ही तुशीं खेळणार नाहीं; हें पण ऐकिलें ?

असें बोलून तीं दोघें दोहों कोंपऱ्यांस रुसून उभीं राहिलीं; तीं तशींच तेथें फार वेळ होतीं; एकमेकांशीं बोलतना, कीं एकमेकांकडे पहातना. इतक्यांत दहा घटिका दिवस आला. मग दोन प्रहर लवकरच भरतील, म्हणून कामू बहिणीजवळ येऊन म्हणतो, "बरें तर, तुला जें आवडतें तेंच मी करीन. चल आपण सुपाऱ्यांनीं खेळूं ; एकेक डावास बारा बारा सुपाऱ्यांचा पण."

**जाई**—पण मजजवळ सुपाऱ्या नाहींत. तूं माझ्या पन्नास सुपाऱ्या देणें आहेस त्या पहिल्यानें दे, म्हणजे खेळायास येतें.

**कामू**—होय, पण त्या मी कालच्या दिवशीं देणें होत्या; आजच्या नव्हत.

**जाई**—असें ! तर त्या देण्यापासून तूं सुटलास का ?

**कामू**—जे स्वतंत्र आहेत ते कोणाचें कांहीं लागत नाहींत.

**जाई**—बरें तर, ही तुझी ठकविद्या मी बाबांस सांगेन.

**कामू**—पण आतां मजवर बाबांची सत्ता नाहीं.

**जाई**—असें आहे तर मी तुशीं खेळत नाहीं.

**कामू**—तुझी इच्छा.

पुन्हा तीं एकमेकांवर चडफडून दोघें दोहों कोनांस गेलीं. कांहीं वेळ गेल्यावर कामू शीळ घालूं लागला, जाई गाऊं लागली; तो कुरकुरूं लागला, ती श्वास टाकूं लागली. एक तास पुनः गेला आणि दोन प्रहर होत आले. पुढें कामूनें रागानें आपली छडी खिडकींतून बाहेर झोंकिली; जाईनें आपली बाहुली कोनांत आदळली. तीं एकमेकांकडे पहात, पण काय बोलावें तें त्यांस सुचेना. शेवटीं जाई बोलली, चल कामू मी तुझा घोडा होतें.

**कामू**—आतां ठीक. बरें घोड्याला लगाम पाहिजे तो? माझ्याजवळ लांब दोरी आहे; ही पहा, ही तूं आपल्या तोंडांत घाल.

**जाई**—मी ती तोंडांत नाहीं घालणार. माझ्या कमरेस बांध, नाहीं तर दंडाला बांध.

**कामू**—हें तूं वेड्यासारिखें काय बोलतेस गे? घोड्याला तोंडावांचून दुसरे कोठें का कोणी लगाम देतें?

**जाई**—पण मी कांहीं खरा घोडा नव्हें.

**कामू**—तरी पण, आपणास घोडा असें मानून तुला तसें केलें पाहिजे.

**जाई**—त्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

**कामू**—मी अष्टौप्रहर घोड्याच्या पागेंत असतों; तर मजपेक्षां काय तुला ह्या कामांत अधिक समजतें?

**जाई**—तूं किती दिवसपर्यंत ती धुळींत मळविली आहेस; ती मी तोंडांत नाहींच घालणार.

**कामू**—तर मी ती तुला दुसऱ्या कोठें बांधूं देणार नाहीं. त्यापेक्षां मीं तुशीं खेळूं नये हें चांगलें.

**जाई**—जसें तुला बरें दिसेल तसें.

आतां तीं तिसऱ्यानें रुसलीं, तीं अशीं कीं मागल्यापेक्षां अधिक एकमेकांवर दांत ओंठ खाऊं लागलीं. मग कामूनें छडी फेंकली होती ती तो आणायास गेला; तों छडी कोणीं मोडून टाकिली होती. जाईनें भुईवरून बाहुली हातीं घेतली, तों तिचीं चिरगुटें फिटलीं होतीं. मग कामू उसासा टाकूं लागला; जाई रडूं लागली. इतक्यांत जेवणाची वेळ झाली. आबाजी त्यांस पुसायास गेला कीं, "हेंवें असलें तर पान वाढितों." तो दोघांसही तशीं पाहून म्हणतो, "मुलांनो, तुम्हांस आज झालें तरी काय?" तीं म्हणालीं, "कांहीं नाहीं बाबा." आणि डोळे पुशीत तीं त्याच्यामागें जेवायाच्या जागीं गेलीं. त्या दिवशीं जेवायास नानाप्रकारचीं पक्वान्नें केलीं होतीं. तीं जेवायास बसलीं त्या वेळीं त्यांस बाप म्हणतो, "मुलांनो, तुम्ही हीं पक्वान्नें फार खाऊं नका; ह्यांपासून तुमची प्रकृति बिघडेल; पण हो. तुह्मी स्वतंत्र आहां त्या पेक्षां तुमच्या इच्छेस येईल तें व तितकें खा प्या." असें बापाच्या तोंडांतून निघतांच, एकानें मोठमोठे लाडवांचे तुकडे करून गट्ट केले. दुसऱ्यानें चटण्या, सांभारीं ह्यांची धण घेतली. तें पाहून त्यांची आई नवऱ्याच्या कानाशीं लागून म्हणते, "अहो, आतां हीं मुलें दुखण्यांत पडतील." आबाजी म्हणाला, "पडतील तर खरीं, परंतु पडूं दे; तसें होईल तरच त्यांची खोड मोडेल, आणि त्यांस समजेल कीं, स्वतंत्रपणापासून मुलांस असें भोगायाचें पडतें; म्हणून मी त्यांस अडथळा करीत नाहीं." दादल्याचा कल पाहून बायकोही उगीच राहिली. मग तीं मुलें ओ येई तों जेवलीं; जेवून थोडा वेळ गेला तों कामू जाईस म्हणतो, "चल माझ्याबरोबर." असें म्हणून तिला तो वाडींत घेऊन गेला. आबाजी हळूच त्यांना नकळत मागून जाऊन आडोशीं उभा

राहिला. त्या वाडींत एक मोठें पाण्याचें टांकें होतें. त्याच्या कांठाशीं चिमुकलीशी एक नाव होती. तींत कामूस बसावेंसें वाटलें. जाईनें त्यास वारिलें. ती ह्मणाली कीं, "आपण आंत बसूं नये, बाबा रागें भरतील." कामू ह्मणाला, "बसूं नये कां? आपण स्वतंत्र आहों हें तूं विसरलीस वाटतें?" जाई म्हणाली, "होय रे होय. खरें!" मग ती भावाचा हात धरून नावेंत बसली. आबाजी अंमळ त्यांच्या जवळ जवळ गेला. पण त्यांच्या दृष्टीस पडला नाहीं. त्यानें मनांत आणिलें कीं, टांकें उथळ आहे. जरी हीं आंत पडलीं तरी काढायास अवघड पडणार नाहीं; म्हणून तो उगाच मौज पहात उभा राहिला. नाव कांठाशीं बांधलेली होती ती सोडून मध्यें ढकलून न्यावी असें त्यांनीं मनांत आणिलें, परंतु ती दोरीनें बळकट बांधली होती, ती सोडितां येईना, तेव्हां कामू म्हणतो, "बरें तर, आपणांस आंत बसून फिरणें साधत नाहीं तर नाहीं; पण झोंकवून तरी पाहूं या." असें म्हणून तो ह्या अंगीं त्या अंगीं तीस झोंकवितो आहे, तों त्याचा कल जाऊन तो पाण्यांत पडूं लागला. त्यास जाई हातीं धरून सांवरायास गेली, तों दोघेंही पाण्यांत पडलीं. तें पाहून आबाजी वाऱ्याच्या वेगानें धांवला; आणि पाण्यांत शिरून त्यानें दोघांस काढिलें. तीं अबधाकानें अर्धमेलीं झालीं होतीं. त्यांस घरीं आणून शेकलीं संवरलीं तों, अधाशीपणानें खाल्लें होतें तेणेंकरून त्यांच्या पोटांत कळा उठूं लागल्या, मस्तक दुखूं लागलें, मूर्छा आली, कांप सुटला, व जीव गुदमरूं लागला. अशा विपत्तींत त्यांचा दिवस गेला, व तीं रडतां कुंथतां थकलीं. त्यांस रात्रीस थोडी झोंप आली न आली. प्रातःकाळीं आबाजी त्यांस पुसतो, "मुलांनों, तुमचा काय समाचार आहे?" तीं खोल शब्दानें म्हणालीं, "समाचार चांगला नाहीं बाबा, रात्रीं आम्हांस स्वस्थ झोंप आली नाहीं. आमचें डोकें व पोट अजून दुखत आहे." तो म्हणाला, "बापड्यांनों, तुमची मला काकळूत वाटते. असो; पण आतां पुनः आजच्या

दिवशीं तुम्ही आपल्या स्वतंत्रपणाचें काय करणार आहां, तें मला सांगाल काय? आजही स्वतंत्रता तुम्हांकडेसच आहे, ही तुम्हाला आठवण आहेना?" तीं म्हणालीं, "आतां स्वतंत्रता पुरे बाबा." तो म्हणाला, "असें कां मुलांनों म्हणतां? कालच्या दिवशीं तुम्हीच म्हणालां होतां ना, कीं दुसऱ्याच्या आज्ञेत वागणें हें फार वाईट आहे?" कामू म्हणाला, आमच्या मूर्खपणाचें आम्हांस चांगलें पारिपत्य झालें." जाई म्हणाली, "आम्ही ह्या गोष्टीची फार दिवस आठवण ठेवूं बाबा."

**आबा॰**— तर अतःपर तुम्ही स्वतंत्रता इच्छीत नाहीं?

**कामू**— नाहीं, बाबा नाहीं. तूं सांगशील तसें करावें, ह्यांत चांगलें आहे.

**जाई**— त्यांत आमचें बरें होईल.

**आबा॰**— ह्याचा पुरता विचार करा, कांकीं जर मीं आपला अधिकार पुनः घेतला, तर तुम्हांस सांगतों कीं, मी पहिल्यानें जें सांगेन तें तुम्हांस वाईट वाटलें तरी करावें लागेल.

**कामू**— कांहीं चिंता नाहीं बाबा; तुला जें बरें दिसेल तें आम्ही करायास एका पायावर उभीं आहों.

**आबा॰**— बरें तर मजजवळ ही हिरवी फकी आहे, हिला सोनामुखी म्हणतात. हिचा स्वाद वाईट आहे, पण ज्यास अजीर्ण होतें, त्यास ही बहुत गुणकारी आहे. आतां जर तुम्ही माझें ऐकणार, तर ही फकी ह्या क्षणीं घ्या. माझें कसें ऐकतां तें पाहूं बरें.

**कामू**— घेतों, बाबा घेतों.

**जाई**— ती जरी विखासारखी कडू असली तरी मीं घेईन.

आबाजीनें त्यांना तें औषध दिलें. त्यांनीं, पूर्वी करीत असत तशीं वेडींवांकडीं तोंडें न करितां तें संतोषानें घेतलें. तें अधिक संतोषानें कोण घेतो ह्याविषयीं त्यांचा पण लागला. त्या औषधानें लवकरच गुण आला, आणि तीं बरीं झालीं. त्यानंतर त्यांपासून कधीं अन्याय होई तेव्हां पारि-

पल्याचा धाक दाखविणें झालें तर त्यांचीं आईबापें त्यांस म्हणत कीं, "आम्ही तुम्हांस स्वतंत्र करूं." त्या शब्दानें त्यांस असें भय पडे कीं, तुम्हांस बंदीखान्यांत टाकूं असें म्हटल्यानेंही त्यांना तसें भय वाटत नसे.

---

## ८. कांटेझाडें.

कोणी एक ओगलजी नांवाचा गृहस्थ काश्मीर देशीं रहात होता. तो वैशाखमासीं एके दिवशीं सायंकाळीं आपला मुलगा अन्या ह्यास बरोबर घेऊन एका लहानशा डोंगरीवर बसला होता, आणि तेथून समोर दृष्टीस पडणारे रमणीय पदार्थ त्यास दाखवीत होता. त्या वेळीं सूर्य अस्तास जात होता, तेव्हां त्यांस अशी कल्पना झाली कीं, तो सर्व विश्वास सोनेरी रंगाचें वस्त्राचें पांघरूण घालीत आहे काय! किंवा हे डोंगर सोन्याचेच आहेत काय! अशा कल्पना करीत ते सुख घेत बसले असतां, तिकडून एक धनगर आपला कळप चारणीवरून घराकडे वळवून चालला होता. त्यानें सुस्वर गायन केलें तें त्या बापलेंकांच्या कानीं पडून ते तिकडेच पाहूं लागले. तो धनगर चालला होता त्या वाटेंत दोहीं बाजूंनीं कांटेझाडें होतीं, म्हणून जें मेंढरूं त्या झाडांच्या आंगून जाई, त्याची कांहीं तरी लोंकर त्यांवर अडके. तें पाहून अन्यास संताप आला; आणि तो म्हणतो, "बाबा, त्या गरीब मेंढरांची लोंकर तीं झाडें कशीं चोरिताहेत तें पाहिलेंना! अशीं दुष्ट झाडें देवानें कशास उत्पन्न केलीं? तर सर्व मनुष्यें एकमत करून ह्यांचा सृष्टींतून निःपात कां करीत नाहींत? मला वाटतें कीं, पुनः एक वेळ तीं मेंढरें तिकडून गेलीं असतां त्या गरीबांच्या अंगावरील पांघरूण सगळें नाहींसें होईल. तर मी अतःपर असें होऊं देणार नाहीं. उद्यां दिवस उजाडतां कोयता घेऊन येतों आणि त्या सर्व झाडांचा फडशा उडवितों. बाबा, तूंही माझ्याबरोबर कुऱ्हाड घेऊन ये, म्हणजे जेवणाची वेळ झाली नाहीं तों सगळा उद्योग उरकून टाकूं."

**ओगल्जी**—मुला, मला तुझ्या मसलतीचा अंमळ विचार केला पाहिजे; तो होईपर्यंत तूं त्यांवर उगीच रागाऊं नको. तूं विचार कर कीं, आश्विनमासीं आपण माणसें काय करीत असतों ?

**अन्या**—काय करीत असतों बाबा ?

**ओग०**—तूं पाहिलें नाहीं का, कीं धनगर लोक मोठमोठाल्या कातऱ्या घेऊन मेंढ्यांची सगळी लोंकर काढून घेतात; त्यांच्या अंगावर थोडकी देखील ठेवीत नाहींत.

**अन्या**—तें खरें, पण बाबा, त्यांना तिचीं चिरगुटें करायाचीं असतात; आणि ह्या झाडांस तसें कांहीं प्रयोजन नसतां हीं उगीच दुष्टपणानें असें करितात.

**ओग०**—ह्या लोंकरीचा त्या झाडांस काय उपयोग आहे, हें तुला अद्यापि ठाऊक नाहीं; आणि त्यांस उपयोग असो किंवा नसो, पण मला तूं सांग कीं, आपणांस पाहिजे एवढ्यासाठींच आपण दुसऱ्याचें घ्यावें हें योग्य कीं काय ?

**अन्या**—पण बाबा, तूंच मला सांगितलें कीं, आश्विनाच्या सुमारास ह्यांची लोंकर आपोआप गळून पडत असते. तर ती उगीच इकडे तिकडे गळून फुकटावारी जाईल त्यापेक्षां कामीं लागली तर चांगलें कीं नाहीं ?

**ओग०**—तूं खरें म्हटलें. ईश्वरानें ह्या पशूंस लोंकरीचें पांघरूण दिलें आहे. त्यांपासून तें आपण माणसें घेतों; नाहीं तर आपणांस थंडीचा उपद्रव फार सोसावा लागता.

**अन्या**—पण झाडांना कांहीं पांघरुणाचें काम नाहीं. म्हणून हीं लबाड आहेत; तर आपण योजिलें आहे तें केल्यावांचून सोडूं नये. उद्यां मी हीं सगळीं कापून टाकणार; तूं माझ्याबराबर ये हो.

**ओग०**—खरोखर येईन. पण आतां तर घरीं जाऊं चला. उद्यांचें उद्यां.

तीं चोरटीं झाडें मी एकटा तोडून टाकीन अशा कल्पनेनें

अन्याच्या अंगांत आवेश चढला; ह्मणून त्याला रात्रभर झोंप आली नाहीं. दुसऱ्या दिवशीं पराक्रम करायाचा तो त्याच्या मनांत घोळत होता. दुसऱ्या दिवशीं पहांटेस पांखरें शब्द करूं लागलीं नाहींत तोंच अन्यानें आपण सिद्ध होऊन ओगलजीस उठविलें. तो उठून तयार झाला. त्याच्या मनांत कीं, कांटेझाडांचें होईल तें होऊ; परंतु प्रातःकाळाची शोभा मुलाच्या दृष्टीस पडेल. मग ते हातांत हत्यारें घेऊन चालते झाले. अन्या हैसेनें पुढें पुढें चालूं लागला. त्याला मिळवून घ्यावयास ओगलजीस फार श्रम पडत. ते जेव्हां त्या झाडांच्या जवळ जवळ आले, तेव्हां सहस्रावधि लहान लहान पांखरें त्या झाडांकडे येताहेत आणि भोंवतीं फिरताहेत, असें त्यांनीं पाहिलें. ओगलजी बोलला, "मुला, हळू हळू! आतां आपण अंमळ झाडें कापायाची गोष्ट बोलूं नये; आणि ह्या बिचाऱ्या पक्ष्यांस उपद्रव करूं नये. पहिल्यानें आपण कालच्या जागीं बसून पाहूं या कीं, हीं पांखरें एथें इतकीं कां झटलीं आहेत." ते डोंगरीवर जाऊन बसले आणि पाहूं लागले तों आदल्या दिवशीं झाडांना लोंकर अडकली होती ती ते पक्षी धूम नेताहेत. काळे, निळे, पिवळे, हिरवे, चमत्कारिक रंगाचे, सुंदर, सुस्वर शब्द करणारे, असे पक्षी आले आहेत; आणि त्यांनीं लोंकरीची मोठी लूट मांडिली आहे. त्या वेळीं अन्या आश्चर्यानें चकित झाला आणि बापास विचारतो, "बाबा, हे पक्षी ह्या लोंकरीचें काय करीत असतील बरें?" तो ह्मणाला, "मुला, तुला समजलें, कीं भगवंतास मुंगीची देखील काळजी आहे. तो ज्या प्राण्यास जें पाहिजे तें अनेक युक्तींनीं पोंहोंचवितो; आणि सर्वांचें संरक्षण करून सुखी ठेवितो. हाच पहा केवढा चमत्कार! हे पक्षी पिलांकरितां कोटीं करितात; त्यांस मऊ आंथरूण पाहिजे तें त्यांस ह्या झाडांपासून प्राप्त होतें. ते लोंकर नेऊन ती कोट्यांत आंथरून आपल्या लहान लहान पिलांसहवर्तमान सुख पावतात. असलीं हीं भलीं, उदार, कांटेझाडें, ज्यांवर तूं काल उगीच रागावलास, तीं इत-

कीं उपयोगी आहेत; पाहिलेंना? हीं संपन्नांपाशीं अधिक आहे त त्यांजपासून घेऊन गरिबाचें उणें पूर्ण करितात. तर आतां येतोसना? आपण तीं कापूं. अन्या ओशाळून ह्मणतो, "ईश्वर मजपासून तसें न करवो." ओगलजी म्हणतो, "तूं खरें म्हटलें मुला. हीं आपली जोडें अशा परोपकारास लावितात, त्या अर्थी ह्यांचें सदा कल्याण असो, आणि ह्यांना उपद्रव न होवो."

---

## ९. निंबाजी.

पूर्वीं देवनगरामध्यें एक वेडा रहात होता. त्याचें नांव निंबाजी. तो एकावर एक पांच सहा टोप्या डोईस घालून बाहेर निघे, व कमरेस चार पांच चिरगुटें बांधी, आणि दोन तीन फाटकीं कांबळीं खांद्यावर घेई. त्याच्या बुद्धीस चळ झाला होता, परंतु त्यापासून कोणास उपद्रव नसे. त्याला फारच कोणीं त्रास दिला तर मात्र त्यानें पिसाळावें. तो रस्त्यांत चाले त्या वेळेस किती एक द्वाड पोरें त्याच्या पाठीस लागत, आणि म्हणत, "निंबाजी, अरे निंबाजी, तूं तीं टोप्या कांबळीं किती पैशांस देशील रे?" तो बोलला नाहीं, म्हणजे त्याची 'हुर्यो हुर्यो' तीं करीत. त्यांत कितीएक दुष्ट मुलें असत, तीं त्याला दगडही मारीत. निंबाजी बहुतकरून तें सर्व साही, पण एकादे वेळेस पिसाळे, आणि धूळ धोंडे मुठी भरून पोरांवर मारी. एके दिवशीं तो दयारामशेट सावकार ह्याच्या दारावरून चालला आहे, आणि पोरें पाठीमागें लागून गोंगाट करिताहेत, तें ऐकून दयारामशेट खिडकींतून पहातो, तों आपला मुलगा हरीही त्या मंडळींत आहे. तें पाहून खिडकी लावून तो उगाच आंत गेला. जेवणाच्या वेळीं त्यानें हरीस पुसलें, "मुला, तो कोण होता रे, ज्याच्यामागें लागून तुम्ही कुई कुई करीत होतां?"

हरी—बाबा, तो वेडा निंबाजी, तुला ठाऊक नाहीं?

दयाराम—गरीब बिचारा! तो कशानें वेडा झाला असेल बरें?

---

१. मिळकत.

हरी—लोक म्हणतात कीं, त्याचें मोठें वतन होतें, त्याचा वाद फार दिवस पडला होता, त्यांत तो हरला, तेव्हांपासून त्याच्या बुद्धीस चळ झाला आहे.

दया०—मुला, त्याचें जेव्हां सर्वस्वहरण झालें, त्या वेळीं तो जर तुला म्हणता कीं, "अरे माझ्या हरी, माझें दैव फुटलें; फार दिवस स्वस्थपणानें जें वतन मी भोगीत होतों, त्यास मी आज मुकलों; माझें सर्व घरदार वादाच्या भरीस पडलें; मला आतां गांवांत रहायास ठिकाण नाहीं; गांवाबाहेरही नाहीं; आतां मी काय करूं? माझ्यापाशीं एक दमडीही राहिली नाहीं." असें जर तो तुला म्हणता तर त्या वेळीं तुझ्यानें त्याची थट्टा करवती?

हरी—भगवान असें मजपासून न करवो. असा कोण दुष्ट आहे कीं, दुसरा विपत्तींत पडला असतां त्यास हसेल? मी तर अशास साहाय्य करीन.

दया०—तर काय, तो तेव्हांपेक्षां आज तुला सुखीसा दिसला? ज्याचें सर्वस्व जाऊन बुद्धिही गेली!

हरी—बाबा, आज तर त्याची अधिक करुणा यावी.

दया०—तर जो शुद्धीवर असतां तुझ्या दयेस पात्र होता, त्याची अशी दशा झाल्यावर तूं त्यास आज छळिलें कसें? आणि त्यावर धोंडे फेंकिले कसे?

हरी—बाबा मी चुकलों, माझा अन्याय क्षमा करा.

दया०—तुला पश्चात्ताप झाला त्या अर्थी मीं क्षमा केली; परंतु माझ्या क्षमेनें होत नाहीं; दुसऱ्याही कोणाची क्षमा मागितली पाहिजे.

हरी—मी समजलों; तुझा अभिप्राय कीं, निंबाजीपाशीं क्षमा मागावी?

दया०—निंबाजीपाशीं कां?

हरी—ह्यासाठीं कीं मीं त्याचा अपराध केला.

दया०—तें खरें. निंबाजी जर शुद्धीवर असता तर त्याची

क्षमा तुला मागितली पाहिजे होती; परंतु क्षमा म्हणजे काय तें आज त्याला समजत नाहीं; त्या अर्थीं त्याची क्षमा मागून व्यर्थ आहे पण मुला तुला वाटतें खरें, कीं ज्याचा आपण अपराध केला असेल त्यापाशीं क्षमा मागावी ?

हरी—तें तूंच मला शिकविलें आहे बाबा.

दया०—दीनावर दया करावी, अशी कोणाची आज्ञा आहे ती तुला ठाऊक आहे काय ?

हरी—होय. अशी देवाची आज्ञा आहे.

दया०—तर तूं ती मोडली म्हणून देव रागावला नसेल ?

हरी—असेल बाबा, म्हणून मी आज रात्रीं त्याची प्रार्थना करीन आणि क्षमा मागेन.

हरीनें रात्रीं तसें केलें. देवापाशीं आपला अपराध सांगून पश्चात्तापपूर्वक त्यानें क्षमा मागितली. त्यावर कितीएक दिवसपर्यंत तो निंबाजीच्या वाटेस गेला नाहीं; आणि दुसऱ्या मुलांसही जाऊं नका म्हणून सांगे; असें असतांही एके दिवशीं निंबाजीच्या मागें पोरें लागलीं होतीं त्यांत तो मिसळला. तो कांहीं त्यास छळावें ह्या बुद्धीनें गेला नाहीं, पण दुसरीं पोरें त्याच्या काय काय खोड्या करितात ती मौज पहावयाकरितां गेला. मग पोरांबरोबर हाही निंबाजी निंबाजी ! हुर्यो ! हुर्यो ! म्हणून ओरडूं लागला; असें करितां करितां सर्वांचा पुढारीपणा ह्याकडेस आला. शेवटीं गलबा फारच झाला, त्या वेळीं पिसाळून निंबाजीनें पोरांना दगड मारिले; त्या वेळीं एक मोठा धोंडा हरीच्या गालास चाटून कानास लागला. तो कान तुटायाचाच, पण थोडक्यांत चुकलें. मग हरी घरीं आला तों त्याचा कान रक्तबंबाळ झाला आहे, आणि तो धाय धाय रडत आहे. तेव्हां त्यास बाप म्हणतो, " देवानें तुला ठीक शासन केलें."

हरी—बाबा, पण दुसऱ्या मुलांनीं माझ्यापेक्षां अधिक त्याच्या खोड्या केल्या, असें असतां देवानें त्यांस शासन थोडें कां करावें, आणि मलाच अधिक कां करावें ?

**दया०**—त्याचें कारण ऐक. मुला, दुसऱ्या मुलांपेक्षां तुला चांगलें समजलें होतें कीं, हें पाप होय; असें समजूनही तूं तें केलें; म्हणून त्यांपेक्षां तुझा अन्याय मोठा. ह्याकरितां जो मुलगा देवाची किंवा आपल्या वडिलांची आज्ञा मोडि-तो त्यास अधिक शिक्षा होते, हें योग्यच होय.

---

## १०. दाणे टिपणारी पोर.

### नाटक एकअंकी.

पात्रें.

भिवराव ..................जमेदार.
मिरोबा ..................त्याचा मुलगा.
हिराबाई ..................त्याची मुलगी.
जनाबाई ..................एका सरदाराची बायको.
यमनी.....................तिची मुलगी.
हरजी.....................जमेदाराचा चाकर.

**स्थळ**—एक शेत नुकतेंच कापलेलें आहे; त्यांत पुष्कळ सजगुऱ्यांचे भारे पडले आहेत; त्या शेताच्या एका बाजूस भि-वरावाचा वाडा आहे; दुसऱ्या बाजूस किती एक झोंपड्या व दुसरी गांवढेगांवाची रचना आहे.

---

### प्रवेश १.

यमनी.

**यमनी**—(दुसऱ्या शेतांतून भरून आणलेली सजगुऱ्यांची टोपली हातांत घेऊन भिवरावाच्या शेतांत एका भाऱ्या-जवळ बसली आहे.) चला; बरेंच काम झालें. अहा! आज माझ्या आईस काय आनंद होईल! (टोपलीकडे पाहून समाधान पावते.) त्या म्हाताऱ्या कापणी करणाऱ्या

बाबानें मला एकदाच टोपली भरून कणसें दिलीं. तो किती भला म्हणून सांगूं! अहाहा! मी दिवसभर जरी इकडे तिकडे हिंडतें तरी ह्याच्या अर्धेंही मला मिळतेंना. ईश्वर त्याचें बरें करो! आतां मला वाटतें कीं, आपण ह्या शेतांतलीं कांहीं कणसें टिपावीं. (तीं टोपलींतलीं कणसें दोहों हातांनीं चेंपिते.) हीं अंमळ दडपलीं तर ह्यांत दहावीस आणखी मावतील; कांहीं पदरांतही घेतां येतील. (ती उठते, पदराचीं दोन टोंकें एका हातानें धरून एका हातानें जमा केलेलीं कणसें त्यांत घालिते; इतक्यांत दुरून गोंगाट ऐकून म्हणते.) अरे कर्मा! तो कोण माझ्या आंगावर येतो आहे? येऊ बिचारा, मीं कोणाचा अन्याय केला नाहीं.

---

## प्रवेश २.

### यमनी आणि हरजी.

हरजी—(यमनीचा हात धरून) अगे चोरट्ये पोरी, मीं तुला भली चोरी करतांना धरली!

यमनी—काय तुम्ही म्हणतां महाराज? मी चोर नव्हें, साव आहें.

हर०—साव आहेस! तूं चोर नव्हेस (तो तिच्या हातांतून टोपली हिसकून घेतो) तर ह्या टोपलींत हें काय आहे?

यम०—सजगुऱ्यांचीं कणसें; पहाना?

हर०—तर हीं कणसें ह्या तुझ्या टोपलींत उत्पन्न झालीं काय?

यम०—अहा! असें जर होतें तर मग मला शेतांत इतकी मेहनत घेऊन जमा करायाचें काम नव्हतें.

हर०—तर हीं चोरीचीं असें अर्थात् झालें.

यम०—महाराज, असें म्हणूं नका. मी उपाशीं मेलें आणि माझी आईही उपाशीं मेली, तरी तुम्ही म्हणतां ही गोष्ट आमच्या हातून घडणार नाहीं.

हर०—मी शपथ घेऊन सांगेन कीं, हीं आपाप तुझ्या टोपलींत येऊन पडलीं नाहींत; पडलीं काय ?

यम०—अरे देवा! आपण शपथ करून मला भिववितां, पण माझें ऐकाल तर खरें ? मी त्या समोरच्या शेतांत टिपायास गेलें होतें, तेथें एक भला म्हातारा बाबा होता, त्यानें मला टिपतांना पाहिलें; आणि तो म्हणाला, "गरीब बिचारी पोर, पहा ती काय श्रम घेते आहे; मी तिला कांहीं धर्म करीन." तेव्हां जवळ सजगुऱ्याचे भारे पडलेले होते त्यांतून दोन ओंजळी कणसें तोडून त्यानें माझ्या टोपलींत टाकिलीं; आणि तो म्हणाला, "जो दीनास देतो, त्यास ईश्वर पुष्कळ देतो."

हर०—होय होय, तें मी समजलों. आमच्या शेतांतून कणसें तोडिलीं तीं तुला पलीकडच्या शेतांत म्हातारा होता त्यानें दिलीं, नव्हे आं ?

यम०—असें नाहीं, तर तुम्ही जाऊन स्वतः त्याला पुसा.

हर०—मी जाऊन स्वतः त्याला पुसूं ? होय, वाट पहा. मीं तुला एथें धरिलें इतकें मला पुरे.

यम०—पण मी सांगतें कीं, मी तुमच्या एकाही भाऱ्यास शिवलें नाहीं. हीं थोडींशीं कणसें माझ्या ओंटींतलीं, हीं मात्र एथें टिपलीं आहेत; कां तर मला वाटलें कीं, असें केलें असतां त्यांत कांहीं अन्याय होत नाहीं. असें असतां जर तुम्हांस वाटत असेल कीं, तसें मीं करूं नये, तर तीं परत द्यावयास मी तयार आहें. घ्या हीं तुमचीं तुम्ही.

हर०—नाहीं नाहीं; आतां तसें होणार नाहीं. हीं टोपलींतल्यांत घाल, आणि ही टोपली जेथें जाईल तेथें चल. ये माझ्याबरोबर आतां चौकीवर.

यम०—(भिऊन) काय गा, हें असें काय म्हणतां, माझ्या दादा ?

हर०—होय, आतां माझ्या दादा, आं ? मीं तुला जाऊं

दिलें तर तूं ह्याहूनही मला चांगला म्हणशील, नाहीं बरें? मी सांगतों तूं निमूट चौकीवर चल; चल लवकर.

**यम०**—अहो बाबा, अहो, तुम्हांला शपथ आहे. असें करूं नका. तुम्हांस दाखविलीं त्यांहून अधिक मीं एथून एकही घेतलें नाहीं; खरोखर सांगतें. मी सगळा दिवस घरीं गेलें नाहीं तर माझी आई मला काय बरें म्हणेल? आणि मी चौकींत पडलें असें हें जर ती ऐकेल तर मग ती प्राणच टाकील!

**हर०**—तर काय मोठा घात होईल? ती मेली तर गांवची पीडा गेली.

**यम०**—(रडूं लागते) तुम्हांस जर ठाऊक असतें कीं, ती किती चांगली आई आहे, आणि आम्ही किती दुर्बळ आहों, तर तुम्हांस करुणाच येती!

**हर०**—मी एथें लोकांवर दया करायासाठीं राहिलों नाहीं, माझ्या धन्याचा जे अन्याय करितील, त्यांस पकडून चौकींत घालायासाठीं राहिलों आहें.

**यम०**—पण जर माझ्यासारख्यानें अन्यायच केला नाहीं तर—

**हर०**—एक सगळ्या टोपलीभर दाणा चोरून आणखी दुसरा आपला भलेपणा सांगते? काय नवल पहा! चल चल, चालूं लाग माझ्या बरोबर.

**यम०**—अहो बाबा! मजवर दया करा! पाहिजे तर माझी सगळी टोपली घ्या. घेतली तर एवढ्या दाण्यांनीं तुम्ही कांहीं मातबर होणार नाहीं; पण मला जाऊं द्या; मी तुमच्या पायां पडतें! माझ्या आईकडे दृष्टि देऊन तरी मला सोडा, माझ्या आईची काय ती मीच एक आहें!

**हर०**—मीं तुला सोडिलें तर तुझ्या आईकरितां सोडणार नाहीं. ती मेली तर माझें काय गेलें? पण पोरी, तुझें रडें पाहून दया येते. आतां तूं जा. टोपलीची आशा धरूं नको. न्यायाच्या दिवशीं न्यायाधीश तुला थोडाबहुत

दंड करील तितका दंड मात्र दे; नाहीं तर तूं चौकींत जाशील; अथवा तो तुम्हांला गांवाबाहेर हाकून देईल.

---

## प्रवेश ३.

### यमनी.

**यमनी**—(एकटी भुईवर बसते आणि एका भाऱ्यावर डोकें टेंकून किती एक पळेंपर्यंत आंतल्या आंत रडते; नंतर उठून चोहोंकडे पहाते.) अहा! तो गेलाच! द्वाड मेला. माझीं कणसें, टोपली, सर्व कांहीं घेऊन गेला, आणखीही माझ्या आईस आणि मला काय करील तें न कळे! (अंमळ विसावा घेऊन) अहाहा! ते पक्षी किती तरी दैववान! त्यांस कांहीं दाणे तरी घेऊं देतात, आणि मी—पण कोण जाणे, एथें कोणी मेला द्वाड त्यांवर बंदूक घेऊन टपत नसेल हें कशावरून? मी त्या पांखरांस भेडावून उडविलें, मग मी जाईन; नाहीं तर ह्या भाऱ्यावर डोकें टेंकलें म्हणून एकादी शिक्षा करूं लागतील—काय करूं! (कोणी येताहेत असें पाहून) तीं दोन मुलें येताहेत; तीं कोण असावीं बरें?

---

## प्रवेश ४.

**मिरोबा, हिराबाई आणि यमनी.** (डोळे पुसते आहे.)

**मिरोबा**—अगे, तूंच काय आमचीं कणसें चोरिलीं? आणि तुलाच काय आमच्या चाकरानें धरिलें? (यमनी उसासा टाकिते, तिच्यानें उत्तर देववत नाहीं.)

**हिराबाई**—(तिजकडे न्यहाळून पहाते, आणि भावास एकीकडे सारिते.) ही मूल मला भली दिसते. मिरू, पहा ती कशी रडते आहे! तिला अधिक छळूं नको, तिला मोठें दुःख होईल; आणि आपण इतक्या थोड्याशा कण-

सासाठीं असें करूं नये. (ती तिच्याजवळ जाते) उगी मुली उगी, तूं कां रडतेस?

**यम०**—मजवर खोटा आळ घालितात. तुम्हांला वाटत असेल कीं, मीं अन्याय केला.

**मिरो०**—तर काय तूं अन्याय केला नाहीं?

**यम०**—नाहीं, माझा तुम्ही संशय धरूं नका. मी त्या शेतांत दाणे टिपायास गेलें होतें, तेथें एका म्हातारेबाबानें माझ्या टोपलींत कणसें घातलीं; कणसें भुईवर पडलीं असतील त्यांतून थोडीशीं टिपावीं, म्हणून ह्या शेतांत आलें, तों तुमच्या चाकरानें मला भाऱ्याजवळ उभी पाहून मजवर आळ घेतला; तो माझी टोपली घेऊन गेला; आणि त्यानें मलाही चौकींत नेलें असतें, पण मी रडून त्याच्या काकुळती केल्या, म्हणून सुटलें.

**हिरा०**—अरेरे! त्यानें मजदेखतां तुला छेडायाची होती, म्हणजे कसें आहे तें त्यास समजलें असतें! आमचा बाबा भला आहे; गरिबांस दुःख देऊं देत नाहीं. तो एथें असता तर तुला त्यानें तेव्हांच जाऊं दिलें असतें.

**मिरो०**—आणि अजून तरी तो तुझी टोपली तुला परत करवील. मी खरेंच सांगतों.

**यम०**—(आनंद पावून) तुला हें खचित वाटतें, माझ्या लहानग्या धन्या?

**हिरा०**—मिरू आणि मी जाऊन त्याची प्रार्थना करितों; तूं स्वस्थ ऐस, धर्म करण्याची गोष्ट त्याचे जवळ काढिली म्हणजे त्यास आनंद होतो. तुझी टोपली तर त्याला सांगितल्यावांचून आम्ही आणून देऊं.

**यम०**—अहा माझे बये! काय तुम्ही देववान! तुम्हांस कोणाची गरज न लागतां तुम्ही उलटें दुसऱ्याचें साह्य करितां!

**मिरो०**—तर तूं काय फार गरीब आहेस मुली?

यम०—एथें येऊन इतका श्रम घेऊन जी भाकरीकरितां दाणे टिपते, ती गरीबच असेल बाबा.

हिरा०—काय तूं भाकरीकरितां दाणे टिपतेस ? मी समजलें कीं ओंब्या भाजून खायाकरितां. कोणे वेळेस जवळ कोणी नसलें ह्मणजे आम्ही तसें करीत असतों.

यम०—अग आई ! तसें नव्हे. माझी आई म्हणाली, कणसें सडून दाणे काढूं. ते दळून त्यांचें पीठ करूं भाकरीकरितां.

हिरा०—त्यांचे ते दाणे किती निघायाचे होते ! आणि त्यानें तुमची किती बेगमी होणार होती !

यम०—एक दोन दिवसांपुरते तर निघाले असते—ते खाऊन दोन दिवस गेले, मग पुढें परमेश्वर आहे.

मिरो०—बरें तर, मी एक तुला पावली देतों, म्हणजे तुम्ही एक दिवस अधिक काढाल. ही कोरी म्हणून मौजेनें मीं आपल्याजवळ ठेविली होती. ही घे.

यम०—अहा ! पावली ! माझ्यानें ही घेववत नाहीं !

हिरा०—(हसते) पावली ! घे ती, तूं कां भितेस ? माझी पिशवी मजजवळ असती तर मीही तुला पुष्कळ दिलें असतें.

मिरो०—(हातांत पावली धरून तिजकडे करितो आहे.) चल घे मुली. (यमनी अंमळ लाजून त्याजकडून पावली घेते, आणि त्याला दुवा देते.) इतक्यानें झालें नाहीं, मी आतां कारभाऱ्याकडे धावत जातों, आणि त्याजकडून घेऊन तुझी टोपली तुला देतों. जर त्यानें दिली नाहीं तर मग त्यास—

यम०—अहो बाबा ! तुम्ही मजकरितां इतक्या खटपटींत पडूं नका. तुम्ही म्हणतां कीं, मी तुझें साहाय्य करीन, इतकें मला पुष्कळ आहे.

हिरा०—तूं रहातेस कोठें तें मला सांग.

यम०—गांवाच्या तोंडींच.

मिरो०—तर आम्हीं अगोदर तुला कधीं पाहिलें नाहीं तें ?

कापणीच्या दिवशीं आम्ही बाबाबरोबर वर्षास एथें येत असतों.

**यम०**—गांवांत येऊन आम्हांस नुकतेच आठ दिवस झाले आहेत. आम्ही गिरजाऊ म्हातारीच्या घरीं असतों. ती माझ्या आईवर फार ममता करिते.

**हिरा०**—काय, गिरजाऊ म्हातारीच्या घरीं तुम्ही असता?

**मिरो०**—आम्ही तिला ओळखतों. आमचा बाबा तिला कधीं कधीं बागांत वेणायाकरितां बोलावीत असतो.

**हिरा०**—तूं मला आपल्या आईपाशीं घेऊन चलशील?

**यम०**—तुमच्यासारखीं थोर मनुष्यें–आम्हां गरिबांच्या घरीं–मग तर आमचें काय भाग्य!

**हिरा०**—नाहीं, नाहीं, आमचा बाबा आम्हांस इतकें मोठें मानून घेऊं देत नाहीं; तो म्हणतो कीं, जशीं दुसरीं मनुष्यें तशींच आम्ही आहों; पण मी आलें असतां दुसरी तर तुम्हांला कांहीं अडचण नाहीं?

**यम०**—कांहीं नाहीं. तुम्ही आलां असतां माझीं कणसें गेलीं आणि टोपली गेली, त्याविषयीं माझ्या बयेचें समाधान कराल; आणि त्या कारभाऱ्यानें भय घातलें आहे त्याचें—

**मिरो०**—त्याचें तूं कांहीं भय धरूं नको. माझी ताई तुझ्या आईकडे जाते आहे, आणि मी धावत त्याच्यामागें जातों आणि मला वाटतें कीं—तुम्ही ह्या ठिकाणीं परत याल नाहीं बरें?

**यम०**—जर तुमची मर्जी असली तर—

**मिरो०**—तूं परत आली नाहींस तों तुझी टोपली एथें ठेविलीच आहे असें समज.

**यम०**—मी आईसही एथें आणीन. ती तुम्हांला दुवा देईल.

**हिरा०**—चल लवकर मजबरोबर. (ती यमनीचा हात धरून तिजबरोबर तिच्या आईकडे जाते.)

---

## प्रवेश ५.

### मिरोबा.

मिरोबा—( आपणाशीं ) माझी बहीण आणि मी किती सुखी आहों ! कीं आह्मांला ह्या मुलीसारखें दाण्यांचीं कणसें मिळवून आणून पोट भरायाचें पडत नाहीं ! मला ह्या मुलीच्या मुद्रेवरूनच दिसतें कीं, ती ह्याहून चांगली स्थिति भोगायास उत्पन्न झाली आहे, ह्यांत कांहीं संशय नाहीं. गांवच्या दुसऱ्या मुली हेंदऱ्या दिसतात तशी ही दिसत नाहीं. बाबा माझें खास ऐकेल. अहा ! बरेंच झालें. हरजीस बरोबर घेऊन तोच येतो आहे; आणि टोपलीही येते आहे.

---

## प्रवेश ६.

### मिरोबा, भिवराव, आणि हरजी.

मिरो०—( बापाकडे धावत जातो ) बाबा, बरें झालें तूं आलास ! ( हरजीच्या हातास झोंबतो ) दे मला ती टोपली

हर०—हळू हळू, रावजी माझा हात मोडाल.

भिव०—मिरू, तुला ही टोपली कशाला पाहिजे ?

मिरो०—ही त्या गरीब मुलीची, ह्या द्वाडानें तिच्या कणसांसुद्धां हिसकून घेतली आहे. आतां मी तुला तें सगळें सांगतों बाबा.

हर०—असें काय ? जो कोणी नीटपणें चाकरी करितो आणि चोरास सामील होत नाहीं तो द्वाड झाला काय ? तर मग चांगली गोष्ट आहे ! मग देशमुख मला तैनात कशाला देतात ?

भिव०—हरजी, मी तुला जेव्हां तेव्हां सांगतों कीं, निरुद्योगी, लुचे असे लोक शेतावर येऊन उपद्रव करितील त्यांचें निवारण कर. भणंग भिकाऱ्यास पकड आणि चौकींत घाल असें मीं सांगितलें नाहीं. कोणी भलीं मनुष्यें

दारिद्र्यानें पीडून जाऊन माझ्या संपत्तींतून घांसभर अन्न घेऊं इच्छितात, किंवा इकडे तिकडे पडलेलीं कणसें टिपतात, त्यांस बिलकुल तुझा उपद्रव नसावा.

हर०—आपण दाणा काढून आणल्यावर मग हवें तितकें कां तीं टिपीतना ? मी मना करीत नाहीं. पण अजून सगळा एक भारा तेथें असतां—

मिरो०—( थट्टेनें ) दाणा घरीं आणून पुनः शेत नांगरल्यावर असें कां ह्मणेनास ? तेव्हां मग फार टिपायास सांपडेल खरेंच !

हर०—रावजी, ह्या कारभारांत तुह्मांला समजत नाहीं. तुह्मी उगीच असा. ती चोर नव्हे कशावरून ?

मिरो०—हरहर ! चोर ! ती चोर ! तिनें मला सांगितलें कीं, मीं एक देखील कणीस एथून घेतलें नाहीं.एक ह्मातारा पलीकडच्या शेतांत होता त्यानें माझी टोपली कणसांनीं भरून दिली.

हर०—ही गोष्ट फार चांगली ! तिणें तुह्मांस सांगितलें ! ती केवढी प्रामाणिक ! पण समजलां, मीं तिला भाऱ्याजवळ धरिलें आहे बरें !

भित्र०—दाण्यांचीं कणसें तोडीत असतां ?

हर०—तें मी नाहीं ह्मणणार. ती माझ्या अगोदर काय करीत होती तें मला ठाऊक नाहीं. पण तुह्मी पहा कीं, ती ह्मातान्यानें कणसें दिलीं ह्मणून ह्मणते, ती गोष्ट खोटी नव्हे बरें ? गांवढेकर—आणि तो तिला इतका धर्म करील—हें तुह्मीं खरें मानतां ?

मिरो०—तर मी ह्मणतों कीं, तीं कणसें तिला ह्मातान्यानें दिलीं. तिनें असें मला निक्षून सांगितलें; आणि अशी भली मुलगी लबाड बोलणार नाहीं, ही माझी खातरी आहे.

हर०—रावसाहेब, खरेंच सांगा बरें, आपण आजपर्यंत कधीं लबाड बोललां आहां कीं नाहीं ? असें असतां आह्मी तुह्मांस भलेच ह्मणतों.

मिरो०—( बापास ) बाबा, तुह्मी ऐकतां ना, हा हरजी मला कसें टाकून बोलतो आहे तें? (हरजीस रागानें) मी लबाडी केली असली तर मग मी द्वाड मुलगा खरा, पण मीं कधीं केली नाहीं; आणि आज त्या लहान मुलीनेंही केली नाहीं तर आतां ह्यांत लबाड कोण तें उघड दिसतें.

भिव०—मिरू, अंमळ हळू; तुझें भाषण ऐकून माझी खातरी झाली. कोणी चोरींत आढळला नाहीं तोंपर्यंत आपण आपल्याकडून त्यास साव म्हणून मानावें; परंतु दुसरा कोणी त्यास चोर म्हणून मानीत असेल त्यावर रागावूं नये. यत्न चालेल तों नम्रतेनें त्याची खातरी करून द्यावी, आणि तो वास्तविकपणें त्याचें स्वरूप ओळखी असें करावें.

हर०—तसें नव्हे रावसाहेब. त्याहून मला हें चांगलें दिसतें कीं, प्रथम सर्वांस लुच्चे असें मानावें, मग जितका भला ह्मणून प्रत्ययास आला तो मात्र भला! रस्त्यावर बैल पाहिला असतां मी त्यास मारका ह्मणून समजून पलीकडून जातों. तो उपद्रविक असो कीं नसो, आपण चौकस असावें; त्यांत तोटा नाहीं. ज्यांत संशय नाहीं तो मार्ग चांगला.

भिव०—चांगली गोष्ट! तुझ्यासारिखेंच सगळे मानूं लागले तर मग समागम कोणाशीं करावा? आणि मी तसें करितों तर तुशीं मशीं गांठ कशी पडती? तुझ्यासारिख्या ह्मातान्याचें चालावें ह्मणून मी तुला ह्या गांवावर विश्वासाची चाकरी कां देतों? तुला शिपाईगिरीच्या चाकरीवरून सरकारानें दूर केलें होतें, आणि तुझ्या वागणुकीचा दाखला तुजपाशीं नव्हता; तितक्यावरच तुला लुच्चा मानून मीं कोतवालाच्या स्वाधीन केलें नसतें?

हर०—तें खरें, आणि हेंही खरें कीं मी चोर नव्हे.

भिव०—होयरे. मला तूं भला असा अनुभव आला ह्मणूनच अजून माझ्या चाकरींत टिकला आहेस, पण प्रथम

जेव्हां मीं तुला ठेविलें तेव्हां तुझें तोंड पाहून आणि वचनाव-रच ठेविलें ना? कीं त्या वेळीं मला दुसरें कांहीं प्रमाण होतें?

मिरो०—बाबा, जर तूं तोंडावरून आणि शब्दावरून परीक्षा करिशील, तर मुलीचें खरें मानिशील इतकें हरजीचें मानणार नाहींस.

हर०—आं, रावजी! असें काय? जर माझ्या तोंडाकडे पाहून बाबांची खातरी होते आहे अशी तिजविषयीं होईल, तर मग मी हें तुमचें सगळें खरें मानीन.

मिरो०—हः हः, काय हा जांबुवंत चांगला दिसतो!

मित्र०—छत्; मिरू, असें ह्मणूं नये. बरें, पण हरजी तूं त्या मुलीस ओळखतोस?

हर०—होय रावसाहेब; कांहीं वळखतों, कांहीं नाहीं. आज दहा दिवस तिला मी तिच्या आईबरोबर फिरतांना पहातों. पण तीं एथें कशीं आलीं आणि कां आलीं, हें तुह्मांस गांवचे चौकसनीस आहेत ते नीटपणें सांगतील. मला जर पुसाल तर मी स्पष्ट सांगतों कीं, ह्यांस गांवांत घेऊन त्यानें भिकार वाढविलें, हें कांहीं चांगलें केलें नाहीं.

मिरो०—बरें तर त्याविषयीं जो खर्च पडेल तो मी करीन—होय मी करीन जा.

हर०—रावजी, तुह्मांपाशीं स्वपराक्रमाचें कांहीं आहे?

मिरो०—मजपाशीं नाहीं. पण माझ्या बाबापाशीं तर पुष्कळ आहे!

हर०—रावसाहेब, मी खरेंच सांगतों. ह्या मायलेकींविषयीं, सगळा गांव कुरकुरतो आहे; आणि जर अंमलदारांस असें अवदान मारूं दिलें—(आंगठा तर्जनीवर चोळून पैक्याची खूण करितो) कांकीं माझी खातरी आहे चौकसनिसांनीं—

मिरो०—बाबा पहा तुह्मीं. हा चौकसनिसांसही वाईट ह्मणतो, मी त्यांस हें कळवीन.

भिव०—हळू, मुला. (हरजीस) हरजी, माझ्या मतें तुझी अशी संशयी प्रकृति चांगली नव्हे. तर आतां मलाहि तुजविषयीं संशय घेणें प्राप्त आहे; कारण कीं, तिला तूं आपल्या शेतांत भाऱ्याजवळ पाहिलें म्हणून अटकळ करितोस कीं, तिणें टोपली तेथें भरिली; आणि त्या गरिबांस गांवांत वस्तीस येऊं दिलें त्यावरून कमाविसदारानें लांच घेतला असें म्हणतोस. बरें तर, आतां मीही म्हणतों कीं, तिजपासून पैसे किंवा तमाखू तुला मिळाला नाहीं, म्हणून तूं तिची टोपली अटकाविली; नाहीं तर तिला तूं जाऊं देतास.

हर०—रावसाहेब, आपणास वाटतें कीं—

भिव०—तुला लोकांविषयीं जसें वाटतें तसें लोकांस तुजविषयीं कां वाटूं नये?

हर०—बरें आहे रावसाहेब आतां आपण कांहींच बोलूं नये. सगळें भिकार येऊन तुमचें शेत, वाडी, गांव लुटून कां नेईना? माझें काय गेलें? पण आतां मी ही टोपली कोटीवाल्यापाशीं नेऊन देईन.



मिरो०—नको नको बाबा, इतकी मजवर दया करा.

भिव०—हरजी, तुला त्या म्हातारीच्या घरीं टोपली नेऊन देऊन तिच्या मुलीपाशीं क्षमा मागायाची पडेल.

हर०—क्षमा, रावसाहेब क्षमा! तुम्हींही असें म्हणावें! काय-मी जाऊं आणि क्षमा मागूं? कशाकरितां? मीं तिचा अन्याय केला असें मला वाटत नाहीं.

मिरो०—एवढ्यासाठीं कीं, विनाकारण तूं तिला तसदी दिली आणि तिजवर चोरीचा आळ घेतला, म्हणून तुला क्षमा मागणें प्राप्त आहे; समजलास?

हर०—आणि टोपलीही दिली नाहीं, आणि क्षमाही मागितली नाहीं, तर काय होणार?

भिव०—मीं जर तुला हकनाहक छळिलें, तर मला तुजपाशींही क्षमा मागितली पाहिजे. आतां तुला जर लाज

वाटत असली तर मी स्वतः टोपली नेतों आणि तुझ्या वांटची क्षमा मागतों.

हर०—तर मिरूरावजी, इतकें काम तुम्हीच करा.

मिरो०—हो! मी सिद्ध आहें. पण बाबा, आपली ताई तिच्या आईची समजाविशी करायाकरितां तिजबरोबर गेली आहे, ती तिला घेऊन लवकर परत येणार आहे, मी तिची अंमळ वाट पहातों.

हर०—असें आहे तर एथें माझें काम नाहीं; (तो पुटपुटत चालता होतो) आतां ह्या गांवीं इतकें भिकार होईल कीं, आम्हांस लवकरच भीक मागत जायाचें पडेल.

---

## प्रवेश ७.

### भिवराव आणि मिरोबा.

मिरो०—बाबा, तो काय बोलला तें ऐकिलें ना?

भिव०—होय लाडक्या, पण मी त्याचें कांहींच मनास आणीत नाहीं.

मिरो०—पण असा वाईट माणूस तूं कां ठेविला आहे?

भिव०—तो वाईट नाहीं मुला, तो आपल्या हितास अतिशयच जपतो, त्यामुळें कोणे समयीं असा बहकतो. एरवीं तो मोठा सचोटीचा मनुष्य आहे; आणि एकनिष्ठ चाकर आहे.

मिरो०—पण तो वांकडा चालतो आहे तर?

भिव०—तूं ऐकिलें नाहीं, तो म्हणाला कीं, तिचा अन्याय केला असें मला वाटत नाहीं? तर त्याचा अन्याय इतकाच कीं, तो अगदीं हुकुमाप्रमाणें करायास जातो. मनुष्य पाहून व गोष्टीचें तारतम्य पाहून काम करावें हें त्यास समजत नाहीं.

मिरो०—मी हें समजलों नाहीं बाबा; मला हें नीट समजाविशील?

भिव०—होय मुला, तें असें कीं, त्याला जेव्हां मीं ठेविलें, तेव्हां सांगितलें होतें कीं, गांवांतून लुच्चे, लबाड हाकून काढ, व त्यांना कोतवालाकडे नेऊन शिक्षा करीव; म्हणजे भिकाऱ्याच्या वेषानें चोरीवर जे पोट भरितात, आणि गांवांत येऊन माझ्या कुळांस जे ठकवितात, त्यांविषयीं हा हुकूम दिला होता.

मिरो०—हां हां! आतां मी समजलों. तो खऱ्या भिकाऱ्यासही चोरांत मोजितो. कोणास म्हातारपणामुळें, दुखण्यामुळें किंवा दुर्दैवामुळें भीक मागणें प्राप्त होतें, तें तो लक्ष्यांत आणीत नाहीं.

भिव०—खरें बाळा, एकच गोष्ट प्रयोजनवशात् तशी मानिली म्हणजे वेगळीच दिसते. आतां पहा मीच तुला म्हणतों कीं, तूं हरजीशीं भांडतांना चांगला विचार केला नाहीं; त्या मुलीची आई लबाड नव्हे, अथवा त्या मुलीनें तुला लटकें सांगितलें नाहीं, आणि आपल्या भाऱ्यांतून कणसें चोरिलीं नाहींत, हें तुझ्यानें कशावरून सांगवेल?

मिरो०—नाहीं बाबा; तसें होणार नाहीं.

भिव०—कां होणार नाहीं? तीं कोण आहेत, आणि एथें काय योजून आलीं आहेत ते तुला पक्केपणीं ठाऊक आहे?

मिरो०—बाबा, जर तूं तिची ती आकृति, तिचे ते अश्रुपात, तिची ती गरीबी पहातास, आणि तिचें तें भाषण ऐकतास, तर तुझी खातरी होती; ह्याहून दुसरें अधिक काय सांगूं? तीं योग्य आहेत कीं नाहींत, हें पक्कें समजेपर्यंत त्यांस काय उपाशीं मरूं द्यावें?

भिव०—शाबास मुला, शाबास. गरिबावर अशीच दृष्टि ठेवीत जा, म्हणजे भगवंतानें तुजसारिखा गुणाचा मुलगा देऊन जशी मजवर कृपा केली आहे, तशी तो तुजवर करील. कठोरतेपेक्षां दयाळूपणा चांगला; निष्ठुर मनुष्य अनीतींत शिरतो. जेथें कोणी आपली कृपा इच्छितो, आणि

ती त्यावर आपल्याच्यानें करवत नाहीं अशी गोष्ट होते, तेथें आपला दोष नाहीं.

**मिरो०**—पण बाबा, हरजीसारख्या मनुष्याच्या स्वाधीन अधिकार करावा हें मला ठीक दिसत नाहीं. तो एकाद्या दिवशीं अनर्थ करायाचा.

**भिव०**—तूं म्हणतोस तें खरें. पण मीं त्याकडेसच सगळी सत्ता दिली नाहीं. त्यापासून झालाच तर थोडासा उपद्रव होईल; आणि कदाचित् झाला तर त्याचा परिहारही करितां येईल. त्याच्या डोईवर आपला कोठीवाला आहे, तो चांगला समजुतीचा आणि भला मनुष्य आहे; तो न्याय अन्याय पाहून चांगलें तेंच करील. त्यानेंच मला त्या मायलेकींचे वर्तमान कळविलें कीं, त्या भल्या आहेत, आणि त्या म्हाताऱ्या गिरजाऊच्या घरीं असतात हेंही—

**मिरो०**—पण बाबा, हरजीनें त्या वेळींच जर त्या मुलीस मारिलें असतें तर कसें होतें?

**भिव०**—इतकें त्याच्यानें करवत नाहीं. मीं त्याला निक्षून ताकीद केली आहे कीं, तुला कोणी कसाही अन्याय करितांना आढळलें, तरी त्याच्या आंगावर हात टाकूं नको; त्यास कोठीवाल्यापाशीं घेऊन जा,

**मिरो०**—ती, बाबा, त्या लहान मुलीस घेऊन ताई आली.

---

## प्रवेश ८.

भिवराव, भिरोबा, हिराबाई आणि यमनी.

**मिरो०**—(टोपली घेऊन यमनीकडे धावतो) ही घे मुली. ही घे तुझी टोपली. त्यांतल्या तुझ्या एका कणसासही कोणी हात लावला नाहीं बरें.

**यम०**—अगे माझे टोपले! अरे माझ्या लहानग्या धन्या, मी तुझी किती उपकारी झालें? (भिवरावास पाहून आपल्याशींच) हे कोण गृहस्थ आहेत?

हिरा०—( बापाकडे धावून त्याच्या कडेवर चढते. ) यमने, पहा हा आमचा बाबा.

मिरो०—मी तुला खरेंखरेंच सांगतों, यमने, आमचा बाबा चांगला आहे. तूं कांहीं भिऊं नको. ये, मी तुझी त्याची ओळख करितों. ( यमनी पुढें जाते. ) तुला दुखविलें म्हणून बाबानें हरजीस चांगली शिक्षा केली; ऐकिलें ?

यम०—( भीत भीत भिवरावाजवळ जाते आणि त्याचे पायां पडते ) महाराज, मी इतकी सलगी करितें म्हणून क्षमा असावी. आपलीं मुलें किती थोर म्हणून सांगूं ?—

भिव०—( एकीकडे वळून हळूच ) मिरोबा म्हणत होता तें खरेंच. हिच्या तोंडाकडे पहातां ही लबाड असा संशय कोणास येईल ? हिची रम्य मुद्रा, भाषणाची हातोटी, हीं हिचें थोरपण सांगतात.

यम०—( मिरोबास आणि हिराबाईस हलक्या शब्दांनीं ) मीं तुमच्या बाबास राग तर आणिला नाहीं ?

भिव०—( तें ऐकून ) नाहीं माझे लाडके ? माझ्या मुलांनीं तुझा सत्कार केला, त्यांत कांहीं अधिक केलें नाहीं. तूं त्यास योग्यच आहेस.

हिरा०—खरें बाबा, ही तशीच आहे. पण जर तूं हिची आई पाहिली असतीस तर—

भिव०—तुझी आई कोण आहे मुली ? ह्या गांवांत तुम्ही कोठून आलां ? आणि पोट कसें भरितां ?

यम०—पोट कसें भरितों हें मी काय सांगूं ! कधीं मिळतें, कधीं उपाशीं असतों. आम्ही सगळा दिवस, कधीं सगळी रात्रही, सूत कांतितों, शिवतों; आणि पोट भरितों. गिरजाऊनें आपल्या घरीं आम्हांस रहायास जागा दिली आहे. त्यांनीं मला शेतांत कणसें टिपायास आजच पाठविलें होतें तों पहिले खेपेसच असें झालें.

मिरो०—( यमनीच्या कानांत ) आज तुझें भाग्य उघडलें,

ताई बाबाची आज्ञा घेऊन ठेवणार आहे; मग तुला टिप-
ल्यावांचूनच दाणे मिळतील.

**भिव०**—( यमनीस ) पण तुम्ही अगोदर कोठें होतां ?

**यम०**—एथून थोडक्या कोशांवर रेणुकापुरीं होतों, तेथें फार महागाई म्हणून गिरजाऊनें माझ्या आईस सांगितलें कीं, तूं एथें ये; मी तुला जागा देईन.

**भिव०**—( एकीकडे ) गरीब लोक जेव्हां एकमेकांस असे सहाय होतात तेव्हां मग मातबरांनीं किती सहाय व्हावें ? ( यमनीस ) मुली, तुझा बाप जिवंत आहे ? तो काय धंदा करितो ?

**मिरो०**—मी पैज मारितों कीं, तो मोलकरी नसावा.

**हिरा०**—आणि हिच्या आईस पाहिल्यावरून मीही मारीन.

**यम०**—( अंमळ गडबडून ) माझा बाप ? मला बाप नाहीं. खरोखरीच मीं पाहिला नाहीं. मी उपजायाच्या अगोदरच तो वारला. अहा ! जर तो आज जिवंत असता तर—

**भिव०**—तो कोण होता हें तुला ठाऊक आहे ? आणि त्याचें नांव काय तें सांगशील ?

**यम०**—माझी आई तुम्हांस तें नीट सांगेल.

**भिव०**—ती मशीं बोलेल ?

**हिरा०**—हो; ती आतां एथें येईल. मी अंमळ मागाहून येतें असें ती आम्हांस म्हणाली.

**भिव०**—मुली तुला शिक्षा कोणाची ?

**यम०**—तें सगळें माझ्या आईनें केलें. मला वाचायास आणि लिहायास तिनें शिकविलें; आतां ती मला देवाच्या उपासनेचा मार्ग शिकवीत असते, आणि चित्रें काढायासही शिकवीत असते.

**भिव०**—( आपल्याशीं ) चित्रें काढायास ! तर आतां माझी खातरी झाली कीं, हीं कोणी मोठ्या कुटुंबांतलीं असून दारिद्र्यानें अशा दशेस आलीं आहेत.

हिरा०—अहा ! ती, ती येते आहे.

मिरो०—हीच ती ?

भिव०—( एकीकडे ) ह्यांचें वर्तमान ऐकावयास मी मोठा उत्कंठित झालों आहें. ह्या मुलीच्या आकृतीवरून मला हिच्या बापाचें भान होतें, पण पक्कें आठवत नाहीं.

---

## प्रवेश ९.

**भिवराव, जिऊबाई, मिरोबा, हिराबाई, आणि यमनी.**

यम०—( आईस भेटावयास धावते; आई भिवरावास पाहून गडबडते. ) ये बये ये, भिऊं नको. ज्या दोघां मुलांनीं आपणांवर फार ममता दर्शविली त्यांचे हे वडील आणि जशीं ह्यांचीं मुलें तसेच हेही दयाळू आहेत. ( जिऊबाई हळूहळू पुढें येते; हिराबाई पुढें जाऊन आवडीनें तिचा हात धरून तिला बापाकडे आणिते. )

हिरा०—माझ्या बापास सगळें वर्तमान कळलें आहे; आतां नवें सांगणें नलगे.

जिऊ०—महाराज ! माझी यमनी चोर असें तर आपल्या मनांत भरलें नाहीं ?

भिव०—बाई, तुमच्या मुलीस आणि तुह्मांस पाहूनच तुमचा भलेपणा स्पष्ट होतो.

मिरो०—तिचें नांव यमनी ! हें नांवच सांगतें कीं, ही दाणे टिपून पोट भरायाकरितां झाली नाहीं.

जिऊ०—काय करावें, दरिद्रावस्था फार कठिण आहे; पण जोंपर्यंत आमच्या हातून वाईट कर्म घडलें नाहीं तोंपर्यंत आह्मीं—

भिव०—गरीबीची लाज कोणीं धरूं नये. सद्गुण आहेत तेथेंही ती आढळते. बाई, आतां मी सलगी करून विचारतों, क्षमा करा; तुमचें नांव काय ?

हिरा०—हिचें नांव जिऊबाई पोवारीण.

जिऊ०—आतां मी आपली खरी हकीकत तुह्मांपाशीं लपवीत नाहीं. मी असे दिवस काढितें एथें माझा उपाय नाहीं, असें रावसाहेबांच्या मनांत यावें ह्मणून मी सांगतें. माझ्या मनांत आहे कीं, त्याचा बभ्रा होऊं नये. (मुलांकडे पहाते.) गरीबीच्या लाजेमुळें नव्हे; पण जर माझें नांव प्रकट झालें तर मग हलक्या जातींतले लोक, (जे कोणी नीच असतील ते), माझा छळ करून संतोष पावतील; कां कीं कोणे समयीं मोठ्या मनुष्यांपासून त्यांच्या गरीबपणाचा तसाच तिरस्कार झाला असतो.

मिरो०—बरें तर मी ऐकत नाहीं.

हिरा०—मी कोणाशीं चकारशब्द बोलणार नाहीं. मी खरेंच सांगतें कीं, तुम्ही कोणीं असा, पण यमनीस मी आपली मैत्रीण करीन.

भिव०—बाई, सांगतों हें खरेंच माना. माझ्या मनांत तुमचें कल्याण करावें असें पक्कें वागलें आहे, म्हणून मी इतकें खोदून पुसतों.

जिऊ०—मी गरीब, परंतु मोठ्या कुळांत उत्पन्न झालें आहें. आठ वर्षें झालीं, माझ्या बापानें मला सयाजी पोवार सेना-खासखेल ह्यांस दिलें.

भिव०—सयाजी पोवार! सयाजी!

जिऊ०—आमचें लग्न झाल्यावर मग आम्ही रतनपुरास आलों. तेथें पोवारांचें वतन होतें.

भिव०—होय तोच! तोच! ह्या मुलीच्या चेहऱ्यावरून तर उघड दिसतें कीं तोच.

जिऊ०—तें कसें रावजी?

भिव०—पुढें बोला बाई.

जिऊ०—मी आतां थोडक्यांतच सांगतें. आम्ही संसारसुखाचा आणि परस्परांच्या प्रीतीचा अनुभव नुकताच घेत होतों इतक्यांत—अरे कर्मा!—दगदगीच्या चाकरीमुळें त्यांची

प्रकृति बिघडली; आणि माझें दैव फुटलें–तें असें झालें.– (ती रडते.)

हिरा०—(यमनीस) बापडे, तूं लवकरच गे पोरकी झालीस!

यम०—अरे दैवा! उपजायाच्या अगोदरच!

जिऊ०—घरधनी वारले तेव्हां ही मूल माझ्या पोटांत होती. माझ्या निर्दय दिरांनीं मला पोटीं मुलगा नाहीं असें पाहून घरांतलें सर्व आटोपलें. मग मला त्यांनीं उचलून दिलें तें घेणें प्राप्त झालें.

भिव०—ह्यावरून तुम्हांस त्यांनीं फार थोडें दिलें असेलसें दिसतें.

जिऊ०—त्याजवर आम्ही थोडीं वर्षें रतनपुरांत काढिलीं; नंतर सर्व चीजवस्त विकून नांव छपवून राजापुरास आलों. तेथें गिरजाऊची गांठ पडली, तिनें ह्या गांवीं आणिलें.

हिरा०—रे, ती आपली गिरजाऊ ती, बाबा.

जिऊ०—पूर्वीं माझ्या हातून तिजवर कांहीं उपकार घडले होते ते आठवून तिनें मला आपल्या घरीं बोलाविलें. ती आमचा फार समाचार घेते. तिला दुसरें कोणी नाहीं. ती म्हणते, तुम्ही मला मूठमाती द्या, आणि ही माझी झोंपडी आहे ही माझ्यामागें तुम्हीच घ्या–अशी माझी कथा आहे.

भिव०—पुरे बाई. आतां मी त्या गिरजाऊस कृतज्ञतेनें आपणापेक्षां थोर होऊं देणार नाहीं. आजच्या दिवशीं, बाई, मला फार आल्हाद झाला कीं, तुमच्या भ्रतारानें मजवर जे उपकार केले आहेत, ते फेडायाचा योग देवानें आणिला.

जिऊ०—तें कसें रावसाहेब? तुम्ही माझ्या घरधन्यास ओळखीत होतां?

मिरो०—ह्या यमनीच्या बापास, बाबा?

हिरा०—अगे माझे यमने, आतां मला वाटतें कीं, तुला आम्ही आपल्या घरीं ठेवूं. पण तुला काय झालें? तूं कां रडतेस?

यम०—नाहीं, मला आनंदाश्रु आले.

भिव०—तुमच्या भ्रतारानें तर माझा प्राण वांचविला आहे.

अहाहा! मी आज केवढा सुखी तरी, कीं त्या पुरुषाच्या बायकोची आणि मुलीची सेवा माझ्या हातून घडेल. मागें लढाईंत मी त्यांच्या हाताखालीं चाकरी करीत होतों. एके समयीं शत्रूंशीं हातपिटीस आलों होतों. तेथें माझ्या आंगावर एका बारगिरानें घोडा घातला आणि मी तर श्रमानें अगदीं गळालों होतों; त्या क्षणीं जर पोंवार पुढें सरसावले नसते तर मग मी आजला जिवंत कोठचा रहातों?

जिऊ०—मीही त्यांचा शूरपणा ऐकत होतें.

भिव०—त्यानंतर एके समयीं मी आपल्या [illegible]ल्याबरोबर कामगिरीवर असतां शत्रूंनीं एकाएकीं आम्हांवर छापा घालून आम्हांस धरून नेलें. त्यांनीं आमचें सर्वस्व लुटिलें; व मला जखमा लागल्या. हें वर्तमान पोवारांस कळतांच, त्यांनीं शत्रूकडचे सेनापति जाधवराव होते, त्यांस शिफारसपत्र पोहोंचवून माझी तरतूद राखिली. तेथें माझ्या जखमा बऱ्या होण्याला दोन वर्षें लागलीं. नंतर मी तेथून सुटून घरीं आलों, आणि पोवारांस भेटावें, तों तावडतोब आमची रवानगी हिंदुस्तानांत झाली. तेथें मीं लग्न केलें; आणि सहा वर्षें तिकडे राहून स्वदेशीं आल्यावर शोध घेतला तों ऐकिलें कीं, पोवार कैलासवासी झाले. असल्या पुरुषाचीं बायकामुलें—आणि त्यांस विपत्ति—हें माझ्यानें पहावत नाहीं. अशा विपत्तींत आज तुम्हांस पाहून माझें हृदय तर अगदीं फुटून गेलें बुवा!

जिऊ०—हे ईश्वरा! तूं एथें मला आणून काय चमत्कार केलास हा!

मिरो०—(यमनीस) काय? तुझ्या बाबानें माझ्या बाबाचा प्राण राखिला?

हिरा०—आतां आम्हीं तुम्हांवर किती तरी ममता करावी?

भिव०—यमने, बेटा ये इकडे; मी आहें तों तूं आपला बाप जिवंत आहे असें समज बरें. माझ्या मुलांनो, तुमची आई

वारली तिच्या जागीं तुम्ही ह्या बाईस आपली आई समजा. बाई तुम्हीं यमनीस शिकविलें (यमनी त्याजवळ जाते आणि त्याचा हात धरिते) त्यावरून मला वाटतें कीं, तुम्ही माझ्या मुलांकडून विद्याभ्यास करवायास योग्य आहां. मी तुमचा सांभाळ करीन. पुनः दरिद्राची पीडा तुम्हांस होऊं देणार नाहीं. (यमनी अजून त्याचा हात धरूनच आहे.) होय मुली, मी तुला आपल्या मुलीप्रमाणें मानीन. जसा तो मला गुरुस्थानीं होता, तशी तूं माझें अत्यंत प्रीतिपात्र आहेस; कारण तूं आपल्या उदार बापाची प्रतिमा आहेस.

**जिऊ०**—(गहिंवरून) रावसाहेब, तुमचे उपकार कसे बोलून दाखवावे हें मला कळत नाहीं. माझ्या अंतर्यामीं जें होत आहे, तें हे माझे आनंदाश्रु सांगतील.

**हिरा०**—(तिला आलिंगिते.) माझे जिवलगे, माझे नवे आई! तर आतां तूं नित्य आम्हांजवळ असशील नाहीं बरें? तूं पहा आम्ही तुझ्या आज्ञेंत कशीं वर्तू तीं.

**मिरो०**—होय, आणि यमनीला दुसरी बहीणही झाली. आतां तिला दाणे टिपायास जायाचें काम नाहीं. अरे दुष्टा हरजी आतां मी तुला वांकुल्या दाखवीन!

**जिऊ०**—माझ्या लाडक्या लेंकरांनो! तुम्ही मला किती आनंद देतां! आतां एकाचीं तीन मुलें तुम्ही मला झालां, तर मी जीव लावून तुमचें पालन करीन. (भिवरावास) रावसाहेब, आज्ञा द्याल तर हें सुखासमाधानाचें वर्तमान मी गिरजाऊस जाऊन सांगेन. हें ऐकून तिला हर्षवायुच होईल!

**भिव०**—ठीक आहे बाई. इतक्यांत मीही घरीं जाऊन तुम्हांकरितां एक खोली तयार करवितों.

**हिरा०**—बाबा, मी आपल्या नव्या आईबरोबर आणि यमनीबरोबर जाऊं?

**मिरो०**—आणि मीही जाऊं बाबा? मला ह्यांच्या बरोबर जावेंसें वाटतें.

**भिव०**—सुखें जा माझ्या लेंकरांनों; आणि मग जिऊबाईस आणि यमनीस आपल्या घरीं घेऊन या बरें? आणि गिरजाऊसही आज आपल्या घरीं जेवायास आमंत्रण करा.

**गिरो०**—( यमनी टोपली घ्यायाला चालली होती तीस ) नको नको यमने, ती तूं आतां उचलूं नको, तेथेंच राहूं दे.

**यम०**—रावजी, मी ही टोपली कोट रुपयांसही कोणाला देणार नाहीं. माझा आणि माझ्या आईचा जो आज भाग्योदय झाला त्यास मूळ ही आहे. नाहीं, माझे चिमणें जिवलगे टोपले, तुला डोकीवर घ्यायास मी लाजणार नाहीं! (ती मोठें बळ करून टोपली उचलते.)

**हिरा०**—इतकें तरी कर यमने कीं, आंतलीं कणसें काढ, म्हणजे ती हलकी होईल.

**यम०**—कां काढीन? तीं कणसें माझीं आहेत. मला तीं त्या भल्या म्हाताऱ्यानें दिलीं आहेत. ह्याविषयीं तुमचा हरजी हवें तें कां म्हणेना; तीं मी गिरजास भेट म्हणून देईन.

**भिव०**—तिला मी विसरणार नाहीं. आजपासून जन्मपर्यंत मी तिला अन्नवस्त्र देईन.

**जिऊ०**—भगवान तुमचें कल्याण करो; आणि तुमचीं मुलें तुम्हासारखीं धार्मिक होऊन तुम्हांस सर्वदा आनंद देवोत.

( सर्व निघून जातात. )

---

## सखी आणि मनी.

वसंतऋतूमध्यें एके दिवशीं मोठ्या प्रातःकालीं एका श्रीमंत पाटलाची मुलगी सखी ही न्यहारीस साखरपारा बरोबर घेऊन आपल्या बापाच्या वाडींत गेली होती. तिच्या मनांत कीं, चार घटिका इकडून तिकडे फिरून न्यहारी खाल्ली असतां ती रुचि अधिक देईल. तिला तेथें सर्व वस्तू पाहून आनंद झाला. दिवस जसजसा चढत चालला तसतसे सर्व पदार्थ अधिक शोभायमान झाले व त्यामुळें तिचे मनास सुख झालें.

मंद सुगंध शीतळ वायूच्या स्पर्शानें त्वचेस; मधुर फळांच्या रसानें जिव्हेस; पुष्पांच्या सुगंधानें घ्राणास; व पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं कर्णांस; अशी ती सखी तेथें सर्व विषयांपासून आनंद पावून सात्विक भाव पावली आहे, इतक्यांत तेथें कोणाचीं पावलें वाजलीं. त्या समयीं ती चकित होऊन पाहूं लागली तों समोरून एक पोरगी हातांत कोरडी बाजरीची भाकर घेऊन मोठ्या रुचीनें खात खात आपणाकडे येते आहे, असें तिनें पाहिलें. तीही तेथें खेळावयास म्हणून येत होती. तिची दृष्टि इकडे तिकडे पहाण्यानें चंचल होती, म्हणून ती जवळ आली तेव्हां तिनें सखीस पाहिलें. सखीनें तिला पहातांच ती खालीं पहात स्तब्ध राहिली. मग जशी हरिणी भय पावते, तशी ती भिऊन मागच्या पायीं पळूं लागली; त्या वेळीं सखी म्हणते "थांब थांब मुली, अंमळ थांब, अगे पळतेस कां?" तें ऐकून ती अधिकच धांवली. सखीनें तिच्यामागें लागून मोठ्या कष्टानें तीस आडवाटेनें जाऊन धरिलें; आणि ती तीस म्हणते, "तूं शेवटीं माझ्या हातीं सांपडलीस ना? आतां कोठें जाशील? मीं तुला बळकट धरिलें आहे; तूं आतां माझ्या हातून सुटणार नाहींस." त्या वेळीं ती पोरगी पळून जावें म्हणून ओढाताण करूं लागली. तीस सखी म्हणते, "मुली, तूं असें करूं नये; मी कांहीं तुला उपद्रव करीत नाहीं." ते स्नेहार्द्र आणि कोमळ शब्द ऐकून पोरगीला धीर आला; मग ती सखीबरोबर जवळच्या बंगल्यांत गेली. तेथें तिला आपल्याजवळ बसवून सखी विचारिते, "मुली, तुझा बाप जिवंत आहे?"

**मनी**—होय बये.

**सखी**—तो काय धंदा करितो?

**मनी**—पोटासाठीं कोणतेंही काम करितो. आज तो तुमच्या बागांत खपत आहे. त्यानें मला आपल्या बरोबर आणिलें आहे.

**सखी**—हां! तो जाडगा खंडू तुझा बाप? पण तूं ही न्य-

हारी कसची करितेस? मला पाहूं दे काय खातेस तें. (ती त्यांतली थोडीशी भाकर खाऊन पहाते. ) अगाई? काय जाड आणि भरड आहे ही! माझ्या घशांत टोंचीतच गेली! तुझा बाप तुला ह्याहून चांगली कां देत नाहीं?

**मनी**—त्यापाशीं तुमच्या बाबाइतके पैसे नाहींत म्हणून.

**सखी**—पण तो मजूरी करून मिळवितो कीं नाहीं? तितक्यांत त्याच्यानें तुला ताजी भाकर देववत नाहीं? ह्याबरोबर कांहीं कोरड्यास तरी—

**मनी**—होय, जर त्याला मी एकलीच असतें तर; पण आम्ही पांच जणें आहों; सगळींच पुष्कळ खाणारीं. आणखीही, कोणास झबलें पाहिजे; कोणास आंगरखा; कोणास टोपी; ह्याचा खर्च आहे. कोणे वेळेस माझ्या बाबास, काय करूं? असें होतें, तो म्हणतो सगळी मेहनत करून व्यर्थ. माझ्यानें ह्यांस ओलेंकोरडें अन्न व मोटेंधोटें वस्त्रही पुरववत नाहीं.

**सखी**—तर तुम्हीं कधीं साखरपारा खाल्ला नसेल.

**मनी**—साखरपारा तें काय आहे?

**सखी**—हा पहा माझ्या हातांत प्रत्यक्ष.

**मनी**—( पाहून ) अग आई; मीं हा कधीं माझ्या जन्मांत पाहिला नव्हता!

**सखी**—थोडासा खाऊन पहा, भिऊं नको. हा पहा मी खातें.

**मनी**—( थोडा तोंडांत टाकून आनंदानें ) अहा बये! काय गे तरी चांगला आहे हा!

**सखी**—खरेंच—बरें तुझें नांव काय मुली?

**मनी**—( उठते आणि तिच्या पायां पडून म्हणते. ) तुमची बटीक मनी.

**सखी**—बरें तर, अंमळ एथें थांब. मी आपल्या आईपासून तुजकरितां कांहीं मागून आणितें-हीच आलें. पण तूं पळूं नको हो?

**मनी**—नाहीं गे आई. आतां मी कां पळेन?

सखी धांवत गेली, आणि तिनें आईपाशीं त्या मुलीकरितां

कांहीं, कोरड्यास मागितलें. आई तिची धर्मवासना पाहून समाधान पावली. तिनें वाटींत कांहीं खीर आणि गव्हांची पोळी अशी तिजपाशीं दिली. सखी ती घेऊन धावतच मनीपाशीं आली आणि म्हणते, "कां मुली, तुला मीं फार खोळंबविलें नाहींना ? ही घे. आतां तूं आपली जाडी भाकर परती ठेव; ती मग तूं हवी तितकी खा."

**मनी**—(खीर तोंडास लावून मिटक्या मारिते.) अगाई! हें अमृतासारखें गोड आहे ? असें मीं कधीं खाल्लें नव्हतें !

**सखी**—तुला आवडलें हें पाहून मला संतोष झाला. आधींच माझी खातरी होती कीं हें तुला आवडेलच.

**मनी**—काय बये ! तुम्ही हें असें नित्य खातां ! आम्हीं गरिबांनीं असलें कधीं चाखलें देखील नव्हतें !

**सखी**—ऐक तर; कधीं कधीं तूं मजकडे येत जा, म्हणजे मी तुला असें कांहीं देत जाईन. पण गडे, तूं कशीगे निरोगी दिसतेस ! अगे तुला कधीं दुखणें येत नाहीं ?

**मनी**—दुखणें ? मला काय ? कधीं नाहीं.

**सखी**—तुला कधीं पडसें येत नाहीं ? तुझें डोकें जड होत नाहीं ?

**मनी**—तो रोग कसा गे असतो बये ?

**सखी**—कोणी खोकूं लागलें आणि नाक शिंकरूं लागलें म्हणजे समजावें कीं, ह्यास पडसें खोकला आला आहे.

**मनी**—हां हां! तसें मला कधीं होत असतें. पण तो काय रोग आहे ?

**सखी**—मग तूं काय करितेस ? खाटल्यावर पडून रहात असशील वाटतें ?

**मनी**—खाटल्यावर पडून ! होय. मग झालें ! मग मी आळशी झालें म्हणून माझी आई अनर्थ करील !

**सखी**—एरवीं तरी तुझ्यानें काय काम व्हायाचें आहे ? तूं अगदीं लहान आहेस.

**मनी**—कां? मला गाईकरितां गवत आणायाचें नसतें काय? आणि जाळायाकरितां काटक्या? शेत बेणण्याचें, दाणे टिपून आणायाचें, हें माझें काम. अहा बये, आमच्यानें काम केल्यावांचून रहावत नाहीं.

**सखी**—आणि तुझ्या बहिणी तुजसारिख्याच निरोगी आहेत?

**मनी**—आम्ही सगळ्या निरोगी आहों; आणि उंदरासारख्या उद्योगी.

**सखी**—बरें तर मला ह्याचा फार संतोष झाला. पहिल्यानें मला वाटलें होतें कीं, देव तुम्हां गरिबांचा समाचार घेत नसेल. पण तूं जेव्हां निरोगी आहेस, तेव्हां ईश्वर तुम्हांला विसरला नाहीं हें मला पक्कें समजलें. मीही बरीच आहें; पण तुझ्यासारखी बळकट नाहीं. पण मुली तूं अनवाणी कां चालतेस? जोडा कां घालीत नाहींस?

**मनी**—जर आम्हां सगळ्यांना आमचा बाबा जोडे घेऊं लागेल तर तो खर्चाखालीं बुडेल.

**सखी**—तर तुझे पाय दुखवतील म्हणून तुला चालतांना भय वाटत नाहीं?

**मनी**—तें एक वेळही माझ्या मनांत आलें नाहीं. देवानें माझ्या पायांचे तळवे जोड्याप्रमाणें कठिण केले आहेत.

**सखी**—माझे जोडे देववते तर मी तुला देतें; पण तूं खायाचें कां टाकलें?

**मनी**—गोष्टींतच वेळ निघून गेला. आतां मला गाईकरितां गवत मिळवून आणायास गेलें पाहिजे. दारीं प्रहर दिवस आला. माझीं भावंडें घरीं न्यहारीकरितां वाट पहात असतील.

**सखी**—बरें तर, तूं हें घरीं घेऊन जा.

**मनी**—बरें, हें मी घरीं नेऊन मी आपल्या बहिणींना देईन.

**सखी**—ही तुझी गोष्ट मला फारच आवडली.

**मनी**—मला जी जी चांगली वस्तु मिळते त्यांतली मी त्यां-

ना देत असतें, अशी माझी चाल आहे; आणि त्याही तसेंच करितात. येतें तर मी आतां. ( ती तिचे पायां पडून निघते. )

**सखी**—( जा बरें, )पण उद्यां ह्या वेळेस एथें यावयास विसरूं नको हो.

**मनी**—(थांबून) जर माझ्या आईनें मला कोठें पाठविलें नाहीं तर मी अगत्य येईन.

परोपकाराच्या सुखाचा सखीनें हा पहिल्यानेंच अनुभव घेतला. मग ती अंमळ वाडींत फिरून मनांत म्हणते, "मी आज मनीस किती सुखी केलें! ती माझी किती उपकारी झाली असेल! तिच्या बहिणी खीर खाऊन किती खुशालतील! मी तिला जर परकरचोळी दिली, तर तिला किती मोठा आनंद होईल? बयेनें मला थोडे दिवसांवर परकरचोळी दिलेली आहे, ती फार चांगली आहे; पण मला तिचा आतां कंटाळा आला आहे. माझ्या पेटींत कांहीं जुनीं चिरगुटें असतील तीं मी सगळीं शोधून काढीन. ती माझ्या इतकीच उंच आहे. माझी चोळी तिच्या आंगास ठीक येईल. अहा! माझा जीव खुरखुरतो कीं, मी तिला चांगलीं चिरगुटें नेसलेली कधीं पाहीन!"

दुसऱ्या दिवशीं मनी फिरून वाडींत आली; त्या वेळेस सखीनें तिला बरफी दिली. अशी ती मनी नित्य नित्य तेथें येई, आणि सखी तिला नित्य नित्य कांहीं नवा पदार्थ देई. तिच्या जवळचे पैसे वेंचल्यावर तिनें कांहीं आईपाशीं मागितले; ते तिला आईनें मोठ्या आवडीनें दिले. एके दिवशीं आईनें तीस उत्तर केलें, त्याचें तिला मोठें वाईट वाटलें. ती आईस म्हणत होती कीं, "मला पैसे दे. मनी अनवाणी चालते म्हणून मी तीस जोडा घेऊन देणार." आई म्हणाली, "मी पैसे देत नाहीं." सखी म्हणाली, "कां?" आई म्हणाली, "ह्याचें कारण तुला मी मग सांगेन; तूं आपल्या आवडतीवर

इतकी धोताल होऊं नको." तें सखीस वाईट वाटलें. त्या दिवशीं तिला जेवणही सुचेना. ती जेवीत असतां करंज्या वाढायास आणिल्या; त्या निमित्तानें आईनें मनीची गोष्ट काढिली.

**भिमाई**—मला वाटतें कीं, तुजपेक्षां ह्या करंज्या मनीस अधिक आवडतील.

**सखी**—होय आई, ह्या तिनें कधीं पाहिल्याही नसतील. ह्यांची मुरड पाहून तिला आश्चर्य वाटेल. बये, तूं सांगशील तर मी तिला ह्या घेऊन जातें; दोनच घेऊन जातें; जाऊं?

**भिमा॰**—तें माझ्या मनास येत नाहीं.

**सखी**—कां बरें? आई, तूं मोठी धार्मिक असून असें कां म्हणतेस? सकाळीं मी पैसे मागितले तेही तूं नाहीं म्हटले. ह्यावरून मनीनें तुला कांहीं दुखविलें असेल, असें वाटतें. वाडींत तिनें कांहीं आपला नाश केला काय गे? तसें असल्यास तिच्या संबंधानें आपल्या कानास मी खडा लावीन.

**भिमा॰**—नाहीं नाहीं, माझे लाडके. मनीनें मला दुखविलें नाहीं. पण तिजवर तूं अशी ममता करून तिला सुखी करणार कीं दुःखी तें सांग बरें?

**सखी**—सुखी करणार ह्यांत संशय काय? परमेश्वर करो आणि मला तिजविषयीं विपरीत वासना न होवो!

**भिमा॰**—मलाही वाटतें कीं, तिनें सुखी असावें. पण मुली हें खरें ना कीं, ती सुकी भाकर चावून न्यहारी करीत होती?

**सखी**—खरें गे, मी तुला खोटें कां सांगेन?

**भिमा॰**—आणि ती अद्यापि तसल्या भाकरीवर संतुष्ट आहेना?

**सखी**—अगाई, हें काय सांगायाचें! मी दहींभात ज्या रुचीनें जेवितें तीहून अधिक रुचीनें ती आपली जाडी भाकर खाते!

भिमा०—ह्यावरून मला वाटतें कीं, तिला भूकच चांगली लागते; पण ती अनवाणी चालते हें मला खरें वाटत नाहीं.

सखी—मी तिला सदा अनवाणी पहातें, पाहिजे तर तूं माळ्यास पुसेनास खरें कीं नाहीं तें !

भिमा०—तर ती खड्यांतून व गवतांतून जात असेल तेव्हां तिच्या पायांस ठेंच लागून, कांटे रुतून, रक्तें निघत नसतील ?

सखी—तें कांहीं होत नाहीं. ती हरिणीसारिखी इकडून तिकडे धावते; आणि म्हणते, “ देवानें माझे पाय जोड्या-सारखे कठिण केले आहेत, ही गोष्ट किती चांगली केली आहे ! ”

भिमा०—असेल, तूं कांहीं खोटें बोलणार नाहींस; पण तूं म्हणतेस तसें असणें मला कठिण दिसतें. तुलाच जर सुकी भाकर दिली तर ती खातांना तूं वेडींवांकडीं तोंडें किती करशील ? एकादा तुकडा माझ्यासमक्ष खातीस तर मी मौज तरी पहातें !

सखी—हो; माझ्या घांटींतच अडकेल !

भिमा०—आणि तूं उघड्या पायांनीं कशी चालतेस तेंही मला एक वेळ पहायाचें होतें.

सखी—रागें न भरशील तर सांगतें. कालच्या दिवशीं माझ्या मनांत तसें येऊन वाडींत मी जोडे काढून अनवाणी चालूं लागलें. तें मला भारी कठिण पडलें. तशीच चा-ललें तों ठेंच लागून पाय दुखवला; त्याची मला अशी कळ आली कीं काय सांगूं ? मग तशीच हळूहळू मागें जा-ऊन मीं फिरून जोडे घातले, आणि नेम केला कीं, आतां फिरून कधीं अनवाणी चालणार नाहीं; आणि गरीब बि-चारी मनी गे ! ती बाराही महिने अनवाणी चालते !

भिमा०—पण हें कसें बरें; कीं तिजसारखी सुकी भाकर तु-झ्यानें खाववत नाहीं आणि तिजसारखें तुझ्यानें अनवाणी चालवत नाहीं ?

**सखी**—मला वाटतें, सवय नाहीं म्हणून.

**भिमा०**—तर आतां ऐक. जर तूं तिला तुझ्यासारखी चांगलें चांगलें खायाची आणि जोडा घालून चालायाची सवय केली, तर मग तिला जाडी भाकर खाणें आणि अनवाणी चालणें कठिण पडेल. मग तुला वाटेल कीं आपण तिचें बरें केलें?

**सखी**—पण मी तिला तें जन्मभर पुरवीन.

**भिमा०**—गोष्ट फार चांगली आहे; पण तुला जे पैसे मिळतात तितक्यांत तूं तिला अशी जन्मभर पोसशीलना?

**सखी**—काय अवघड आहे? आणि थोडकें थोडकें तूंही द्यावें.

**भिमा०**—आपण गरिबास धर्म करावा हें फार चांगलें आहे पण तो धर्म करायास तुला एकटी मनीच आहे काय?

**सखी**—नाहीं; मला दुसरींही गरीबें पुष्कळ आढळतात. दोन पोरी तर आपल्या घराजवळ आहेत; त्यांना बाप नाहीं आणि आईही नाहीं.

**भिमा०**—आणि त्यांस दुसऱ्याच्या धर्माची फार गरज आहे; नव्हे?

**सखी**—खरी गोष्ट.

**भिमा०**—तर जर तूं पक्वान्नें आणि मिठाया सगळ्या मनीसच देशील, आणि दुसरीं उपाशीं मरतात त्या गरिबांचा समाचार घेणार नाहींस, तर ती नीति नव्हे. असें जें कोणी करितें त्यास अव्यवस्थित म्हणतात.

**सखी**—कधींमधीं मी त्यांसही देईन; पण मनी मला फार आवडते.

**भिमा०**—बरें, पण तिचें चालवीत असतां तूं मेलीस तर—

**सखी**—तर ती माझ्या नांवानें फारफार रडेल, ह्यांत संशय काय?

**भिमा०**—होय; तें मला ठाऊक आहे. पण ती पुनः दरिद्रांत पडणार नाहीं काय? आणि चांगलें खायाच्या आणि

नेसायाच्या लालचीनें एकादें दुष्कर्म आचरणार नाहीं काय? मग त्याचा दोष कोणाच्या माथीं ?

**सखी**—(अंमळ खिन्न होऊन) तो दोष माझ्या माथीं येऊं पहातो वये. तर असें होतें कीं मीं तिला आजपासून कांहीं देऊं नये; नव्हे ?

**भिमा०**—मी असें केवळ म्हणत नाहीं. तूं तिला कधींमधीं गोड पदार्थ देत जा. तिला एकादें पांघरायाचें वस्त्रही दे.

**सखी**—होय, तें माझ्या मनांत आलेंच आहे. तूं सांगशील तर मी तिला माझी फडकी देईन.

**भिमा०**—खरेंच; तुझी बारीक फडकी तिच्या फारच उपयोगी पडेल! तिचीं दुसरीं चिरगुटें खादीचीं, आणि फडकी मात्र; अहाहा! काय चांगली तिला शोभेल !

**सखी**—खरें गडे; मग तो तिचा विजोड थाट पाहून जो तो तिजकडे बोट दाखवूं लागेल. तर आतां कसें करावें बरें?

**भिमा०**—तर मीं असें करितें कीं, कांहीं दिवसपर्यंत पैसे सांचवितें, आणि मनीस जें अगत्य पाहिजेच, तें सर्व एका खेपेनें घेऊन देतें. गरिबांचीं मुलें कापड वापरतात तसल्यास फार पैसे पडत नाहींत.

सखीनें आईचा उपदेश ऐकून घेतला; मग पुढें ती मनीस खायाच्या पदार्थांपेक्षां तिच्या उपयोगी असे पदार्थ अधिक देत चालली. कोणे वेळेस ती तिला कांबळी देई; कोणे वेळेस परकर; तिला शिकवायाकरितां गांवच्या पंतोजीस तिनें कांहीं द्यावें. ते उपकार स्मरून मनीचीही ममता सखीवर फार जडली. ती जेव्हां येई तेव्हां सखीस म्हणे, "मला कांहीं काम सांगा. माझ्या हातून घडे असें कांहीं काम आहे ?" तिला सखी जेव्हां एकादें काम सांगे, तेव्हां सखीस अधिक संतुष्ट करावें म्हणून मनी तें मोठ्या आवडीनें करी. एके दिवशीं वाडीच्या दरवाजापाशीं येऊन मनीनें सखीची वाट पाहिली; त्या दिवशीं सखी तेथें आली नाहीं. दुसऱ्या दिवशीं पुनः

ती तेथें गेली; त्या दिवशींही ती आली नाहीं; अशी चार पांच दिवसांत सखीची भेट नाहीं, म्हणून ती फारच घाबरी झाली; आणि मनांत तर्क करिते, देवा, असें तर नसेल कीं, सखीचा लोभ आज मजवरून उणा झाला ? न समजतां तिला मीं कांहीं दुखविलें तर नसेल! काय तें मला समजेल तर मी तिजपाशीं जाऊन क्षमा मागेन. तिच्या मैत्रीवांचून मी जीवंत रहाणार नाहीं. मग मनी सखीच्या घरीं गेली. तों भिमाबाईची कुळंबीण घरांतून दारीं आली. तिला ती खोळंबवून पुसते, "आज सखूबाई कोठें आहेत?" तिनें उत्तर केलें, "सखूबाईची धडगत दिसत नाहीं बाई; ती आतां फार दिवस वांचायाची कठिण. मला बाई फार भय वाटतें, कोण जाणे, ती ह्या क्षणींच असेल कीं नसेल ह्याचा भरंवसा देववत नाहीं. तिला देवी आल्या आहेत." तें ऐकून, "अरे देवा! मी तिला मरूं देणार नाहीं," असें म्हणत मनीनें भिमाबाईच्या खोलीकडे धाव घेतली. तेथें जाऊन म्हणते, "बाई, कृपा करा, माझी सखूबाई कोठें आहे ती दाखवा. मला तिला पाहिलें पाहिजे!" भिमाबाईनें तिला वारलें असतें, पण ती खोलींत घुसलीच, तेथें तिचा उपाय चालेना. सखीच्या आंगांत ताप मोठा भरला होता; इकडून तिकडे वळायाचेंही सामर्थ्य राहिलें नव्हतें. तिच्या सख्यांतून कोणी तिजजवळ उभें राहीना, तें पाहून तिला फारच दुःख झालें. सखीला पाहून मनीच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या; तिनें तिचा हात धरून त्याचा मुका घेतला; आणि म्हणते, "अगे माझे अन्नदाते! मी तुला आज असें पहावें! माझे गडे, तूं मरूं नको; मी तुझ्या पायां पडतें! तूं गेलीस तर माझा समाचार कोण बरें घेईल ? मी तुजपाशीं रात्रंदिवस राहून चौकी करीन, तुझी चाकरी करीन. हें तूं मला करूं देशील ना ?" सखीनें नेत्रानें आणि हातानें तिला सुचविलें कीं, "तूं मजजवळ रहाशील तर मला फार समाधान वाटेल." मग भिमाबाईच्या विचारानें

मनी सखीची चाकरी करायास राहिली. तिनें फारच आस्थापूर्वक तिची जतन केली. तिनें आपलें आंथरूण सखीच्या खाटल्यालगत घातलें. ती खोलींतून एक क्षणभरही दूर झाली नाहीं. सखी अंमळ कुंथली कीं, मनी, "काय झालें ? काय पाहिजे ?" म्हणून विचारायास जवळ तयारच आहे—वैद्य सांगतील तीं औषधें तिनें आपल्या हातीं तयार करून तीस द्यावीं; पथ्याचें घालावें; मधल्या वेळेंत कांहीं करंड्या, सांकऱ्या करून, अथवा चित्रें काढून अथवा मंजुळ गाऊन किंवा जें जें सुचेल तें तें करून मनीनें सखीस, दुखण्याचा विसर पडून जशी करमणूक होईल तसें, करावें. सखीचे डोळे आठ दिवसपर्यंत मिटलेले होते. ते दिवस तिला फारच अवघड गेले. त्या वेळेस सखीस जो आवडे तो विषय मनीनें पुस्तक वाचून तिला ऐकवावा. गांवांतल्या गोष्टी, कहाण्या सांगाव्या. तिला वेळोवेळीं धीर द्यावा आणि सांगावें, "तूं भिऊं नको, जशी तूं मजवर दया केली, तशी ईश्वर तुजवर करील, आणि तुला लवकर आरोग्य देईल बरें, माझे अन्नदाते सखूबाई." हे शब्द बोलतांना तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालत; तितक्यांत त्या पुसून ती सखीस म्हणे, "माझे सखूबाई, मी तुझा वेळ जायाला एकादें गाणें म्हणूं ?" सखी खुणेनें मात्र सांगे. मग मनीनें जितकीं गाणीं येत असतील तितकीं गावीं. ह्याप्रमाणें सखीस करमणूक करून तिचा वेळ ती सुखांत घालवी. पुढें हळूहळू तिची प्रकृति सुधरूं लागली. तिचे डोळे उघडूं लागले; ग्लानि गेली; फोड सुकले; खवलें पडलीं; भूक लागूं लागली; तोंडावरचे व्रण मात्र अंमळ ओले होते. असा तिला दिवसानुदिवस उतार पडलेला पाहून मनीस आनंद वाटला कीं, "ही आतां वांचल्या पंथास लागली, नाहीं तर मला नाहींशी झाली होती!" मग सखीचीही तिजवर फारच ममता जडली. ती वारंवार तीस म्हणे, "तूं मजवर जे उपकार केले आहेत, त्यांची मी कशी उतराई होईन ?" तिनें आईस पुसलें कीं, "मनीस काय द्यावें ? आई

म्हणाली, "तें मी देईन मुली, तुला समाधान होई असेंच देई-न. तिचे उपकार तुजवर आणि मजवरही मोठे झाले आहेत." मग भिमाबाईनें मनीकरितां परकर, चोळ्या, फडक्या, साड्या, बाहुल्या, असें आणायास सांगितलें. सखी म्हणाली, "मी तिला तें आपल्या हातानें देईन." मनीस द्यावयाचीं खेळणीं, चिरगुटें आणिलीं त्या दिवशीं घरच्या सर्वांस आनंद झाला. सखीचीं सोयरींधायरीं सगळीं आलीं होतीं, तीं सर्व सखीस पाहून खुशाल झालीं. सखीच्या मनांत मोठा हर्ष कीं, "मनीस बक्षीस द्यायास आणि तिची उतराई व्हावयास देवानें मला सामर्थ्य दिलें आहे." असा सर्वांस आनंद होऊन तीं वाडींत गेलीं. जेथें सखीची आणि मनीची प्रथम ओळख पडली होती, तेथें सखीनें मनीचा मोठा सन्मान करून तिला बाहुल्या दिल्या, आणि आपल्या हातांनीं तिला वस्त्रें नेसाविलीं. मनीही पायांपासून डोईपर्यंत तीं सुंदर वस्त्रें आपणास लेवविलीं हें पाहून फार संतोष पावली.

---

## १२. लहान जगू.

देवराव देशमुख एके दिवशीं आपल्या वतनवाडीची चौकशी करून गांवाहून परत येत होते. ते येत असतां त्यांनीं एका श्मशानभूमीच्या भिंतीच्या आंत कोणी विलाप करितांना ऐकिलें. ते गृहस्थ फार थोर व दयाळू होते. विलाप करणाराच्या साह्यास जावें ह्या बुद्धीनें घोड्याखालीं उतरून ते भिंतीवर चढले आणि आंत पहातात तों, कोणा मनुष्यास लोक नुकतेच पुरून गेले आहेत, व तेथें एक पांच वर्षांचें कुळवाड्याचें मुलगें रडत बसलें आहे. देवराव त्याजवळ गेले आणि म्हणतात, "मुला, तूं एथें काय करीत आहेस ?"

मुलगें—मी आपल्या आईस बोलावितों आहें. लोकांनीं तिला काल एथें निजविलें ती अद्यापि उठत नाहीं.

देवराव—लेंकरा, ती मेली; ती आतां उठणार नाहीं.

मुल०—होय; ते असेंच म्हणतात कीं ती मेली; पण मेली म्हणून तिला मला भेटायास काय चिंता आहे? परवां ती मला सोसाऊजवळ ठेवून गेली, तेव्हां तिनें मला सांगितलें कीं, मी तुला न्यावयास येईन, पण ती आली नाहीं. माझा बाबा देखील कोठें गेला. माझ्या धाकट्या भावासही कोणीं नेलें. आतां गांवचीं मुलें मला जवळ येऊं देत नाहींत.

देव०—जवळ येऊं देत नाहींत? कां बरें?

मुल०—तें मला कळत नाहीं; पण मी त्यांकडे जायास लागतों, तेव्हां तीं मला घालवून देतात; आणि माझ्या आईबापांस वाईट शब्द बोलतात; तें मला फार लागतें. अगे आई! अगे बये! ऊठ ऊठ, लौकर ऊठ!

देवरावाचे डोळे पाण्यानें भरून आले. ते मुलास म्हणतात. "अरे तुझा बाबा आणि भाऊ कोठें गेले तें तुला ठाऊक नाहीं."

मुल०—माझा बाप कोठें आहे तें मला ठाऊक नाहीं. माझा धाकटा भाऊ कालच दुसऱ्या गांवीं गेला; एक बोवा येऊन त्याला घेऊन गेला.

देव०—आणखी तूं कोणाजवळ रहात असतोस?

मुल०—शेजारिणी सोसाऊजवळ. माझी आई परत येई तोंपर्यंत मी तेथें रहायाचा होतों. तिनें मला लवकर येतें म्हणून सांगितलें, आणि न येतां एथें निजून राहिली. सोसाऊही मला आवडते; पण (खांचेकडे हात दाखवितो) ह्यांत माझी आई आहे ती मला माझ्या जिवाहून अधिक आवडते. अगे आई! आई गे! तूं अजून कां निजली आहेस! केव्हां गे उठशील?

देव०—मुला तूं उगीच हाका मारितोस. ती आतां उठणार नाहीं.

मुल०—बरें तर, मीही एथें तिच्या जवळ निजतों. त्यांनीं तिला ताटीवर निजविली होती तेव्हां मीं पाहिली. ती काला-

सारखी थंड झाली होती ! मी एथेंच पडेन आणि तिच्या कुशीस निजेन.

तो विलाप ऐकून देवरावांचे डोळ्यांतील पाणी खळेना. त्यांनीं ओणवून मुलास उचलून उराशीं धरिलें, आणि त्याचा मुका घेतला. ते त्यास विचारितात, "लेंकरा, तुझें नांव काय? माझ्या दीनवाण्या मुला—"

**मुल०**—मी चांगला मुलगा असलों, म्हणजे मला जगू म्हणतात; आणि वाईट असलों, म्हणजे जग्या म्हणतात.

देवराव अश्रु टाकिताहेत तथापि ते तें ऐकून हसले, आणि मुलास म्हणतात, " मुला, तूं मला त्या तुझ्या सोसाऊजवळ नेशील ?" मूलगा म्हणाला, " हो चला." मग तो मुलगा तसाच उठला, आणि त्यानें देवरावांपुढें धावत धावत चालून त्यांस सोसाऊच्या दारापाशीं नेलें. ती ओटीवर बसली होती. तिजकडे बोट करून तो म्हणतो, " ही माझी दुसरी आई." असें म्हणून तो तिच्या मांडीवर जाऊन बसला. देवरावांचें अकस्मात येणें पाहून सोसाऊ विस्मित झाली. नंतर देवराव, मुलानें केलेलें सर्व चरित्र सांगून, तिला म्हणतात, " सोसाऊ, ह्याचीं आईबापें कोण आहेत, व त्यांची काय व्यवस्था आहे तें सांगशील ?" सोसाऊ, " होय महाराज " म्हणुन सांगते. " ह्या मुलाचा बाप साळी आहे; त्याचें घर हें माझ्या शेजारीं आहे. तो मोठा भला, निर्व्यसनी, उद्योगी व प्रामाणिक असून तीस वर्षांच्या आंत त्याचें वय आहे. ह्याची आईही चांगली होती. ती शरिरानें निरोगी नव्हती, पण सुंदर आणि संसारकामांत मोठी दक्ष होती. त्या उभयतांचें लग्न होऊन सात वर्षें झालीं, तेव्हांपासून मी पहातें कीं, त्या दोघांची परस्पर मोठी प्रीति. त्यांचा धंदा जर चांगला चालला असता तर त्या दोघांसारिखीं सुखी ह्या लोकीं थोडींच निघतीं असें मला वाटतें. नवऱ्याचें नांव जानोजी, आणि बायकोचें नांव मानाऊ असें होतें. मानाऊच्या बापाकडुन तिला कांहीं मिळालें. आलें होतें तें व कांहीं

जानोजीजवळ होतें तें एकत्र करून, त्याचीं भांडींकुंडीं व साळ्याच्या धंद्याचें सामान घेऊन तीं संसार करूं लागलीं. मग त्यांच्याजवळ कांहीं राहिलें नव्हतें. तरी त्यांनीं आपल्या धंद्यावर कष्ट करून दोन वर्षें चांगलीं काढलीं. पुढें मुलें होत चाललीं, तेव्हां त्यांस संकट पडूं लागलें; त्यांतही दुप्पट मेहनत करून त्यांनीं निर्वाह केला असता, पण चिरगुटें विणून ठेवीत त्यांत त्यांना तोटा येऊं लागला. मग मानाऊनें कापणीच्या दिवशीं शेतांतून कांहीं दाणे मिळवून आणावे, तेव्हां त्यांस खाण्यास मिळावें. त्या मेहनतीनें मानाऊस दुखणें लागलें. तिच्या औषधपाण्यास जानोजीजवळ पैसा नव्हता, त्यामुळें तो फारच हैराण झाला. तेव्हां त्यानें वाण्याचें कर्ज केलें. पुढें मानाऊ अंमळ बरी झाली, तों जानोजीचा धंदा अगदींच बुडाला. गिऱ्हाइकांनीं त्यास सोडिलें; तेव्हां घराचें भाडें व कर्ज झालें होतें त्याचें व्याज देतां देतां तीं टेकीस आलीं. मग त्यांस उपास पडूं लागले. त्यांतही, जेव्हां त्यांस अन्न मिळे, तेव्हां तें मुलांस वांटून तीं उभयतां आपणांस दैववान मोजीत. (हे शब्द ऐकून जगू कोनांत जाऊन उसासा टाकून रडूं लागला.) पुढें त्यांवर सहा महिन्यांचें घरभाडें चढलें तेव्हां, घराचा मालक फार निष्ठुर आहे, त्यानें जानोजीस धमकावून सांगितलें कीं, मी तुला तुरुंगांत घालितों. त्यानें त्याच्याशीं मोठी रदबदली केली, तेव्हां त्यानें त्यास एक महिन्याची मुदत दिली; आणि म्हणाला कीं, "मी शपथ वाहून सांगतों कीं, ह्यापुढें भाडें राहिल्यास तुझें भांडेंकुंडें विकून, बाकी राहील त्याकरितां तुला मी तुरुंगांत घालीन." तो घराचा मालक मातबर आहे, पण त्याला दया अगदीं नाहीं. ती जानोजीची अवस्था पाहून जो पाषाणहृदय असेल तोही विरघळता. मी शेजारीण, मला ती त्यांची विपत्ति पाहून दया येई, पण काय करूं? त्यांचें दुःख निवारायास मला सामर्थ्य नव्हतें. एके वेळेस मी स्वतः घराच्या मालकापाशीं गेलें, आणि त्याची प्रार्थना केली कीं, त्यांच्या दारिद्र्याकडे लक्ष दे; आणि सांगितलें कीं,

मजपाशीं आहे तितकें मी त्यांच्या देण्याबद्दल गहाण ठेवितें. असें बहुत प्रकारें विनाविलें; परंतु त्यास दया आली नाहीं. त्यानें मला उत्तर केलें कीं, "तुझी किती पत आहे तें मला ठाऊक आहे; असें मी करीन तर मग चांगला रोजगार!" (असें म्हणत असतां सोसाऊच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले.) अशी त्यानें माझी इजत घेतली; तें मी सगळें त्या वेळेस गिळून गेलें. मनांत म्हटलें कीं, आतां जर मी कांहीं ह्यास अधिक बोलेन, तर हा हट्टास पेटून जानोजीस अधिक त्रास देईल. काय करूं? जातीनें रांड मोमीण, आणि गरीब पडलें. आहा! आम्हां गरिबांसारखी वासना जर मातबरांस असती, तर त्यांच्या हातून किती धर्मकृत्यें होतीं! मग मीं मानाऊस बुद्धि सांगितली कीं, तूं शहापुरास रामचंद्रशेटीच्या घरीं मागें प्रामाणिकपणानें चाकरी केली आहेस, तर अशा वेळेस त्याकडे जाऊन कांहीं पैसे उसने माग. तिनें मला उत्तर केलें कीं, 'तें मी नवऱ्यास सांगतें, माझ्यानें करवत नाहीं; कांकीं शेटीच्या मनांत येईल कीं, ह्यांनीं कांहीं उधळेपणाचे चाळे केले, म्हणून हीं अशा दशेस आलीं.' आज तीन दिवसांवर, नेहमींप्रमाणें आपलीं दोन मुलें घेऊन ती मजकडे आली, आणि म्हणाली कीं, 'संध्याकाळपर्यंत ह्यांस संभाळ, मी शेजारच्या गांवीं जातें, आणि सूत काढायाकरितां कांहीं कापूस मिळाला तर पहातें. माझा नवरा म्हणाला, मी रामचंद्रशेटीकडे जातों; त्यासाठीं तो सकाळींच बाहेर निघून गेला आहे.' तिची प्रार्थना ऐकून मीं मुलें आपणाजवळ ठेवून घेतलीं मानाऊ जाऊं लागली त्या वेळीं तिनें त्यांस उराशीं धरिलें; त्यांचे मुके घेतले; जसें कोणी म्हणेल कीं ही शेवटचीच भेट घेत आहे! तिच्या डोळ्यांत आसवें लोटलीं, आणि ती वडील मुलास म्हणाली, 'जगू, मी लवकरच येत्यें; मग मी तुला नेईन, रडूं नको बरें. ती मला म्हणाली, 'बाई, माझ्या मुलांचा सांभाळ तुम्ही फार करितां; मी तुमची मोठी उपकारी आहें.' असें म्हणून तिनें पुनः मुलांचे मुके

घेतले. आणि ती गेली. कांहीं वेळ गेल्यावर तिच्या घरांत मी कांहीं गडबड ऐकली; पण मनांत आणिलें कीं ती बाहेर गेली आहे, त्या पक्षीं मांजरानें कांहीं पाडिलें असेल, असें समजून मीं त्याचा शोध केला नाहीं. सांज झाली, काळोख पडला, तरी मुलें न्यायास कोणी येईना. मग मीं म्हटलें, आपण तरी त्यांच्या घरीं जावें, आणि ती काय करीत आहे तें पहावें. असें म्हणून गेलें, तों दार खिळिलेलें नव्हतें, तें ढकलून आंत गेलें आणि पहातें तों—अरे भगवान! मानाऊ जिन्याच्या दाराशीं पडली आहे! काय करावें तें सुचेना! मग तिला सावध करावें म्हणून मीं नाना उपाय केले; पण मेलीच ती कशी उठते! नंतर मीं जाऊन वैद्यास बोलावून आणिलें. त्यानें नाडी पाहून माझी निराशा करून सरकारचीं माणसें आणिलीं. त्यांनीं चौकशी करून ठरविलें कीं, ती तिरमिरी येऊन मरण पावली. मग त्यांनीं प्रेतास मूठमाती द्यावी म्हणून हुकूम दिला; आणि तिचा दादला जानोजी ह्याचा शोध करा म्हणून सांगितलें. मीं सरकारांत सांगून दोघेंही मुलें आपल्याजवळ ठेविलीं. मनांत म्हणालें कीं, मजजवळ कांहीं नाहीं, हें भगवान जाणतो आहे; तोच ह्यांच्या पोटाची सोय काढील. नंतर पाहूं लागलें तों, ह्या मुलाचा धाकटा भाऊ माझ्याजवळ रहायास अड करितो. इतक्यांत कालच्या दिवशीं मानाऊचे जुने यजमान रामचंद्रशेटही तिला भेटायास आले, त्यांनीं दार लागलेलें पाहून मजकडे येऊन पुसलें कीं, 'जानोजी साळी व त्याची बायको कोठें गेलीं आहेत?' मीं त्यांस आंत बोलावून सर्व वृत्तांत सांगितला; आणि म्हटलें कीं, जानोजी तुम्हांकडे कांहीं मदत मागावी म्हणून गेला आहे. ते म्हणाले, 'तो मला भेटला नाहीं.' मग त्यांनीं दोन्ही मुलें पोटाशीं धरून त्यांनां कुरवाळलें. त्यांस जगूनें पुसलें, 'बाबा, माझी आई फार वेळ निजली आहे तीस तुम्ही उठवाल?' तें ऐकून त्यांचें हृदय विरघळून गेलें; आणि ते मला म्हणाले कीं, 'हीं दोघेंही

मुलें मी आपल्या घरीं घेऊन जातों. ह्यांचा बाप परत आला, आणि त्यास ह्यांना पोसायाचें सामर्थ्य असलें, तर मी हीं त्याच्या स्वाधीन करीन; तोंपर्यंत मी ह्यांस नेऊन प्रथम विद्याभ्यासास लावितों.' हें भाषण मला रुचलें नाहीं; कांकीं, पोटच्यांप्रमाणें ह्या मुलांवर माझी ममता. मीं त्यांस म्हटलें कीं, माझ्यानें ह्यांस सोडवत नाहीं; मला ह्यांची फार ममता लागली आहे, आणि ह्यांसही माझा लळा लागला आहे. तें ऐकून ते म्हणाले, 'बरें तर एक तूं संभाळ आणि एक मजपाशीं दे. तूं ठेविशील त्याचाही मी सर्व प्रकारें समाचार घेत जाईन.' असें ते बोलले तेव्हां माझ्यानें त्यांस नाहीं म्हणवलें नाहीं. त्यांनीं जगूस पुसलें, 'काय रे, मजबरोबर चलतोस?' जगू म्हणाला, 'काय? माझ्या आईकडे मला नेत असलां तर चला मी येतों.' ते म्हणाले, 'मुला, आईकडे नाहीं, तुला मी आपल्या छानदार घरीं नेऊन तेथें चांगलें चांगलें खायास देईन, आणि आपल्या चांगल्या बागांत नेईन.' तो म्हणाला, 'नाहीं नाहीं, मी आपला सोसाऊपाशींच रहाणार. माझी आई आहे तेथें मी एथून नित्य जात जाईन. तुमच्या चांगल्या बागांत जाईन त्यापेक्षां मी आपल्या चांगल्या आईकडे जाईन तें चांगलें.' असें हा मुलगा बोलला, आणि माझ्या खाटेपलीकडे दडायास गेला. तें पाहून रामचंद्रशेटीनीं ह्याची गोष्ट सोडिली. मग त्यांनीं मला सांगितलें कीं, 'लहान मुलास न्यायाकरितां मी मनुष्य पाठवीन; कांकीं, तो तुझ्याजवळ असला तर तुला अधिक श्रम पडतील.' असें बोलून जातांना त्यांनीं मला कांहीं पैसे ह्या मुलाकरितां दिले. ह्याप्रमाणें ह्याचें वर्तमान आहे.

"सांप्रत आणखी एक दुःख मला असें झालें आहे कीं, ह्या मुलाचा बाप तर अजून येत नाहीं; आणि गांवांत बोलतात कीं, तो चोरांच्या मंडळींत शिरला आहे, आणि मानाऊनें त्या लाजेनेंच जीव दिला. ह्या गांवांत जिकडे तिकडे मुलांच्या तोंडीं देखील ह्याच गोष्टी; आणि हा मुलगा मुलांच्या मंडळींत गेला

म्हणजे तीं ह्यास हाकलून देतात, आणि फिरून आलास तर मारूं म्हणून म्हणतात. तेणेंकरून हा अगदीं वेडावला आहे, बाहेर पाऊल घालीत नाहीं. गेला तर आई पुरली आहे तेथें मात्र जातो."

तें सर्व वर्तमान ऐकून देवराव ह्यांस बहुत क्लेश झाले. जगू जाऊन सोसाऊच्या आंगाशीं लगटला; तो तिकडे काकुळतवाणें तोंड करून पाही, आणि तिला "आई! आई!" म्हणून म्हणे. त्या समयीं देवराव म्हणाले, " सोसाऊ, तूं फार भली बायको आहेस; तूं उदारबुद्धीनें ह्या अनाथ कुटुंबाचा चांगला समाचार घेतला, ईश्वर तुला ह्याचें फळ चांगलें देईल."

**सोसाऊ**—ह्या गोष्टींत मला जें योग्य त्याहून मीं कांहीं अधिक केलें असें नाहीं. एकमेकांस साह्य करावें, म्हणून आपणांस ईश्वरानें ह्या लोकीं पाठविलें आहे. मी आपल्या मनांत नित्य असें आणतें कीं, आसनीं, शयनीं, भोजनीं, गमनीं, जें मी सुख अनुभवितें त्याविषयीं मी सर्व प्रकारें भगवंताची ऋणी आहें, तर आपणापासून होईल तितका परोपकार व्हावा, ह्यासारखें दुसरें कोणतेंही त्या भगवंतास संतोष देणारें कर्म नाहीं. आहा! मजपासून ह्याहून अधिक घडलं असतें तर किती बरें होतें! पण मी काय करूं? मजपाशीं ही एक झोंपडी आणि एक लहानसा मळा आहे; त्यांत खपतें त्यानें पोट मात्र भरतें. मी रांडावून आठ वर्षे झालीं, पण आजपर्यंत मीं अन्नूनें दिवस काढिले. ह्यापुढेंही भगवान माझा असाच परिणाम लावो म्हणजे झालें!

**देवराव**—पण तूं हा मुलगा आपल्यापाशीं बाळगिला असतां हा जाणता होईपर्यंत तुला ह्याच्या खर्चाविचाविषयीं मोठी अडचण सोसायाची पडेल; नाहीं?

**सोसा०**—ह्याचें उणें मी कधीं पडूं देणार नाहीं? मी घासभर उणें खाईन पण ह्याला पोटभर घालीन.

**देव०**—ह्यास पोटास घालशील, पण वस्त्रें कोठून पुरविशील?

**सोसा०**—तें मी (हात वर करून) त्या देवावर टाकीन; जो भूमीस तृणाचें आणि झाडांस पानांचें, वस्त्र पांघरवितो, त्यानें मला सूत कांतायास आणि शिवायास बोटें दिलीं आहेत, तीं ह्याच्या वस्त्राकरितां श्रम करितील. जो देवास भजेल, आणि सामर्थ्याप्रमाणें उद्योग करील, त्यास तोटा पडणार नाहीं.

**देव०**—तर ह्या मुलास बाळगीन असा तुझा निश्चय आहे?

**सोसा०**—असा माझा दृढ निश्चय आहे. ह्या अनाथास वेगळा करून माझा प्राण वांचणार नाहीं.

**देव०**—मला वाटतें कीं, ह्याची तूं कांहीं सोयरी असावीस!

**सोसा०**—सोईरगत इतकीच कीं, आम्ही एका देवाचीं लेंकरें.

**देव०**—तर मीही त्या देवाचें लेंकरूं; म्हणून ह्या अर्भकाचें बरें करण्याचें सर्व पुण्य मी तुला एकटीला घेऊं देणार नाहीं; कां कीं ईश्वरानें तुजपेक्षां मला ज्यास्त सामर्थ्य दिलें आहे. तर ह्याच्या विद्याभ्यासाची तरी सोय मी करीन. ह्या मुलाची भक्ति आईकडे पाहून जसा हा माझ्या प्रीतीस पात्र आहे, तशीच तुझी भक्ति ह्यावर पाहून तुजवरही मी संतुष्ट आहें; ह्यासाठीं मी तुम्हां उभयतांस आपल्या घरीं नेतों. तूं आपलें झोंपडें आणि मळा विकून माझ्या घरीं येऊन रहा. तेथें तुला अन्नवस्त्र व जागा ह्यांचा जीवंत आहेस तोंपर्यंत तोटा पडणार नाहीं.

**सोसा०**—(त्याकडे ममतेनें पाहून) महाराज, आपणास राग येऊं नये. भगवान तुमचें कल्याण करो! पण माझ्यानें तुम्ही म्हणतां त्यास रुकार देववत नाहीं.

**देव०**—कां?

**सोसा०**—एक तर, जेथें मीं फार दिवस काढिले त्या माझ्या जन्मभूमिकेची ममता मला सुटत नाहीं. आणखी, श्रीमंतांच्या घरीं लोकांच्या गडबडींत मला रहातां येणार नाहीं. एकटें रहायाचा अभ्यास, त्यामुळें तुमच्या घरीं मनुष्यांचा

गजबजाट मला अडचण करील. मला चांगलें खाणें, निरुद्योगी रहाणें, ह्यांची संवय नाहीं. काम नाहीं केलें तर, किंवा खातें त्याहून चांगलें खाल्लें तर मी तत्काळ दुखण्यांत पडेन. ह्यासाठीं आपणापाशीं मी विनंति करितें कीं, मला ह्या मुलासहवर्तमान माझ्या झोंपडींतच राहूं द्यावें. तुमच्या मर्जीस आलें तर केव्हां केव्हां कांहीं पैसे पाठवुन द्या; ते ह्याच्या शिकण्याच्या, व हा जो धंदा करील त्याच्या उपयोगीं पडतील. ह्यास द्याल त्याच्या शतगुणित तो कृपाळू ईश्वर तुम्हांस देईल; आणि तुम्हांस त्यानें द्यावें अशी हा मूल आणि मी नित्य देवाची प्रार्थना करूं. मला मूल नाहीं, हा मला पोटच्या पोराच्या ठिकाणीं आहे. जेव्हां मला आपल्याजवळ बोलवावें असें ईश्वराच्या इच्छेस येईल तेव्हां माझ्याजवळ जें थोडेंबहुत आहे तें ह्याचेंच आहे.

देव०—बरें तर. तसें कां होईना ? मी तुमचें बरें म्हणून करणार, तर ज्यापासून तुम्हांस सुख होणार नाहीं तें मी करूं इच्छीत नाहीं. जगू तुजपाशीं असूं दे, आणि तुम्ही दोघें सुखी असा. तूं ह्यापाशीं माझी गोष्ट सदा काढीत जा-त्यास सांगत जा कीं, मी त्यास बापाच्या जागीं आहें; आणि जीकरितां त्यास इतकें दुःख होत आहे, त्या आईच्या ठिकाणीं ह्यास तूं आहेस. तुम्हांस पोटास लागेल तें मी दर महिन्यास पाठवीत जाईन. मी स्वतः येऊनही तुमचा समाचार घेईन. असें समज कीं, माझें येणें जितकें ह्या मुलाकरितां, तितकेंच तुजकरितां होईल.

सोसाऊनें वर देवाकडे डोळे करून देवरावांचें बरें करण्याविषयीं त्याची प्रार्थना केली. नंतर ती मुलास म्हणाली, "जगू, इकडे ये, आणि ह्यांच्या पायां पड आणि त्यांचा आशीर्वाद माग. आजपासून तुला हे बापाच्या ठिकाणीं आहेत" जगूनें तसें केलें; पण सोसाऊस पुसलें कीं, "हा

माझा बाबा कसा होईल? ह्याच्या नेसूं पंचा कोठें आहे?" देवरावांना तो प्रश्न ऐकून कौतुक वाटलें, आणि जवळ रुपयांची पिशवी होती त्यांतील सर्व पैसे सोसाऊस देऊन तिला म्हणाले, "भले सोसाऊ, आतां मी निरोप घेतों." व मुलास म्हणाले, "माझ्या लहानग्या मित्रा जगू, मी आतां येतों." असें म्हणून ते घोड्यावर बसले आणि जगूचा धाकटा भाऊ रामचंद्रशेटीनें नेला होता त्याच्या घराकडून गांवीं जावें म्हणून निघाले. रामचंद्रशेट घरींच होता, त्याची त्यांची भेट होऊन परस्पर आगतस्वागत झाल्यावर, देवरावांनीं आपल्या येण्याचें प्रयोजन रामचंद्रशेटीस सांगून पुसलें कीं, "ह्या अनाथ मुलाच्या बापाचा ठिकाण कोठें लागला काय?" त्यानें उत्तर केलें कीं, नुकती अर्धघटिका झाली, त्याचें पत्र मला आलें तें हें माझ्या हातींच आहे; ह्यांत त्यानें आपल्या बायकोस पत्र लिहून घातलें आहे, त्याबरोबर लहानशी हुंडीही पाठविली आहे, तें पत्र तीस देऊन मीं तिचें समाधान करावें म्हणून मला विनंति आहे. ती वारली म्हणून तिचें पत्र मीं उघडिलें, तें हें कृपा करून वाचावें.

देवरावांनीं मोठ्या उत्कंठेनें तें हातीं घेऊन वाचलें, तें एणेंप्रमाणें:—

"माझे परमप्रिय स्त्रिये,

"माझ्या विरहेंकरून तूं फार दुःख पावत असशील हें म-
"नांत येऊन मला फार व्यथा होते. आतां माझें वर्तमान
"ऐक. मी रामचंद्रशेट ह्यांजकडे जावयास निघालों ता वा-
"टेंत ह्या गोष्टी माझ्या मनांत आल्या कीं, मी असा पैसे मा-
"गायास जाऊन काय फळ? त्यांत इतकें मात्र होईल कीं,
"एक कर्जकरी वारून दुसरा केला, पुनः कर्जाची चिंता आहे
"ती आहेच. ज्या मला तरण्याला आज काम करायास
"शक्ति आहे, त्यानें मी जाऊन इतके पैसे दीनवाणीनें मागावे
"ह्यांत काय शोभा आहे? मला ते आळश्यांत किंवा व्यसन्यांत

" नाहीं गणणार ? रामचंद्रशेट ह्यांनीं आमचें लग्न केलें खरें;
" आणि त्यांची मजवर पुत्राप्रमाणें प्रीति आहे हेंही खरें; पण
" जर त्यांच्या मनांत वांकडें आलें, आणि त्यांनीं मला नाहीं
" म्हटलें, किंवा आमच्या संकटाचा परिहार करायास त्यांस
" सामर्थ्य नसलें तर ? बरें जरी त्यांपासून वर्षाच्या बोलीनें
" मला पैसे मिळाले, तरी ते मी वर्षाच्या आंत फेडीनच,
" अशी तरी मला खातरी कोठें आहे ? आणि जर मीं फेडले
" नाहींत तर हरण करण्याविषयीं चोरांमध्यें आणि मजमध्यें
" अंतर काय ? असा मी विचार केला आणि विचार करूं ला-
" गलों कीं, चांगल्या मार्गानें मी ह्या संकटांतून मोकळा
" होईन, असा उपाय कोणता करावा ? त्या समयीं माझ्या
" डोळ्यांतून वारंवार अश्रुपात झाले, आणि मीं वर भगवंता-
" कडे दृष्टि केली; तों अकस्मात माझ्या मनांत आलें, आणि
" मी आपणाशीं बोलूं लागलों, 'अरे, तूं अजून तरुण आ-
" हेस, आणि शरिरानें दृढ आहेस. थोडीं वर्षें देशांतरीं गेलास
" तर काय चिंता आहे ? तुला लिहितां वाचतां येतें, हिशेब
" चांगला ठेवितां येतो, दैववशात कोठें चांगला रोजगार ला-
" गला तर तूं आपल्या बायकोमुलांस सुखी करूं शकशील.
" बरें, हें नाहीं झालें तर आपलें कर्ज तरी वारशील. विचार
" कर कीं, तेथें तुझें दैव उघडलें तर एकादा मोठा लाभ
" होऊं शकेल.' असा एक घटिकापर्यंत विचार करीत होतों,
" इतक्यांत कोणी लोक माझ्या मागून येताहेत असें मीं पा-
" हिलें. ते मजजवळ आले तेव्हां त्यांनीं मला पुसलें, 'तूं
" कोण आहेस ? कोठें काय उद्देशानें चालला आहेस ? आ-
" म्हांबरोबर लश्करांत येशील ?' मीं प्रथम ऐकलें न ऐकलेंसें
" केलें, तेव्हां त्यांनीं पुनः मला पन्नास रुपये इनाम देऊं क-
" रून बोलाविलें. मीं त्यांस सांगितलें कीं, 'इतक्यांवर तर मी
" लढाई संपेपर्यंत चाकरी करीन.' ते म्हणाले, 'बरें तर'
" तुझें आमचें ठरलें. आतां चल तूं आम्हांबरोबर. पुढचें

"आम्ही तुझें सगळं नीट करूं.' मग त्यांनीं मला आपल्या
"सरदारापाशीं नेलें. त्यानें मला कांहीं प्रश्न केले; त्यांचीं
"उत्तरें देऊन मी त्याच्या खातरीस उतरलों तेव्हां त्यानें मला
"तत्काळ पन्नास रुपये दिले. माझे प्रिये, ह्याप्रमाणें कर्जावेगळें
"व्हावें म्हणून मी चाकरींत गुंतलों गेलों. मीं त्या पन्नासही
"रुपयांची हुंडी तुजकडे पाठविली आहे; त्यांतील एक द-
"मडी ठेविली नाहीं. तर हे घेऊन वीस रुपये कर्ज आहे तें
"पहिल्यानें फेड; बाकीच्याचें तुझ्या मनास येईल तें कर. तूं
"नीटपणें रहा. आपल्या शरीरप्रकृतीस जप. मुलांस चिरगुट पां-
"घरूण कर. त्यांस शाळेंत पाठवीत जा, तूं जपून खर्च केलास
"तरी इतके पैसे फार दिवस पुरणार नाहींत हें मी जाणतों,
"पण धीर धर. माझी तैनात महिना पांच रुपये आहे. त्यांतलें
"कांहीं मागें पाडून कांहींका महिन्यांनीं तुला आणखी मी
"पाठवीन. लश्कराबरोबर परत येईन मी तेव्हां धावत आधीं
"तुझ्या भेटीस येईन. माझे साध्वी स्त्रिये, तूं दुःख करूं नको.
"भगवंतावर विश्वास ठेव. तो लवकरच आपणांस सुखी
"करील. मुलांस चांगला मार्ग लाव. त्यांना बाहेर उनाड
"मुलांकडे जाऊं देऊं नको. तूं स्वतः उद्योग करीत ऐस.
"मुलांसहवर्तमान देवास भजत जा. त्यांस सुमार्ग शिकीव, ते-
"णेंकरून तीं भलीं होतील. तूं हें सर्व करण्यासारखी आहेस
"ह्याविषयीं मला संदेह नाहीं. ईश्वरास भीत जा. त्याची तूं
"मजविषयीं प्रार्थना कर; आणि मी तुजविषयीं करीन. पत्राचें
"उत्तर लवकर पाठीव. तूं रामचंद्रशेट ह्यांजकडे पत्र आणून
"दे, ते तें मी असेन तेथें पाठवितील. दोघां मुलांस माझा आ-
"शीर्वाद सांग. जगूस सांग कीं, 'तूं चांगला चालशील
"तर मी येतेसमयीं कांहीं तुजकरितां आणीन. ईश्वर तुमचें
"कल्याण करो. मजवर तुझी आहे तशी प्रीति असो.

(सही) **ज्ञानोजी.**"

पत्र वाचतांना देवरावांचे डोळे भरून पाणी वाहूं लागलें.

वाचणें झाल्यानंतर ते म्हणाले, " ह्या पुरुषास चांगला भ्रतार, चांगला बाप, आणि सज्जन असें म्हणावें. अशा मनुष्यांस सुखी केल्यांत वास्तविक समाधान आहे. तर आतां जानोजी ह्याचें कर्ज मी फेडीन; आणि त्यास पुनः चांगल्या रोजगारास लावीन. मुलें कर्तीं होत तों पैसे आले आहेत हे तुम्हांजवळ असूं द्या, ह्यांचें व्याज मी प्रतिवर्षी तुम्हांस देईन; तें तुम्ही मुदलांत मिळवीत जा." तें ऐकून रामचंद्रशेटीचा गळा भरून आला; तेणेंकरून त्याच्यानें देवरावांस उत्तर देववलें नाहीं. देवरावही त्याच्या स्तब्धतेचें कारण जाणून त्यास रामराम करून निघाले. नंतर देवरावांनीं जानोजीविषयीं जें मनांत योजिलें होतें, तें सर्व सिद्धीस नेलें. जानोजीस लश्करांतून आणवून त्यास रोजगारास लाविलें; आणि सर्वप्रकारें सुखी केलें; तसा तो पूर्वी कधींही नव्हता. त्याची तेवढी बायको जीवंत असती तर त्याच्या सुखास पार नव्हता. तो सोसाऊसंगतीं मानाऊच्या गुणांच्या गोष्टी आठवी, आणि समाधान पावे. ती थोर बायको सोसाऊही त्याशीं बहिणीप्रमाणें वागली. आणि मातेप्रमाणें तिनें त्याच्या मुलांचें संरक्षण केलें. जगू नित्य श्मशानांत जाऊन आईच्या जागेचें दर्शन घेई. देवरावांनीं त्याविषयीं जो खर्च केला त्याचें विद्याभ्यास करून त्यानें चांगलें सार्थक केलें; त्याची योग्यता पाहून देवरावांच्या मनांत आलें कीं, ह्यास कांहीं मोठें काम सांगावें. जगूच्या धाकट्या भावाचाही देवरावांनीं तसाच समाचार घेतला. तोही मुलगा चांगला गुणी निपजला. देवराव जेव्हां जेव्हां घोड्यावर बसून फिरायास जात, तेव्हां तेव्हां त्यांस ह्या धर्मकृत्याचें स्मरण होऊन समाधान वाटे. जेव्हां जेव्हां त्यांस दुःख होई, तेव्हां तेव्हां ते, आपण सुखी केलेल्या माणसांकडे जाऊन त्यास पाहून श्रमपरिहार करीत, आणि स्वस्थ होऊन घरास येत.

---

## १३. गवंडी व मजूर.

कोणे एके दिवशीं द्वारकानाथभट्ट आपला मुलगा हरी ह्यास घेऊन बाजारच्या रस्त्यानें चालला होता. तेथें एक मोठी हवेली बांधीत होते, तें कौतुक पहायास ते अंमळ उभे राहिले. तें काम दुसऱ्या मजल्यापर्यंत चढलें होतें. हरीनें पाहिलें कीं, त्यास परांच्या केल्या आहेत, त्यांवर शिड्या लावल्या आहेत; त्या शिड्यांवरून एकावर एक अशीं माणसें आहेत, व तीं अनुक्रमानें खालवर हात नाचावताहेत. तें पाहून हरी बापास पुसतो, "बाबा, हीं माणसें कसचा खेळ खेळत आहेत? आपण अंमळ शिडीजवळ जाऊं येतां?"

मग त्यांनीं अंमळ जवळ जाऊन पाहिलें कीं, एका मनुष्यानें राशीतून एक दगड उचलून शिडीच्या तळपायरीवरच्या मनुष्याच्या हातीं दिला; त्यानें तो घेऊन हात वर केले, तों तो त्याच्या वरच्यानें घेतला; त्यानें हात वर करून तिसऱ्याच्या हातीं दिला, त्यानें तसेंच करून चौथ्याच्या हातीं दिला. असा एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं जात जात तो दगड क्षणांत परांचीवर गेला, तेथें गवंडी होते त्यांनीं तो तत्काळ कामीं लाविला. द्वारकानाथभट्ट हरीस म्हणतो, "मुला, हें पाहून तुला असें वाटतें कीं नाहीं, कीं, इतकीं माणसें ह्या घरावर कशास लाविलीं आहेत? ह्याहून असें केलें तर चागलें, कीं ह्या सर्वांस निरोप देऊन, हें घर ज्याचें त्यानें जातीनिशीं बांधावें, आणि असेंच ज्यानें त्यानें करावें."

"खरी गोष्ट बाबा, असें होईल तर आतां आहेत त्यापेक्षां घरेंही पुष्कळ होतील."

द्वारकानाथभट्ट हरीस पुसतो, "मुला, तूं काय म्हटलें ह्याचा चांगला विचार केला? असें एक घर बांधावयास किती प्रकारचे कसबी आणि किती प्रकारचे उदमी लागतात, तें तुला ठाऊक आहे काय? जो एकटा घर बांधूं लागेल, त्यास तीं सर्व कसबें आलीं पाहिजेत; तीं पुरतीं यावयास सगळें आयुष्य पुर-

णार नाहीं. मग घरास आरंभ कोठला? बरें, जरी घर बांधायापुरत्या सर्व विद्या त्यास थोडक्या दिवसांत आल्या, तरी पहा कीं, त्यानें जातीनिशीं प्रथम उन्हांत खपावें; पायाकरितां जमीन खणावी; नंतर दगडांची खाण पहावी; तेथें सुरंग्या, बेलदार व्हावें; चुनखडे मिळवावे; ते भाजायाकरितां लाकडे तोडून आणावीं; त्यांचा चुना झाला म्हणजे कुटावा; नंतर गवंडी व्हावें; पाया भरावा; लाकूडतोड्या होऊन लाकडें तोडून आणावीं; तीं सुतार होऊन तासावीं; अरकशी होऊन अरकसावीं; तीं उभीं करावीं; आंबाडी पेरून तिचे दोर करावे; दगडांतून लोखंड गाळावें; तें लोहार होऊन घडावें; सुतार, गवंडी इत्यादिकांच्या कामाकरितां हत्यारें करावीं; पुढें तांब्याची गरज लागेल तेव्हां ती खाण शोधून काढण्याकरितां देशांतरीं जावें; रंग मसाले पाहिजेत त्यांसाठीं द्वीपांतरीं जावयास नौका बांधावी; कोष्टी होऊन कापड विणावें; त्याचीं अवजारें करावीं; दर्यावर्दी होऊन नौका वहावी; घर बांधीत असतां एकट्यानेंच मोजमाप घ्यावें; शिड्या लावाव्या. परांच्या बांधाव्या; ह्या प्रमाणें सगळीं कामें एकटाच कोणी करूं लागला तर तो किती दिवसांत घर पुरतें करील बरें?

**हरी**—ओहोहो! बाबा, मला वाटतें कीं, अशा प्रकारें घर कधींच पुरतें होणार नाहीं!

**द्वारकानाथ०**—खरें ना? तर तूं सर्व व्यवहार असाच पहा. जर मनुष्य म्हणेल कीं, मला कोणाची गरज नाहीं; मला जें हवें तें मी एकटाच करीन; मला कोणीं सहाय होऊं नये; आणि मी कोणास होणार नाहीं; तर असें होईल कीं, त्याच्या शक्ति लवकर क्षीण होतील, आणि तो जें काम हातीं घेईल तें त्याला अपुरतें टाकून द्यावयाचें पडेल. मनुष्यें जर एकमेकांस सहाय झालीं तर कसेंही कठिण, कसेंही अडचणीचें, काम असलें, तरी थोडक्या वेळांत पार पाडतील; तेंच जर कोणी एकटा करीन म्हणेल तर, त्यास

जन्मवरही होणार नाहीं. अशींच ह्या लोकचीं सगळीं सुखें कोणी म्हणेल कीं माझा मी एकटाच भोगीन, तर त्याला तीं थोडींच प्राप्त होतील; आणि जर एकमेकांनीं एकमेकांस सुख दिलें, तर सर्वांच्या सुखांत एकेकाचें सुख सहज आहे. आपण आपलीं आईबापें, भाऊबंद, स्त्रीपुत्र, आणि इष्ट आप्त, ओळखी, चाकरकुळंबिणी, गांवकरी व सर्व लोक, ह्यांस आपल्या शक्तीप्रमाणें सुख दिलें, तर तीं सर्व मिळून आपणास सुख देतील; तितकें आपल्या एकट्याच्या प्रयत्नानें होणार नाहीं. मुला, तुला पुढें लौकिकांत वागण्याचा प्रसंग आहे, म्हणून ह्या कामकऱ्यांचा दृष्टांत आपल्या मनांत पक्का ठसवून ठेव; तेणेंकरून तूं सुखी होशील. तूं पहा, ते एकमेकांचें श्रमाचें ओझें किती हलकें करिताहेत तें! आपण आणखी कांहींका दिवसांनीं इकडे येऊं, तेव्हां तूं हें घर पुरतें झालेलें पहाशील. असो; जर तूं इच्छितो आहेस कीं, मजकरितां लोकांनीं श्रम घ्यावे; माझें बरें करावें; मला सहाय व्हावें; तर तुलाही लोकांकरितां तसें करणें अवश्य आहे.

---

# १४. तरवार.

## नाटक १ अंकी.

### पात्रें.

संभाजीराव घोरपडे.........एक मोठा सरदार.
गणपतराव...............त्याचा मुलगा.
रेवाबाई.................त्याची मुलगी.

रावजी सांवत.<br>राणू सांवत<br>दामू पोवार.<br>दिनकर पोवार. } ......... गणपतरावाचे मित्र.

केरोजी.................संभाजीरावाचा खिसमतगार.

स्थळ.

## गणपतरावाची खोली.

## प्रवेश १.

गणपतराव.

आहा! आज माझा वाढदिवस! बरें झालें, त्यांनीं मला सांगितलें; नाहीं तर मला सय झाली नसती. आज मला बाबाकडून कांहीं भेट मिळेल. बरें पाहूं या तो काय मला देतो. केरोजी नुकताच कांहीं बगलेंत मारून इकडून गेला. अंमळ मी त्याच्या गळीं पडलों असतों तर तो मला पाहूं देता काय तें. पण अंः! काय आहे तें आतां मजकडे येईलच. हा माझा बाबा आला.

---

## प्रवेश २.

संभाजीराव आणि गणपतराव.

**संभा०**—(हातांत तरवार घेऊन) गणपतराव, तुम्ही इकडे आहां काय? आज तुमचा वाढदिवस म्हणून तुम्हांला मी खुशाली द्यावयास आलों आहें, पण मला वाटतें कीं; शुष्क खुशालीपेक्षां तुम्हांला आणखी कांहीं बक्षीस असावें, नाहीं बरें?

**गण०**—पण बाबा, तें तुझ्या हातांत काय आहे?

**संभा०**—आहे तें तुला शोभणार नाहींसें मला वाटतें. ही तरवार आहे पहा.

**गण०**—काय! ही मजकारितां आणिली आहे? दे तर, दे तर, लवकर दे तर माझ्या बाबा, आजपासून तूं पहा कीं, मी चांगला चालेन.

**संभा०**—पण तुला ठाऊक आहे? तरवार मुलास योग्य नाहीं. ती मोठ्या पुरुषांनेंच बाळगावी. ही बाळगणारानें मोठ्या हुशारीनें आणि थोरपणानें वागलें पाहिजे; सारांश

तरवारीच्या योगानें मनुष्यास शोभा असूं नये; मनुष्याच्या योगानें तरवारीस शोभा असावी.

**गण०**—तूं त्याची कांहीं काळजी करूं नको बाबा; मी भाक देतों; घे ही, कीं, माझ्या तरवारीस मी शोभवीन. मग मी त्या हलक्या लोकांशीं बोलणार नाहीं.

**संभा०**—आं, आं! तूं हलके लोक कोणास ह्मणतो आहेस?

**गण०**—ज्यांना आपल्यासारखा तरवार बाळगायाचा अधिकार नाहीं, त्यांना मी हलके लोक ह्मणतों.

**संभा०**—माझ्या मतें तर, जें चिंतूं नये तें चिंतितात; जें करूं नये तें करितात; जे आईबापांची अवज्ञा करितात; लोकांशीं विनयानें, थोरपणानें, चालत नाहींत; ते हलके लोक होत. तर असले हलके मनुष्य श्रीमंत लोकांमध्येंही फार दृष्टीस पडतात, आणि ज्यांत हे दुर्गुण नाहींत असले थोर मनुष्य गरिबांमध्येंही बहुत आढळतात.

**गण०**—तर माझेंही मत तसेंच बाबा.

**संभा०**—तर नुकताच तूं काय बोलत होतास? अरे असल्या फिशारींत[१] थोरपणाचें लक्षण आहे असें तुला वाटतें काय?

**गण०**—नाहीं नाहीं बाबा, तुम्ही सांगतां तेंच खरें. पण मीं तरवार बाळगिली असतां मला दूषण तर नाहीं?

**संभा०**—नाहीं; मी इतकेंच म्हणतों कीं, तूं चांगले गुण धरून तरवार धरण्यास मी योग्य आहें असें दाखवावें. आतां घे ही, पण आठवण धर हो.

**गण०**—होय, होय बाबा; तूं पहा बरें. (तो तरवार पडदळांत घालून गळ्यांत अडकवतो.)

**संभा०**—तर मी आतां येतों. बोललों आहें त्याची आठवण धर बरें; येतों, तुझें कुशल असो. (तो जाऊन मागें फिरतो.) मी विसरून गेलों. आज तुशीं खेळायास मीं नु-

---

१ फुशारकींत.

कतेंच तुझ्या संवगड्यांना बोलावणें धाडिलें आहे; त्यांसंगतीं तूं नीट चालशो.

गण०—होय बाबा चालेन.

---

## प्रवेश ३.

### गणपतराव.

(इकडून तिकडे जातो येतो; मागें तरवार लटकलेली आहे कीं नाहीं ती वरचेवर पहातो.) वाः; हें खासें काम आहे! ही घातल्यापासून मी मोठा शोभतों खरा! कोणाही गांवकऱ्यांस म्हणावें, आतां तुह्मी माझ्यासमोर या पाहूं! जर त्यांच्याजवळ तरवार नसेल तर, ते मशीं सलगी करायास अतःपर योग्य नाहींत, असें मी त्यांस साफ सांगेन; आणि जर त्यांनीं गडबड केली तर, हूं, भोसकून टाकीन! पण थांबा, हिचें पान कसें आहे तें पाहूं! (तरवार म्यानांतून उपसतो, आणि डोळे वटारून रागानें पाहतो.) काय? तूं बानिया माझी अमर्यादा करितोस? (तरवारीचे झटके मारितो.) एक! दोन! तीन! तुह्मी मजसमोर उभे रहाणार होय? मरा गुलामांनो आतां; पडा दांत वासून!

---

## प्रवेश ४.

### रेवाबाई आणि गणपतराव.

रेवा०—(हे शेवटचे शब्द ऐकून किंकाळी फोडीतच येते.) काय गणपतराव, हें तूं काय बोलतो आहेस? तुला चळ तर लागला नाहीं?

गण०—कोण? ताई, तूं आहेस काय?

रेवा०—होय, पहाशील तर मीच आहें. (तरवारीकडे बोट करून) पण हें हत्यार घेऊन तूं पुढें काय करणार?

गण०—काय करणार? थोर मनुष्यें करीत असतील तें.

**रेवा०**—ज्यांस तूं मरा असें म्हणून नुकतेंच परलोकांस पाठविलें असे ते दैववान कोण होते बरें?

**गण०**—अंः, तें उगीच; पण ताई, मी तुला खरेंच सांगतों, जो ह्या माझ्या भिंतीच्या आंत येईल त्याचें, हो—मी कंदन काढीन.

**रेवा०**—तर आज पुष्कळांचे प्राण संकटांत आहेत असें मला वाटतें; पहिल्या तडाक्यास तर मीच सांपडलें आहें!

**गण०**—तूं? तसें होणार नाहीं. पण मी आतां समशेरबहादर झालों, समजलीस? बाबानें मला ही तरवार नुकतीच बक्षीस केली आहे.

**रेवा०**—लोकांस मारायाला वाटतें?

**गण०**—काय? मी आतां बहादर नाहीं झालों? आतां लोकांनीं माझी अदबी ठेवावी; नाहीं तर, पहातांच प्रथम फाडकन तोंडांत मारीन. त्यावर जर त्यांनीं उत्तर केलें, तर मग ह्या तरवारीचा फटका—पाहिला हा? (तो तरवार बाहेर काढायास लागतो.)

**रेवा०**—भाऊ, माझें ऐकशील तर ती एकीकडे ठेव; आणि मजपाशीं सांगून ठेव कीं, तुझी अदबी ती कशी ठेवावी न जाणो एकाद्या वेळेस चुकून तशी गोष्ट व्हायाची; म्हणून समजून घेतलेलें असावें!

**गण०**—तें तुला आतां लवकरच समजेल. बाबानें माझ्या संवगड्यांस बोलावूं पाठविलें आहे. जर तीं पोरें अदबीनें मशीं वर्तलीं तर बरें, नाहीं तर मग पहा मी कसें करीन तें!

**रेवा०**—बरें पण, तुझी मर्यादा कशी राखावी तें तर सांगशील?

**गण०**—प्रथम तर मला नमावें. फार लवून नमावें.

**रेवा०**—(त्यास लवून नमते. मोठ्यानें) समशेरबहादर महाराज बडेजाव, मी तुमची दासी आहें; नजर रखें. कां? हें ठीक उतरलें ना?

**गण०**—रेवा, मस्करी नको करूं, नाहीं तर—

रेवा०—मस्करी नव्हे, हें वास्तविक पुसतें; कांकीं, थोर मनुष्यांशीं कसें वागावें हें समजलें पाहिजे; आणि तुझे बाळमित्र येतील त्यांसही पूर्वींच सुचविलें असतां बरें पडेल.

गण०—मी त्या पोरांचा अंमळ तमाशा करणार आहें. एकाला ओढीन, एकाला चिमकुरे घेईन, एकाला चपराक मारीन, अशा त्यांच्या मस्कऱ्या करीन.

रेवा०—असल्या गोष्टी कराव्या ही समशेरबहादर लोकांची रीति आहे वाटतें? पण त्या पोरांस तो तमाशा आवडला नाहीं आणि त्यांनीं समशेरबहादरांची उलटी पूजा केली तर?

गण०—काय! त्या मुरकुटांनीं! नीचांनीं! अरे जा रे! त्या गरिबांनीं काय करायाचें आहे! त्यांना छाती आणि तरवार दोन्हीही नाहींत.

रेवा०—खरेंच; बाबानें तुला आज मोठ्या उपयोगी वस्तूची भेट दिली. त्याला वाटलें कीं, लेंकाच्या रूपानें आपल्या पोटीं कोणी हा महावीर जन्मला आहे; ह्याचे गुण प्रकट व्हावयास ह्याला एक तरवार मात्र उणी आहे.

गण०—ऐक ताई, आज माझा जन्मदिवस; कांहीं करमणूक तर केली पाहिजे. असो, तूं ह्यांतलें कांहीं बाबापाशीं बोलूं नकोहो!

रेवा०—कां नको? तुजपासून असले पराक्रम व्हावे म्हणूनच त्यानें तुला तरवार बक्षीस केली असेल; आणि असा तुला त्याचा उपदेशही असेल.

गण०—ह्यांत काय संशय? तो मला सर्वदा असेंच सांगत असतो.

रेवा०—कसें सांगत असतो?

गण०—कोण जाणे, मला आतां चांगलें स्मरत नाहीं. मला वाटतें कीं असें असावें. "तरवारीला आपण शोभवावें, तरवारीनें आपणाला शोभवूं नये."

रेवा०— ह्याचा अर्थही तूं चांगला समजला असशील कीं, तरवारीस शोभवावें ह्मणजे तिचा उपयोग कसा करावा तें जाणावें. तो तूं नीट जाणतोस काय ?

गण०— तुला सगळी मस्करीच वाटते. पण बाईसाहेब, तुह्मी समजा कीं–

रेवा०— ओहो ! तूं सांगणार तें मला आधींच ठाऊक आहे; पण तुझ्या ह्या तरवारीस मुख्य भूषण तें अजून पाहिजेच, हें तुला ठाऊक आहे काय ?

गण०— तें काय ? ( तरवार पडदळांतून काढून निरखून पहातो. ) ह्यांत कांहीं उणें आहेसें मला दिसत नाहीं.

रेवा०— खरेंच ! तर तूं मोठा शहाणा तरवार धरणारा आहेस. हिला आतां एक गोंडा नको ? तो असल्यावर मग किती छानदार दिसेल ?

गण०— खरी कल्पना काढलीस. ऐकतेस, तर गडे तुझ्या पेटींत कलाबतू व रेशीम पुष्कळ आहे, त्यांतलें —

रेवा०— तेंच मी लक्षांत आणितें आहें. पण जर तूं मजपुढें आपली कवाईत करून दाखविणार नाहींस आणि तरवारीचें पान माझ्या आंगावर ठेवून उपकार फेडणार नाहींस तर!

गण०— वेड सगळें ! हा घे हातावर हात; झालें. आतां तुला कांहीं भय नाहीं. पण लवकर, एक छानदार गोंडा! जरीचा ! माझी मंडळी येईल तिनें मला माझ्या सगळ्या वैभवांत पहावें, त्यांत चमत्कार आहे.

रेवा०— तर तरवार इकडे दे.

गण०— ( तिजपाशीं ती देतो. ) ही घे; जलदी कर. काम झालें ह्मणजे हळूच ह्या सत्रंजीवर आणून ठेव, कीं, ह्मटलें तेव्हां मला सांपडेल.

रेवा०— त्याविषयीं तूं काळजी करूं नको.

---

## प्रवेश ५.

गणपतराव, रेवाबाई आणि केरोजी.

केरो०—आपले मित्र दोघे सांवत व दोघे पोवार खालीं आले आहेत.

गण०—मग? त्यांच्यानें वर येववत नाहीं काय? त्यांना आणायास खालपर्यंत मला आलें पाहिजे?

केरो०—आपण खालीं येऊन त्यांस मान द्यावा, असें आईसाहेबांनीं आपणास सांगितलें आहे.

गण०—नाहीं नाहीं; मी त्यांची वाट एथें पाहीन तें चांगलें.

रेवा०—खरें, पण आईसाहेब सांगतात त्या अर्थी तुह्मीं खालीं जावें ह्यांत—

गण०—खरें काय? त्यांना इतका सत्कार योग्य आहे? बरें तर मी हाच आलों. रेवा, अगे चल लवकर, तिकडे काय करतेस? अशानें तरवारीचा गोंडा होईल काय? चल धावत; खबरदार, गोंडा चांगला झाला आणि तरवार चांगली दिसली तर बरें आहे, नाहीं तर दाखवीन कसें तें, तरवार माझ्या खोलींत आणून ठेव. (बाहेर निघून) ऐकिलेंस?

---

## प्रवेश ६.

रेवाबाई.

(आपल्याशीं) काय बाई पोर अमर्याद! पहा तो मला कसा बोलला! बरें झालें, कीं तरवार मजपाशीं आहे! असलें हत्यार, आणि भांडखोराच्या हातांत, मग काय? (मोठ्यानें गणपतरावास) होय होय, थांब माझें होईपर्यंत. (पुनः आपल्याशींच) मी तुला ओळखितें तसा बाबा तुला ओळखीत नाहीं. हे तुझे गुण त्याला सांगितले पाहिजेत—ठीक झालें, हा बाबा आला.

---

## प्रवेश ७.

संभाजीराव आणि रेवाबाई.

**रेवा०**—बाबा, तूं बरा आलास, मी तुजकडेसच येत होतें.

**संभा०**—असें नाजूक काम काय आहे?—तूं आपल्या भावाची तरवार काय केलीस?

**रेवा०**—मीं ती गोंडा लावायाकरितां म्हणून त्यापासून घेतली आहे; पण त्याजकडून तें घातक हत्यार काढून घ्यायासाठीं मीं तें उगीच मिष केलें. आतां कांहीं कर, पण त्याला ती देऊं नको बाबा!

**संभा०**—त्याला मीं ती भेट म्हणून दिली ती फिरून कशी घेऊं?

**रेवा०**—तो चांगला निवळेपर्यंत ती तूं आपणापाशीं ठेव. मीं नुकतेंच त्याला पाहिलें, तो एकटाच धाररावासारखा तरवार परजीत होता, आणि त्याचे संवगडी येणार त्यांसमोर फेरफटका करण्याच्या गोष्टी सांगत होता.

**संभा०**—असें काय! कज्जेदलाल पोर! तो प्रथमच असें करीलतर त्यांत त्याला अब्रू मिळणार नाहीं;खरेंच सांगतों, दे मजकडे ती पाहूं.

**रेवा०**—(त्याकडे तरवार करते) ही घे बाबा, आतां तो नुकताच शिडीपाशीं तंडत होता.

**संभा०**—जा आणि लवकर गोंडा करून मजपाशीं आण (तो बाहेर जातो.)

---

## प्रवेश ८.

गणपतराव, वडील सांवत, धाकटा सांवत, वडील पोवार व धाकटा पोवार.

(गणपतराव जोडा पायांत असतां त्यांपुढें चालतो. ते मागून जोडे काढून येतात.)

वडी० सां०—(वडील पोंवाराकडे वळून हळूच) आज आपला हा मोठा विनययुक्त सत्कार झाला.

वडी० पो०—(वडील सांवताकडे वळून हळूच) अलीकडे सत्काराची ही अशीच नवी रीत निघाली असेल कीं, घरामध्यें जोडा घालून लोकांपुढें चालावें!

गण०—काय रे, तुह्मीं तिकडे कसची कुरकुर लाविली आहे?—आं?

वडी० सां०—नाहीं, कांहीं नाहीं रावजी.

गण०—मीं ऐकूं नये असें कांहीं आहे काय?

वडी० सां०—तसेंच कांहीं असावें.

गण०—बरें तर तुह्मी तें ह्या क्षणीं मला सांगा; सांगितलेंच पाहिजे.

वडी० पो०—इतका अधिकार तुजकडे येईल तेव्हां तसें करितां येईल.

वडी० सां०—(दामूस हळूच) परक्या घरीं येऊन असें हें योग्य नव्हे.

वडी० पो०—तर त्यानें आपल्या घरीं इतकें दांडगें व्हावें हें तरी योग्य आहे काय?

गण०—(गर्वानें) दांडगा,! मी दांडगा! मी तुह्मांपुढें जोडा घालून चाललों ह्मणून?

वडी० पो०—होय, ह्मणूनच. तूं अथवा दुसरा कोणी आमच्या घरीं आला असतां आह्मी असें करणार नाहीं.

गण०—तुह्मी हवें तसें करा. पण अरे, तुह्मी कायरे मला रीत शिकविणार?

वडी० पो०—तर काय, तूं आह्मांस शिकविणार?

गण०—पण तुह्मी राव आहां काय?

वडी० पो०—(दोघां सांवतांस आणि आपल्या भावास) तुह्मी माझें ऐकाल तर, चला आपण एथून जाऊं; आपल्या रावपणाला घेऊन ह्याला खुशाल बसूं द्या.

**वडी० सां०**—छीः गणपतराव! आम्ही तुझ्या संगतीस योग्य नव्हतों तर आम्हांस पहिल्यानें तूं बोलवायाचें नव्हतें. आम्ही तुझ्या गळीं पडलों नव्हतों.

**गण०**—तुम्हांस मीं नाहीं बोलाविलें; माझ्या बाबानें बोलाविलें.

**वडी० पो०**—असें काय? तर आम्ही तुझ्या बाबाकडे जातों, आणि त्यास सांगतों कीं, आपण बोलाविलें तेणेंकरून आम्ही मोठे उपकारी झालों; परंतु आमचा सत्कार करण्यांत तुमच्या लेंकास भुषण दिसत नाहीं म्हणून आम्ही जातों—चला रे तिकडे.

**गण०**—(त्यांस थांबवितो.) दामू, मस्करीवर इतकें काय रे तापावें? तुम्ही आलांत तेणेंकरून मला मोठें समाधान झालें, आज माझा वाढदिवस आहे; माझा तुम्हीं संतोष करावा म्हणून बाबानें तुम्हांस बोलाविलें आहे, तर कृपा करून मजसंगतीं असा.

**वडी० पो०**—असें म्हटल्यावर गोष्ट वेगळी—पण अतःपर तूं अंमळ नम्र असावें. जरी मजपाशीं रावपणा नाहीं, तरी मी कोणाचा अवमान सोसणार नाहीं.

**वडी० सां०**—पुरे दामू! आतां आपण पुनः गडी करूं.

**धाक० सां०**—गणपतराव, आज तुझा वाढदिवस आहे काय?

**वडी० सां०**—माझी अशी इच्छा आहे कीं, तुला सर्व सुखें मिळोत.

**वडी० पो०**—मीही तसेंच इच्छितों; आणखी तुला सर्व संपत्ति प्राप्त होऊत—(एकीकडे) पण तुझ्या आंगीं अंमळ अधिक नम्रता येऊ.

**धाक० पो०**—आज तुला चांगल्या चांगल्या भेटी पुष्कळ आल्या असतील.

**गण०**—होय खरेंच.

धाक० सां०—पुष्कळ मिठाई, खडीसाखर, बदाम आले असावे ह्यांत संशय नाहीं.

गण०—मला मिठाई? मग खासें काम. अरे ती तर मी नित्य खातों.

धाक० पो०—तर मी पैज मारतों, पैसे असतील. दोन तीन मोहोरा! आं?

गण०—(गर्वानें) त्याहून अधिक चांगली कांहीं वस्तु आहे, आणि खरेंच सांगतों, आपण एथें सर्व आहों ह्यांमध्यें ती मलाच योग्य आहे. (वडील पोवार आणि सांवत एकीकडे बोलतात.)

धाक० पो०—तुझ्यासारखें मला मिळालें असतें तर मला इतका गर्व होता ना.

गण०—(त्यांकडे धिक्कारानें पहातो.) गरीब बिचाऱ्या! (दोघां वडिलांना) काय रे? तिकडे आतां फिरून काय रे फुसफुसतां आहां? तुम्ही जवळ राहून मला रमवावेंत हें आज तुमचें काम नव्हे काय?

वडी० सां०—तुला रमवायाचें आम्हांस प्रयोजन काय तें दाखीव.

वडी० पो०—जो मित्रांस बोलावितो, त्यानें त्यांस रमवावयाची चिंता वहावी; रीति तर अशी आहे.—

गण०—दामू, तूं बोललास त्याचा काय रे अर्थ?

वडी० पो०—त्याचा अर्थ उघड आहे.

---

## प्रवेश ९.

वडील पोवार, धाकटा पोवार, वडील सांवत,
धाकटा सांवत, गणपतराव, रेवाबाई.

रेवा०—(तबक भरून बर्फी पुढें आणिते.) गृहस्थ हो तुम्हांस खुशाल पाहून मी समाधान पावलें.

**वडी० पो०**—(नमून) बाई, मी तुमचा सेवक आहें.

**वडी० सां०**—तुम्हांला एथें पाहून आम्हांस बहुत आनंद झाला बाई.

**रेवा०**—तुम्ही बहुत योग्य आहां—(गणपतरावास) भाऊ, आईनें हें तुझ्या मित्रांकरितां पाठवून दिलें आहे; दूध तयार होत आहे तें मागून केरोजी घेऊन येईल; तें तूं आणि मी ह्यांना वांटूं—

**वडी० पो०**—बाई, हा तुम्ही आम्हांस मोठा मान देत आहां.

**गण०**—तूं जा आतां, तुझें एथें कांहीं काम नाहीं! माझ्या तरवारीचा गोंडा कोठें आहे?

**रेवा०**—तुझी तरवार गोंड्यासुद्धां तुला तुझ्या खोलींत सांपडेल. गृहस्थांनो, मी पुनः येईपर्यंत तुम्ही स्वस्थ रहा. (ती त्यांस नमते आणि जाते.)

**वडी० पो०**—तुम्ही लवकरच कृपा करून याल ना बाई?

**रेवा०**—मी हीच आईला विचारून येतें.

---

## प्रवेश १०.

वडील पोवार, धाकटा पोवार, वडील सांवत,
धाकटा सांवत व गणपतराव.

**गण०**—(आपण आधीं बसून मग त्यांना म्हणतो.) या, लोडांशीं बसा. (ते एकमेकांकडे पहातात, आणि न बोलतां बसतात. गणपतराव धाकट्यांस पुष्कळ बर्फी वाढितो, आणि आपणास घेतो; दोघां वडिलांकरितां कांहीं ठेवीत नाहीं; आणि त्यांस म्हणतो.) थांबा अंमळ, दुसरी येईल, मग मी देईन.

**वडी० पो०**—नको; तिची आम्हांस इच्छा नाहीं.

**गण०**—बरें तर, नको तर नको.

**वडी॰ सां॰**—रावलोकांची सत्कार करण्याची रीति अशीच आहे वाटतें?

**गण॰**—तुम्हां गरिबांस एवढी प्रतिष्ठा कशास पाहिजे रे? मीं तुम्हांस आधींच सांगितलें नाहीं कीं, दुसरी येते आहे तों थांबा म्हणून? ती आली म्हणजे पाहिजे तर घ्या, नाहीं तर नका घेऊं, समजलांत?

**वडी॰ पो॰**—होय, बोललास तें खरें आहे. तसेंच आम्ही आज कोणाच्या संगतीस बसलों आहों हेंही आह्मांस स्पष्ट समजलें.

**वडी॰ सां॰**—अरे तुमच्या मनांत पुनः कज्जा करायाचा आहे काय? गणपतराव, दामू, छीः गड्यांनों! (गणपतराव उठतो, दुसरेही उठतात.)

**गण॰**—(वडील पोवाराजवळ जातो.) गांवढेकराच्या पोरा तूं कोणाच्या बरोबर आहेस, ह्याचा कांहीं सुमार ठेवितोस?

**वडी॰ पो॰**—जो आपल्या ठायीं नसता थोरपणा आणतो आहे, आणि ज्यास एकमेकांचें आगतस्वागत कसें करावें हें कळत नाहीं, अशा एका दांडग्या आणि निर्लज्ज रावाच्या समागमें आम्ही आहों.

**वडी॰ सां॰**—खरेंच, तूं म्हणतोस असेंच आम्हां सर्वांचें बोलणें.

**गण॰**—काय? मी दांडगा! मी निर्लज्ज! मला रावाला आणि तुम्हीं असें म्हणावें?

**वडी॰ पो॰**—हो हो—पुन्हा म्हणतों, तूं मोठा दांडगा मोठा निर्लज्ज आहेस. तूं मोठा थोरला प्रधान असतास किंवा राजा असतास, तरी मीं तुला असेंच म्हटलें असतें.

**गण॰**—असें काय? तर तूं कोणाशीं बोलतो आहेस तें मी तुला आतां दाखवितों! (त्यावर हात टाकितो; वडील पोवार त्याला धरतो; तो निसटून खोलींत पळतो, आणि दार लावून घेतो.)

---

## प्रवेश ११.

वडील पोवार, धाकटा पोवार, वडील सांवत,
आणि धाकटा सांवत.

**वडी० सां०**— दामू, हा तूं काय अनर्थ केला? आतां तो आपल्या बापाकडे जाईल, आणि त्यास नानाप्रकारच्या आपल्या नालस्त्या सांगेल.

**वडी० पो०**— त्याचा बाप थोर मनुष्य आहे. तो न गेला तरी मी त्याकडे जाणार, आणि पुसणार कीं, लेंकाकडून आमचा असा पाणउतारा करण्यासाठीं तुह्मीं आह्मांला एथें बोलावून आणलें कीं काय?

**धाक० पो०**— खरेंच, ह्यांत भाऊचा कांहीं अन्याय नाहीं; हें सर्व वर्तमान बाबास सांगितलें असतां, तो ठीक केलें ह्मणून संतोष पावेल; आमची लोकांनीं अप्रतिष्ठा करावी हें त्यास मानवणार नाहीं.

**वडी० पो०**— चला मजसंगतीं; आपण सगळे जाऊं आणि संभाजीरावास हें सर्व सांगूं.

---

## प्रवेश १२.

वडील पोवार, धाकटा पोवार, वडील सांवत,
धाकटा सांवत आणि गणपतराव.

(गणपतराव तरवार घेऊन बाहेर येतो. दोघे धाकटे मुलगे त्यास पाहून एक एका कोंपऱ्यास, आणि दुसरा खांबाआड होतो; वडील पोवार आणि वडील सांवत तेथेंच अवसान धरून उभे रहातात.

**गण०**— (वडील पोवाराचे अंगावर जातो.) आतां मी तुला शिकवितों, दांडग्या पोरा! (तरवार उपसतो तों तरवारीच्या पानाच्या ठिकाणीं लांब मोराचें पीस पाहून ओ-

शाळा होऊन थबकतो. धाकटीं मुलें मोठ्यानें हसतात आणि त्याजवळ येतात.)

**वडी० पो०**—चल ये आमच्या आंगावर, तुझ्या तरवारीचें पाणी कसें आहे तें पाहूं तर खरें!

**वडी० सां०**—तो लाजला आहे त्याला आणखी लाजवूं नको.

**धाक० पो०**—ये—! तुलाच घ्यायास अधिकार आहे, ती हीच का जिन्नस ?

**धाक० सां०**—ह्या भयंकर शस्त्रानें ह्याच्यानें कोणास उपद्रव करवणार नाहीं, इतकें बरें आहे!

**वडी० पो०**—काय सांगूं, तुझ्या दांडगाईबद्दल मीं ह्या क्षणींच तुझें पारिपत्य केलें असतें; पण अशा समयीं तुजवर पराक्रम करायास मला लाज वाटते!

**वडी० सां०**—अतःपर हा आपल्या सोबतीस योग्य नाहीं; चला आपण निघून जाऊं.

**धाक० पो०**—मोरपीस परजणारे फांकडे शिपाईबावा! रामराम, रामराम रावसाहेब! आम्ही आतां येतों.

**धाक० सां०**—तुमच्या हातून तें हत्यार कोणी काढून घेईपर्यंत आम्ही एथें येणार नाहीं; कां कीं तुम्ही आह्मांस फार भयंकर दिसतां.

(ते जाताहेत तों वडील पोवार त्यांस थांबवितो.)

**वडी० पो०**—आपण ह्याच्या बापास सर्व निवेदन करूं; नाहीं तर अन्याय आपल्याकडे आहे असें दिसेल.

**वडी० सां०**—तूं खरें म्हणतोस. आपण त्यांस न पुसतां निघून गेलों तर ते आपणांस बोल लावतील.

---

## प्रवेश १३.

**संभाजीराव, गणपतराव, वडील पोवार, धाकटा पोवार, वडील सांवत व धाकटा सांवत.**

(संभाजीराव येतात. ते आलेले पाहून सर्व मर्यादेनें उभे

रहातात. गणपतरावाची फजिती झाली आहे, ह्मणून तो ए-
कीकडे जाऊन रडत बसतो.)

**संभा०**—(गणपतरावाकडे क्रोधयुक्त मुद्रेनें पाहून) तुझें ह्यांचें काय रे होत होतें रावजी? (गणपतराव फुंदतो; त्याच्यानें एक शब्दही बोलवत नाहीं.)

**वडी० पो०**—रावसाहेब, कलह झाला ह्याविषयीं आम्हांवर राग करूं नये. आम्हीं कांहीं केलें नाहीं. आल्या घटकेपासून गणपतरावानें आमचा छळ जो मांडिला होता तो काय सांगावा!

**संभा०**—स्वस्थ असा माझ्या मित्रांनो, मला सर्व ठाऊक आहे. मी खोलींतून त्याचें सगळें चरित्र पहात होतों. सर्व अन्याय त्याचा आहे. त्यांतही त्यानें मजपाशीं कबूल केलें होतें कीं, मी चांगला चालेन, म्हणून तो विशेष अन्यायी. हा दांडगा हें मला फार दिवस ठाऊक होतें; पण तेंच दांडगेपण कोणत्या परिणामास जातें हें मला पहायाचें होतें. तें लक्षांत येतांच मीं तरवारीचें पान काढवून त्याच्या ठिकाणीं पीस घालविलें—कीं तें कोणाच्या अंगावर पडलें असतां रक्त निघायाचें अगदीं भय नाहीं. (चौघे मुलगे हसतात.)

**वडी० पो०**—पण आम्ही आगळीक करून त्याशीं अंमळ अमर्यादेनें बोललों, त्याचें कांहीं आपल्या मनांत येऊं नये ही आमची प्रार्थना आहे.

**संभा०**—त्याविषयीं तर मजवर तुमचे उपकार झाले. तुम्ही चांगलीं मुलें आहां, म्हणून हें तरवारीचें भूषण तुम्हांस साजतें. दामू, माझी आठवण रहावी ह्याकरितां मी ही तरवार पान घालवून तुला बक्षीस करितों; हिचा तूं अंगीकार करावा. तुझ्यासारख्यास ही योग्य आहे.

**वडी० पो०**—रावसाहेब, आपला थोरपणा पाहून आम्ही

आनंद पावलों. आज्ञा द्याल तर आतां एथून जातों. आमचें एथें असणें गणपतरावजींस आज साहणार नाहीं.

**संभा०**— नाहीं नाहीं, माझ्या जिवलगांनो, तुह्मी एथें असावें. मी जवळ असतां माझा मुलगा तुमच्या संतोषांत बिघाड करूं शकणार नाहीं. तुह्मी सर्व एथें खेळा. माझी मुलगी तुह्मांकडे येऊन तुह्मांस जें हवें तें पुरवील. चला मजसंगतीं दुसऱ्या दिवाणखान्यांत. (गणपतरावाकडे पाहून म्हणतो) पोरा, तूं जर येथून हाललास तर खबरदार. एथें एकटा राहून आपला वाढदिवस हवा तसा कर. तूं ह्मातारा झालास तरी तुझ्या आंगीं योग्यता येईपर्यंत तुला तरवार मिळावयाची नाहीं.

( सर्व निघून जातात. )

---

# १५. आवडी आणि मोरू.

काशीबाई म्हणून एक विधवा स्त्री होती. तिला आवडी आणि मोरू ह्या नांवांचीं दोन मुलें होतीं. तीं दोघेंही तिच्या ममतेस योग्य होतीं; परंतु तिची प्रीति मोरूवर फार असे. आईस मोरू अधिक आवडतो हें लक्षांत येऊन आवडीस दुःख होई, पण तिनें तें बाहेर दाखविलें नाहीं. ती रूपानें साधारण, पण गुणांनीं फारच उत्कृष्ट होती; पण तिचा भाऊ मदनासारखा सुरूप, त्यावर आईची प्रीति असून ती त्याचेच लाड फार करी; प्रीतीनें त्याचे मुके वारंवार घेई. चाकर कुळंबिणीही धनिणीची मर्जी पाहून त्याचा संतोष राखीत. आईच्या अप्रीतीमुळें आवडीस कोणी गणीत नसत. तिला हवा तो पदार्थ मिळूं नये. अन्नवस्त्रादिक जें जरूर त्याचेही तिला हाल काढावे लागत. ती एकांतीं जाऊन धाय धाय रडे, परंतु बाहेर कधीं आपल्या दुःखाचें एक अक्षरही बोलली नाहीं, किंवा तिणें असंतोषाचें चिन्हही दाखविलें नाहीं. आपण सुंदर नाहीं, म्हणून जें

आपणावर आईचें दुर्लक्ष आहे, तें तिच्या मनांतून जावें ह्मणून आवडीनें नाना उपाय केले; वर्तावें तसें वर्तली; संथपणानें चालली; आज्ञेस जपली; परंतु व्यर्थ. जे डोळे बाह्यरंगास भुलले, त्यांची दृष्टि तिच्या आंतल्या गुणांकडे पोहोंचेना. सांगितलें काम आवडी जीव तोडून करी. पण काशीबाईच्या लक्षांत तें येऊंच नये. आवडी जन्मून लागलाच काशीबाईचा भ्रतार वारला, तेव्हांपासून तिला तिचा वीटच आला. तिनें तिला नित्य गांजावें, आणि जे गुण मोठ्या बायकांतही विरळा ते तींत नाहींत म्हणून तीस शब्द लावावा.

अशी ती वाईट आई एके समयीं दुखण्यांत पडली. तिची व्यथा पाहून मोरू फार विव्हळ झाला. तिची दीनवाणी मुखचर्या व काकुळतवाणी दृष्टि पाहून आवडीस वाटलें कीं, तिच्या खाष्टी स्वभावास अंतर पडलें. तें पाहून तिनें भावापेक्षां शतगुणित अधिक तिची सेवा आरंभिली. तीस जें हवें तें मागायास तिला बोलायाचे श्रम पडतील, ह्मणून आवडीनें आपल्या शहाणपणानें तें लक्षांत आणावें, आणि त्याची तरतूद ठेवावी. दुखणें भारी होतें तों तिनें तिची खाट सोडिली नाहीं. आईनें तिची विनवणी करावी, शेवटीं धाक दाखवूनही सांगावें, तरी तिनें एक क्षणभर निद्रा घेऊं नये. शेवटीं काशीबाई बरी झाली, त्या समयीं आवडी स्वस्थ झाली. असें असतांही आईनें पूर्वीप्रमाणें तिजसंगतीं कठोरपणा आरंभिला; तो पाहून आवडीस पुनः चिंता उत्पन्न झाली.

एके दिवशीं काशीबाई मुलांसंगतीं आपल्या दुखण्याच्या गोष्टी करीत बसली असतां ती त्यांस ह्मणाली, "मुलांनो, तुह्मीं माझा फार समाचार घेतला. मी तुमची उपकारी झालें आहें, ह्यासाटीं तुह्मांस. आवडेल ती वस्तु माझें सामर्थ्य पाहून मागा, मी देईन." तिनें मोरूस पहिल्यानें पुसलें, "मोरू, तुला काय पाहिजे?" मोरू म्हणाला, "एक कंठी आणि चौकडा." ती म्हणाली, "तुला मी तें उद्यां सकाळीं देईन; आणि

आवडे तुला ग?" आवडी कांपत कांपत उत्तर करिते. "काय? मला? मला? तूं मजवर प्रीति करिशील तर मला आणखी कांहीं नको!" आई ह्मणाली, "हें उत्तर नव्हे. मी तुला कांहीं बक्षीस देणार तुला काय पाहिजे तें बोल लवकर."

आवडीस नित्य आईचें कठोर भाषण ऐकायाची संवय होती. तथापि ते समयीं त्या शब्दांनीं तिला फारच दुःख झालें. तिनें आईचे पाय घट्ट धरून आसवांनीं न्हाणिले. मग पाणी भरलेल्या डोळ्यांनीं आईच्या तोंडाकडे पाहून लागलेंच तिनें दोहों हातांनीं आपलें तोंड झांकलें, आणि ती हळूच हे शब्द बोलली, "जसे तूं प्रीतीनें मोरूचे मुके घेतेस, तसे माझे दोन मुके घे."

ते शब्द ऐकून आईचें कठोर हृदय लागलेंच वितळलें. मग तिला मिठी मारून उराशीं घेऊन तिनें तिला मुक्यांचा सुकाळ केला. आवडीला तो पहिल्यानेंच लाभ. तिनें त्या समयीं आनंदांत निमग्न होऊन आईच्या तोंडाचे, गालाचे, डोळ्यांचे, उराचे, हातांचे, पुष्कळ मुके घेतले.

तें पाहून मोरूसही फार आनंद झाला. तोही तिचे मुके घेऊं लागला. त्या दिवशीं आईस असें झालें कीं; मी आज स्वर्गसुखच भोगितें आहें कीं काय; अमृतपानच करितें आहें कीं काय? मुलांस असें वाटलें कीं, आई नव्हे, हा आमचा कोणी कल्पवृक्ष आहे! तीं जी जी इच्छा करीत ती ती आई तत्काळ पुरवी. ह्याप्रमाणें तें कुटुंब त्या दिवसापासून फार सुखी झालें. काशीबाईनें आवडीपासून फार दिवस प्रेमा आटोपून ठेविला होता तो तिला सव्याज दिला. आवडीनेंही आईच्या ठायीं नित्य नवा प्रेमा करून तिला संतुष्ट केलें. मोरूसही त्या गोष्टीचें लवमात्र दुःख किंवा हेवा झाला नाहीं. बहीण सुखी झाली हें पाहून त्यास आनंद झाला. आईनें पूर्वीं त्याचे अतिशयच लाड केले, त्यानें त्याचा मूळचा चांगला स्वभाव अंमळ बिघडला, आणि तो पुढें कांहीं वाईट गुण

करूं लागला; त्यामुळें दोन चार वेळ आईची माया त्यावरून अगदीं उतरायाचा प्रसंग आला होता; पण आवडीनें त्याविषयीं रदबदली करून त्यास संभाळून घेतलें. तिनें त्यास वारंवार शहाणपणाची बुद्धि शिकवीत असावें, तेणेंकरून तो मुलगा मग चांगला झाला; आणि त्या तिघांच्याही अनुभवास पक्कें आलें कीं, भावाबहिणींची, मायलेंकरांची, परस्पर ममता असल्यावांचून कुटुंबामध्यें वास्तविक सुख वसत नाहीं.

---

## १६. कोंकरूं.

एका गरीब गांवढेकऱ्याची मुलगी लाडी एके दिवशीं सकाळी हातांत दुधाचें भांडें व न्यहारीस कांहीं भाकर घेऊन रस्त्याच्या बाजूस बसली होती. तितक्यांत तिकडून एक धनगर गाडा भरून कोंकरें विकायास नेत होता. तीं कोंकरें पाय बांधून एकावर एक रचिलीं होतीं, व त्यांपैकीं कित्येकांचीं डोकीं खालीं लोंबत होतीं, तीं कोंकरें त्या व्यथेनें ओरडत, तेणेंकरून तो सर्व प्रदेश गोंगाटानें भरून जाई. तें ऐकून लाडीचें हृदय भेदलें; पण धनगराच्या चित्तास कांहीं द्रव आला नाहीं. त्यानें आपल्या खांद्यावरही एक कोंकरूं चालविलें होतें.

तो लाडीच्या अगदीं जवळ आला, तेव्हां त्यास खांद्यावरील कोंकरूं मेलेंसें वाटून त्यानें तें तिजकडे उडविलें, आणि तो ह्मणाला, “मुली, घे हें तुला मीं न्यहारीस दिलें. ह्या रांडेच्यानें मरून मला दोन रुपयांचा चट्टा लावला.” असें म्हणून तो पुढें चालता झाला.

आपली दूधभाकर सोडून देऊन तत्काळ त्या कोंकरास उचलून उराशीं घेऊन दयार्द्रदृष्टीनें त्याकडे लाडी निरखिते आणि म्हणतेः– “अरे कोंकरा, मला तुझी दया कां येते बरें! आज नाहीं तर उद्यां तरी ते तुझ्या गळ्यांत सुरी भोंसकतेच, तें भय तुला आतां राहिलें नाहीं.” असें ती म्हणते आहे, इतक्यांत

तिच्या आंगाची ऊब लागून कोंकरानें अंमळ डोळे उघडिले, आणि हातपाय हालवून 'बें' असा हळूच शब्द केला—जसें कोणी ह्मणेल तें आईसच बोलावितें आहे. त्या समयीं जो लाडीस आनंद झाला, तो कोण वर्णील! तिनें त्या कोंकरास परकरांत झांकिलें; त्यावर आंगांतली चोळी काढून घातली; त्याला अधिक ऊब यावयास मान मांडीपर्यंत लवविली; मोठ्या बळानें त्याच्या नाकाकानांत फुंका मारिल्या. नंतर तें हळू हळू हालूं लागलें. तेव्हां त्याच्या प्रत्येक हालण्यानें तिचा ऊर आनंदानें भरून येई. मग तिनें भाकर मोडून दुधांत टाकिली; आणि तींतील एक तुकडा घेऊन कोंकराचें तोंड उघडून मोठ्या प्रयत्नानें तो आंत घातला. कोंकरूं उपासानेंच मरायास टेकलें होतें. त्यास तें अन्न पोहोंचतांच अंमळ शक्ति आली. मग तें पाय मोकळे करूं लागलें. घटकाभरानें लागलेंच त्याला आपल्या पायीं उभें रहायाची शक्ति आली. मग तें आपल्या आपण लाडीच्या दुधाच्या भांड्याकडे गेलें, आणि त्यानें त्यांतली सगळी दूधभाकर खाल्ली; तें पाहून लाडी कौतुकानें हसली. दुसरी एक घटका गेली नाहीं तों तें लाडी पुढें नानाप्रकारें नाचूं बागडूं लागलें.



लाडीस आनंद होऊन तिनें त्यास कवटाळून धरिलें आणि धावत घरीं जाऊन तें आईस दाखविलें. त्या वेळेपासून त्याचें नांव 'बाबा' ठेवून तिनें सर्व प्रकारें त्या कोंकराचें ममतेनें पालन केलें. तिला भाकर मिळे त्यांतली ती त्यास घालीत जाई; पाणी पाजी, कुरवाळी, आपल्या खाटेवर निजवी. ती ह्मणे, "ह्याच्याबद्दल मला कोणी शेंभर मेंढरें दिलीं तरी नकोत." तेंही लाडीचे उपकार जाणून तिजवांचून पाऊल टाकीत नसे. त्यानें यावें, आणि तीस चाटावें; तिच्या हातावरचें खावें, तिच्या भोंवतीं बागडावें. कधीं तिला त्यास न नेतां बाहेर जायाचें पडे, तेव्हां त्यानें ती येई तोंपर्यंत करुणा येई असें ओरडत असावें.

ह्याप्रमाणें लाडीनें त्या अनाथ काकराचें ममतेनें पोषण केलें. त्याचें फळ तिला ईश्वरानें लवकरच दिलें; बाबाची मोठी मेंढी झाली. तेव्हां तिनें लाडीस पुष्कळ जांवपीं दिलीं, त्यांचाही आणखी विस्तार होत गेला. सारांश थोडक्या वर्षांत लाडीच्या सर्व कुटुंबास पिण्यापुरतें दूध, आणि नेसायास लोंकरीचीं पांघुरणें, हीं त्या बाबाच्या संततीपासून भरपूर प्राप्त होत गेलीं.

---

## १७. द्राक्षीचा खुंट.

अवरंगाबादेमध्यें शिवराव ह्मणून कोणी एक गृहस्थ होते. ते एके दिवशीं आपला मुलगा अनंता ह्यास घेऊन बागांत फिरत होते. तेथें अनेक प्रकारचे वृक्ष फुलले आहेत, कित्येकांस नुकतीच पालवी फुटली आहे, कितीएक हिरवे चार दिसताहेत. कित्येकांस पांढरा, कित्येकांस तांबडा मोहोर आला आहे, असें त्यांनीं पाहिलें.

ते अंमळ पुढें चालत चालत बागांतील बंगल्यापाशीं येऊन पोहोंचले. तेथें बंगल्याच्या समोर एक द्राक्षीचा खुंट होता. त्यास वेडेवांकडे पीळ पडले आहेत; त्यावर पान नांवास नाहीं. त्याचे बोडके ताणे अव्यवस्थितपणें इकडे तिकडे चालले आहेत. तें पाहून अनंता बापास ह्मणतो, "बाबा, पहा हें भिकारी झाड, ह्याचा एथें काय बरें उपयोग ? तूं राम्याला सांगून हें तोडवून याचीं लाकडें कां करवीनास ?"

असें ह्मणून तो त्या झाडास हिसके मारूं लागला; पण त्याचीं मुळें खोल गेलेलीं, तें त्याच्या देवास उपटतें ? त्यास शिवराव ह्मणतात, "मुला, तूं त्यास दुखवूं नको; मला तें तसेंच ठेविलें पाहिजे, वेळ येईल तेव्हां मी तुला त्याचें कारण सांगेन."

**अनंता**—पण बाबा, त्याजवळ दुसरीं झाडें आहेत तीं.

पहा कशीं फळांनीं पुष्पांनीं भरलेलीं आहेत! हें तसें असतें तर मग ह्यास ठेवणें नीट होतें. ह्या दुसऱ्या शोभिवंत झाडांत हें फार ओंगळ दिसतें. मी राम्यास सांगून तें उपटून टाकवितों परतें.

शिवराव—नको माझ्या लाडक्या, मी तुला सांगतों कीं, हें असेंच असूं दे; आणखी तीन महिनेपर्यंत तरी असूं दे. पाहिजे तर मग उपटून टाक.

अनंता आग्रह करी कीं, तें उपटून टाकावें; बाप त्यास दुसऱ्या गोष्टीचा नाद लावी. असें होतां होतां अनंतास विसर पडून ती गोष्ट त्या दिवशीं तशीच राहिली. एके दिवशीं शिवरावास कांहीं कामामुळें दूर गांवीं जायाचें पडलें. तो चैत्रमासपर्यंत घरीं आला नाहीं, नंतर आला तेव्हां प्रथम तो मुलास समागमें घेऊन बागांत गेला.

त्या दिवशीं उकाडा फार होत होता, म्हणून ते दोघे बंगल्याच्या छायेस जाऊन बसले. त्या समयीं अनंता म्हणाला 'आहा बाबा! काय ही छाया थंड आहे! काय हीं झाडें शोभा देतात! बरी आठवण झाली—आपण तो त्या दिवसाचा खुंट आज उपटून टाकूं, आणि त्या ठिकाणीं हें सुंदर झाड दिसतें आहे हें लावूं. ह्याचीं फळें काय रम्य दिसतात! कांहीं जांभळीं, कांहीं अगदीं काळीं. इतक्या सगळ्या बागांत ह्यासारखें देखणें झाड मला दुसरें दिसत नाहीं. दुसऱ्या झाडांवर आतां फळें दिसत नाहींत, पण हें पहा कसें सर्वांगीं झांकलेलें आहे! त्या पानांमागें घड कसा चांगला दिसतो आहे! त्याचीं फळें सुंदर दिसताहेत, तशींच गोड आहेत कीं नाहींत, हें मला पहायाचें आहे."

शिवरावांनीं त्यास त्यांतून एक द्राक्ष तोडून दिलें, तें चाखून त्यास अधिकच आनंद झाला; मग जेव्हां त्याच्या बापानें त्यास सांगितलें कीं, त्या दिवशीं तूं उपटून टाकायास उभा राहिला होतास, त्या ओंगळ खुंटाचीं हीं फळें, ह्यांस द्राक्षें म्हणतात,

तेव्हां त्यास बहुतच आश्चर्य झालें. त्यास बाप म्हणाला, "मुला आतां तुझी इच्छा असली तर मी राम्यास बोलावून ह्याचीं जाळायास फांटीं करवितों."

अनं०—नका बाबा नका, असें करूं नका. हवीं तर त्यानें दुसरीं सगळीं झाडें तोडावीं. पण हीं द्राक्षें मला फारच आवडतात.

शिव०—तर आतां पहा कीं. तूं सांगत होतास तें मीं ऐकिलें नाहीं म्हणून चांगलें झालें. मुला, तें झाड पाहून तुला जसें वाटलें तसेंच लोकांस वाटत असतें. कोणी मुलगा वस्त्रहीन, बाहेर दिसण्यांत ओंगळ, असा आपण पाहिला, म्हणजे त्याची आपण हेळणा करितों, आणि त्याच्या अवस्थेशीं आपली अवस्था ताडून पाहून आपण मोठे मनुष्य असें मानून गर्वानें फुगतों; कोणे वेळेस आपण त्यास कठोर वचनेंही बोलायास सोडीत नाहीं. तर मुला, असें जेथें दृष्टीस पडेल तेथें उतावीळ होऊन एकाएकीं निश्चय करूं नको; कोण जाणे तें ओंगळ शरीर अशा थोरा जिवाचें बिऱ्हाड असूं शकेल कीं, जो जीव आपल्या सदाचरणानें, पुरुषार्थानें, एकाद्या दिवशीं विश्वास आश्चर्य करायास लावील, किंवा आपल्या ज्ञानानें लोकांचें अज्ञान दूर करील. जो सांप्रत वांकडा खुंट आहे, तो पुढें कदाचित् उत्तम फळांनीं भरून जाईल.

---

## १८. खोत.

एके दिवशीं प्रातःकाळीं दौलतराव आपल्या खोलींत मोठ्या कामांत गुंतले होते, तों चाकर सांगत आला कीं, महादजी खोत बाहेर दरवाज्याशीं आला आहे, तो भेटावयास इच्छितो. दौलतरावांनीं सांगितलें कीं, मेहेरबानीनें अंमळ दिवाणखान्यांत बसण्यास त्यांस सांग; पत्र पुरतें करून मी हाच येतों. चाकरानें

खोतास दिवाणखान्यांत आणिलें. त्या वेळेस दौलतरावांचीं मुलें रामराव, कृष्णराव, व सावित्रीबाई, हीं तेथें होतीं. तो आंत जातांच त्यानें त्यांस पृथक् पृथक् रामराम केला; परंतु कुळंब्याचें नमणें पडलें अडाणीपणाचें; त्यास उभें कसें रहावें, कोणत्या रीतीनें हात वर करावा, मस्तक कसें खालवावें वगैरे शहरचे रिवाज ठाऊक नव्हते. ते दोघे मुलगे त्याची थट्टा करून एकमेकांकडे पाहून हातानें तोंड झांकून हसूं लागले. ते त्याजवळ आले, व त्याचा पोषाक नीट न्यहाळून पाहूं लागले. नंतर एकमेकांच्या कानाशीं लागून मोठ्यानें हसले. कुळंब्यास त्याची मोठी लाज झाली. शेवटीं रामरावानें चेष्टेची पराकाष्ठा एथवर केली कीं, तो महादजीच्या सभोंवतीं फिरला; आणि नाक धरून आपल्या भावास विचारितो, " कृष्णराव, एथें शेणाची घाण येते असें तुला वाटत नाहीं ? " मग त्यानें निखारे घालून धुपाटणें आणिलें, आणि त्यावर ऊद टाकून ती घाण घालवायास दिवाणखान्याभर तो फिरला; नंतर गड्यास हाक मारून त्यानें सांगितलें कीं, " तो मनुष्य आला आहे त्याच्या पायांची धूळ सत्रंजीस लागली आहे ती झाडून काढ. " ती भावाची चेष्टा पाहून इकडे कृष्णराव कुशीस वळून खदखदां हसूं लागला.

त्यांची बहीण सावित्रीबाई उगीच होती; तीस तें रुचलें नाहीं. तिनें भावांस शब्द लाविला; आणि खोतास राग येऊं नये, ह्मणून ती त्याची समजूत करूं लागली. तिनें त्याला खालीं बसविलें. आपल्या हातीं पानसुपारी दिली; चांगला मिरजी तंबाखू पुढें ठेविला; आणि त्याची काठी बाहेर ठेविलेली होती ती आपण स्वतः आणून त्याच्याजवळ ठेविली. इतक्यांत दौलतराव आंतून आले, त्यांनीं त्यापाशीं येऊन मित्राप्रमाणें त्याला हातीं धरून आपल्याजवळ लोडाशीं बसविलें. आणि त्याच्या मुलांमाणसांचा समाचार पुसून, येण्याचें कारण विचारिलें. त्यानें उत्तर केलें, " मी आपला सहामाही हप्ता

भरायासाठीं आला आहें." मग तेथेंच त्यानें मोहरांनीं भरलेला कमरेचा कसा काढिला आणि दौलतरावांसमोर रिकामा केला; आणि ह्मणाला, "मुदतीवर चार दिवस अधिक गेले ह्मणून रावजींस राग येऊं नये. परवां पाऊस मोठा पडला त्यामुळें गाडीवाट चार दिवस बंद पडली होती, ह्याकरितां दाणा बाजारास ओपून टाकायास माझ्यानें नेववला नाहीं."

दौलतराव ह्मणाले, "खोतजी, तुह्मांविषयीं माझ्या मनांत कधीं वांकडें यावयाचें नाहीं; तुह्मी प्रामाणिक मनुष्य आहां हें मी जाणतों; मुदत भरली ह्मणून तुह्मांकडे शिपाई पाठवावयाचें काम नाहीं." दौलतराव त्या मोहरा गालिचावर मोजीत होते, त्यांची चकाकी पाहून रामराव खोतजीच्या तोंडाकडे पहातो, आणि मनांत ह्मणतो, हा कोणी मोठा मनुष्य आहे.

मोहरा मोजून झाल्यावर खोतजीनें मुलांकरितां खाऊ ह्मणून कांबळींतून पुडी काढिली; तींत कांहीं सुकेळीं, फणसपोळी, आंबेपोळी, व सुकविलेले अंजीर, असें होतें. ती दौलतरावाच्या पुढें ठेवून तो ह्मणाला, "रावजी, माझी एक इच्छा आहे, ती कृपा करून पुरवावी— कीं, एके दिवशीं आपण मुलांसहवर्तमान माझ्या गांवीं येऊन मला आनंद करावा. माझी बैलांची गाडी घेऊन मी स्वतः तुह्मांस न्यावयास येईन."

दौलतरावांनीं बरें ह्मटलें, आणि त्यास जेवावयास रहाण्याविषयीं फार आग्रह केला. खोत म्हणाला, "क्षमा करा, मला शहरांत लोकांशीं पुष्कळ कामें आहेत; आणि घरीं लौकर गेलें पाहिजे." दौलतरावांनीं खोतजीच्या मुलांकरितां मनुका, बदाम, खडीसाखर, ह्यांचा पुडा करून दिला. नंतर खोतजीस सत्कारपूर्वक दरवाज्यापर्यंत पोहाचवून त्याचा निरोप घेऊन ते मागें परतले.

खोतजी गेल्यानंतर सावित्रीबाईनें, भावांनीं खोताचा अपमान केला तो त्यांच्या तोंडावर बापास सांगितला. दौलतराव तें ऐकून त्यांवर फार रागावले; आणि त्यांनीं सावित्रीस शाबा-

सकी दिली. तिला उचलून तिचा मुका घेऊन ते ह्मणाले, "भल्या माणसाशीं कसें चालावें हें, माझ्या बेटा, तुला चांगलें समजतें."

नंतर खोतानें दिलेली पुडी त्यांनीं उघडिली, आणि त्यांतले कांहीं अंजीर व सुकेळीं मुलगी व आपण मिळून खाल्लीं. रामराव व कृष्णराव जवळ होते, पण त्यांस दिलीं नाहींत. ते पदार्थ पाहून त्यांच्या जिभेस पाणी सुटलें, ते मिटक्या मारूं लागले, पण तें दौलतरावांनीं लक्षांत आणिलेंच नाहीं. त्यांनीं पुनः सावित्रीची प्रशंसा केली, आणि तिला उपदेश केला कीं, "वाईट वस्त्रांवरून एकाद्यास हसावें हें हलक्या मनुष्याचें काम. जर आपण उंच वस्त्रांवरून कोणास मोठा मनुष्य मानिलें तर तो त्याच्या वस्त्रांस मान दिला असें होतें; त्यांत त्यांच्या धारकास कांहीं नाहीं. जे साधीं चिरगुटें पांघरतात, ते प्रायशः प्रामाणिक पुरुष असतात. ह्यास दृष्टांत ह्या खोतजीचाच. तो मेहनत करून आपल्या बायकोलेंकरांचें पोट भरितो, व वेळच्या वेळेस करारप्रमाणें हप्ता भरायास कधीं चुकत नाहीं, असें मी आज सतत पांच वर्षें पहातों. मुली, हा जर असा प्रामाणिक नसता तर तुझा आणि तुझ्या भावांचा खर्च माझ्यानें चालवताना; कांकीं, ह्यापासून जो पैसा येतो त्यानें तुमचें अन्नवस्त्र आणि शिकणें होतें."

असें भाषण करून राहिलेला खाऊ दौलतरावांनीं फडताळांत ठेवून त्यास कुलूप लाविलें. रामराव आणि कृष्णराव त्यांच्या मागून मागून मोठ्या आशेनें गेले, त्यांस बाप ह्मणाला, "तुह्मी समजत असाल कीं, बरें आतां नाहीं तर संध्याकाळीं तरी ह्यांतलें कांहीं आह्मांस मिळेल; तर मी निक्षून सांगतों, तुम्ही ह्याची आशा अगदीं सोडा. तुमच्या भलेपणाविषयीं खोतजीची खातरी झाली म्हणजे तोच तुम्हांस कांहीं पाठवून देईल."

राम०—पण बाबा, त्याच्या आंगास घाण येत असली तर त्यांत काय माझा अन्याय ?

दौल०—त्याच्या आंगास कसची घाण येत होती ?
राम०—शेणाच्या उकिरड्याची—इश्शरे, ती सोसवेना मला!
दौल०—त्यानें ती घाण कोठून आणिली असावी बरें?
राम०—मला वाटतें कीं, तो शेण भरीत असतो.
दौल०—असें काय? तर शेण भरल्यावांचून त्यानें कसें करावें ?
राम०—त्यानें—त्यानें—त्यानें—
दौल०—मला वाटतें कीं त्यानें भुईस खत अगदींच घालूं नये.
राम०—तोच एक उपाय दिसतो.
दौल०—जर खत नाहीं घातलें तर पीक चांगलें कसें येईल? पीक वाईट आलें तर त्याच्यानें मला सारा कसा देववेल? रामराव पुढें कांहीं बोलता, पण बापानें जे डोळे केले त्यांत त्यास बापाचा राग स्पष्ट दिसून आला, म्हणून तो उगीच राहिला. त्यावर आठ दिवस गेले, तेव्हां महादजी खोत पुनः आला. त्यानें दौलतरावांस मोठी भीड घातली कीं, आज आपले पाय माझ्या घरीं लागावे.

दौलतरावानें त्याच्या आवडीकरितां बोलावणें पतकरलें. त्या वेळीं रामराव व कृष्णराव ह्यांनीं बापाची मोठी काकळूत केली कीं, आम्हांस बरोबर न्यावें; आम्ही तेथें मोठ्या विनयानें चालूं. मग दौलतराव त्यांची प्रार्थना ऐकून त्यांसहवर्तमान खोतजीच्या गाडींत बसले. खोतजीनें गाडी हांकून हांहां म्हणतां त्यांस आपल्या घरीं नेलें तें त्यांस समजलें देखील नाहीं. गाडीचा शब्द ऐकून खोताची बायको सोनूबाई लवकर बाहेर आली, आणि तिनें आंगण्याचा दरवाजा उघडिला. त्या वेळेस तिला जो आनंद झाला तो कोण वर्णील! तिनें मुलांस गाडींतून खालीं घेतलें, एकेकास आलिंगन दिलें, त्यांचे मुके घेतले, आणि ती त्यांस घरांत घेऊन गेली. तेथें तिचीं मुलेंही शृंगारून ह्यांची वाट पहात बसलीं होतीं. त्यांनीं मोठ्या प्रीतीनें

व मोठ्या नम्रतेनें त्यांचें आगतस्वागत केलें. मग खोतजीनें दौलतरावांस माडीवर नेलें. तेथें द्राक्षें, निंबें, चकोत्रे, अननस, डाळिंबें, केळीं, अंजीर, पेरू, अशीं नानाप्रकारचीं फळें, व गुलाब, मोगरा, जाई, कुंद, शेंवती, चांपा, अशीं फुलें आधींच आणून ठेविलीं होतीं. पाणी स्फटिकासारखें निर्मळ व अमृतासारखें गोड, खडीसाखर, बदाम, पिस्ते, व निंबाचें सरबत हींही तेथें होतीं. दौलतरावांनीं अंमळ स्वस्थ होऊन मुलांसहवर्तमान त्यांतलें कांहीं खाल्लें, आणि ते समाधान पावले. खोतजीचीं भांडीं सोन्यारुप्याचीं नव्हतीं, तांब्यापितळेचींच होतीं, पण स्वच्छ लकलकीत होतीं. ज्यांवर पदार्थ वाढले होते तीं ताटें नव्हतीं; केळीच्या अगोतल्या होत्या. तें पाहून रामराव कुशीस होऊन कृष्णरावाकडे पाहून गालांतले गालांत हसला; व कृष्णरावही त्याकडे पाहून हळूच हसला. तें खोतजीच्या लक्षांत येऊन तो ह्मणाला, "रावजी, तुह्मी आपल्या घरीं रुप्याच्या ताटांत पदार्थ खातां तसें एथें नाहीं खरें, पण आह्मी गरिबांनीं भक्तीनें तुह्मांस अर्पण केलें आहे, ह्यांत गोड करून घ्यावें."

मग फलाहार झाल्यावर ते अंमळ वाडींत इकडे तिकडे फिरले, तों जेवणाची वेळ झाली. जेवणही साधें, स्वच्छ, आणि मिष्ट होतें. ते पदार्थ भक्षून मुलांस वाटलें कीं, आम्ही असे रुचीनें कधींच जेवलों नव्हतों. दिवस उष्णकाळाचे होते; वारा मंद, सुगंध, शीतळ वहात होता; त्याच्या योगानें दौलतरावांस डुलकी आली. मग अंमळ वामकुक्षि करून खोतजी आणि आपण असे वाड्या, शेतें, डोंगर, ह्या सर्व ठिकाणीं फिरायास गेले. तेथें बहुत आनंद पावून ते पुनः बिर्‍हाडीं आले. इकडे सोनूबाईनें जेवणानंतर आपल्या व दौलतरावांच्या मुलांस संगतीं घेऊन त्यांस सर्व घर दाखविलें. गुरांचा वाडा, घोड्यांची शाळा, बकरीं, मेंढरें, हरणें अशीं दाखवून एक चिमणें कोंकरूं त्यांस खेळायास दिलें. पुढें कबुतरें दाखविलीं—त्यांच्या पिलांस त्यांच्या आया चारा घालीत, व तीं

चाऱ्याकरितां किलबिल किलबिल करीत. तिनें त्यांस पुढें नेऊन दहावीस मधाचीं पोळीं दाखविलीं. त्यांतल्या माशा बाहेर जाऊन मध घेऊन येऊन त्यांत ठेविताहेत, असा उद्योग चालला होता तो सर्व तिनें त्यांच्या दृष्टीस पाडिला. तें दाखविल्यावर आणखीही गांवांतले दुसरे पुष्कळ पदार्थ तिनें त्यांस दाखविले.

त्यांतले बहुतेक चमत्कार दौलतरावांच्या मुलांनीं पूर्वी कधीं पाहिले नव्हते; म्हणून त्यांस फार आनंद वाटला. तीं ह्मणूं लागलीं कीं, "फिरून एक वेळ आपण फेरी करून येऊं." इतक्यांत घरांतून निरोप आला कीं, मुलांच्या जेवणाची तयारी झाली आहे; तो येतांच सोनूबाईनें त्यांस नेऊन पुनः यथेष्ट जेवूं घातलें.

नंतर खोतजीनें आणि त्यांच्या वडील मुलानें वीणा सारंगी लावून अंमळ गायन केलें. धाकट्या मुलांनींही कांहीं पदें ह्मटलीं. तें ऐकून दौलतराव फार प्रसन्न झाले.

खोतजी वाद्यें गवसणींत घालीत आहेत तों दौलतराव आपल्या मुलांस म्हणतात, "रामराव, कृष्णराव, अंमळ तुह्मीही गावें." असें म्हणतांच ते गोंधळले; तें पाहून सर्व हसूं लागलीं.

नंतर दौलतरावांनीं गाडी तयार करायास सांगितलें. खोतजीनें ती रात्र रहाण्याविषयीं दौलतरावांस फार आग्रह केला त्यांनीं "क्षमा करा, माझ्यानें रहावत नाहीं," असें म्हणून जायाचाच निश्चय केला. नंतर गाडींत बसून चालले आहेत तों मार्गांत दौलतरावांनीं पुसलें, "कां, रामराव आज तुह्मांस कसें वाटलें?"

राम०—फार बरें बाबा, तीं माणसें फार भलीं आहेत. त्यांनीं आम्हांस फार आनंद दिला.

दौल०—तुह्मांस आनंद वाटला ह्यांत मी समाधान पावलों; पण जर खोतजीनें आपल्या सत्कारासाठीं इतका श्रम नसता घेतला, जर त्यानें तुह्मांस अगदींच कांहीं खायास नसतें दिलें, तर तुम्हांस असा आनंद होता काय ?

राम०—नसता झाला, ह्यांत काय संशय ?

दौल०—मग तो मनुष्य तुझांला कसा वाटला असता.

राम०—वाईट; गव्हार वाटला असता.

दौल०—असें ? तर तो मनुष्य त्या दिवशीं आपल्या घरीं आला होता, त्या वेळेस तुम्हीं त्याला खावयास कांहीं दिलें नाहीं; तें नाहीं तर नाहीं, पण उलटा त्याचा खेळ केला, तर आतां सुजन कोण, तुम्हीं कीं तो ?

राम०—(लज्जा पावून) आपला सत्कार करावा हा त्याचा धर्म होय, कांकीं त्यास आपल्या जमिनीचें उत्पन्न मिळतें.

दौल०—मिळतें कसें ?

राम०—आपल्या जमिनींत दाणा, कडबा, फळफळावळ, वगैरे उत्पन्न होतें तें सगळें तो घेतो.

दौल०—खरें सांगतोस. खोतास ह्या सर्वांचा उपयोग होतो. पण तो सगळ्या दाण्याचें काय करितो ?

राम०—त्यानें तो आपलें, आपल्या बायकोचें आणि मुलांचें पोट भरतो.

दौल०—आणि कडब्याचें ?

राम०—तो तो आपल्या बैलांस खायास घालतो.

दौल०—आणि बैलांचा काय तो उपयोग करितो ?

राम०—त्यांस तो नांगरास लावितो.

दौल०—बरें तर, हें इतकें उत्पन्न जमिनीचें जमिनीकडेस लागलें; पण तुला खरोखर वाटतें, कीं बाकीचें राहिलें तितकें सगळें त्याच्याच कुटुंबास आणि बैलांस लागतें ?

राम०—त्यांतला विभाग कांहीं गाईम्हशींसही मिळतो.

कृष्ण०—कांहीं मेंढ्यांसही.

दौल०—तें खरें, पण जितकें उत्पन्न होतें तितकें सगळें तीं खातात काय ?

राम०—नाहीं. त्यांतील कांहीं भाग विकून मी पैसा करितों असें तो म्हणत होता.

दौल०—आणि त्या पैक्याचें तो काय करितो ?

राम०—मीं थोडक्या दिवसांवर पाहिलें कीं, त्यानें एक पिशवी भरून पैका आणून तुला दिला.

दौल०—ह्यावरून पहा कीं माझ्या जमिनीच्या उत्पन्नांतून मला अधिक मिळतें कीं खोतास ? कडबी बैलांकडे जाते हें खरें, पण तो खर्च गुरें जमीन नांगरून पुनः परत करितात. गाई, म्हशी, मेंढरें ह्यांच्या शेणाचें खत होतें तेणेंकरून पीक अधिक होतें. त्याचीं बायकोपोरें जें खातात तितकें शेतांत काम करून तें फेडितात. तीं बेणतात, पेरतात, कापतात, झोडितात, व मळणी काढितात; आणि ही सगळी मजूरी माझ्याच नफ्यास पडते. बाकी राहिलें तें तो मला पैसे द्यायाकारितां बाजारांत नेऊन विकतो. आतां त्यास कांहीं त्यांतून रहात असेल असें म्हटलें तर तो इतकी मेहनत करितो ह्याबद्दल त्यास कांहीं नको ? ह्यासाठीं एक वेळ आणखी तूं मला सांग कीं, आम्हां दोघांमधून अधिक उत्पन्न कोण भोगतो ?

राम०—आतां मी स्पष्ट समजलों—तूं अधिक भोगतोस.

दौल०—तर हा खोत नसता तर मला नफा होता ?

राम०—कां ? हा एकच खोत गांवांत आहे काय ?

दौल०—खरें म्हणतोस. पुष्कळ आहेत पण ह्यासारखे भले नाहींत. मागें मीं दुसऱ्या एकास खोती दिली होती, त्यानें जमीन खराब्यास आणिली—झाडें तोडिलीं; घर, बंगले पडायास झाले; सहामाही हप्ता त्यापासून मला पोहोंचूं नये; त्याविषयीं त्यास बोललों तर तो चोख हिशेब दाखवी—कीं त्याचीं सर्व आउतें विकलीं तरी माझी फेड होऊं नये.

राम०—तो लुच्चा असें करी ना ?

दौल०—तर हाही मनुष्य त्याच प्रकारचा असता तर मग मला नफा होता काय ?

राम०—नाहीं.

दौल०—ह्यासाठीं मला जें मिळतें तेणेंकरून मी उपकारी कोणाचा होतों ?

राम०—ह्या भल्या खोताचा ?

दौल०—तर असा जो मनुष्य आपल्या उपयोगास पडतो, त्याचा आदरसत्कार आपण चांगलेपणें करावा हें आपणांस योग्य नव्हे काय ?

राम०—बाबा, तूं माझी चूक मला स्पष्ट दाखविली.

इतकें ह्मणून कांहीं पळें ते उगेच होते. नंतर दौलतरावांनीं पुनः बोलणें चालविलें. ते म्हणाले, "रामराव, तुम्हीं तेथें सारंगी कां वाजिवली नाहीं ?"

राम०—ती मला वाजवायास येत नाहीं.

दौल०—तर खोताच्या मुलांस असें कांहीं येतें आहे कीं, जें तुम्हांस येत नाहीं.

राम०—तें खरेंच. पण मला संस्कृत येतें तें त्यांस कोठें येतें ?

दौल०—आणि तुला शेत नांगरायास कोठें येतें ? तुला दाणा पेरतां येतो काय ? झाडाचीं कलमें करितां येतात काय ?

राम०—तें शिकायाची मला जरूर नाहीं; मला कांहीं कुळंबावा करायाचा नाहीं !

दौल०—जर पृथ्वीवर सगळीं मनुष्यें संस्कृत शिकलीं तर पुढें कसें होईल ?

राम०—वाईट. मग आपणाला दाणा, शाकभाजी हीं मिळणार नाहींत.

दौल०—कोणीही संस्कृत शिकलें नाहीं तर त्यावांचून चालेल कीं नाहीं ?

राम०—मला वाटतें पुष्कळ अंशीं चालेल.

दौल०—तर आतां जो आपला संवाद झाला त्याची जन्मवर आठवण ठेवा कीं, हा खोत, ज्याचा पोषाक जाडा आहे आणि ज्यानें तुला अडाण्यासारखें नमन केलें, हा तुझ्या-

पेक्षां अधिक चांगला; तुजपेक्षां अधिक जाणता; आणि तशांत विशेष हा कीं अधिक उपयोगी गोष्टी जाणणारा. ह्यावरून तूं पहा कीं, जाड्या चिरगुटांवरून किंवा साध्या-भोळ्या रीतीवरून कोणाची अवगणना करणें हा किती अन्याय आहे ?

---

## १९. बापाची समजी.

### नाटक एक अंकी.

### पात्रें.

नारायणराव...कोणी एक सभ्य गृहस्थ.
चिंतोबा.... ..त्याचा मुलगा.
भागीरथी......त्याची मुलगी.
शिवराम......गांवच्या वाण्याचा (विठ्ठलशेटचा) मुलगा
गहिना........त्याची बहीण.

स्थळ.

### नारायणरावाची वाडी.

### प्रवेश १.

### नारायणराव, भागीरथी व चिंतोबा.

**भागी०**—काय बाबा, काय आज्ञा ?

**नारा०**—मी तुला फिरून एक वेळ सांगतों कीं, तुम्हीं कोणी आजपासून त्या वाण्याच्या मुलांशीं संबंध ठेविला तर मी तुम्हांला फार रागें भरेन.

**भागी०**—विठ्ठलशेटीवर इतका तुमचा राग कां बरें बाबा ?

**नारा०**—तें तुला विचारायास अधिकार नाहीं.

**चिंतो०**—नाहीं खरेंच. तें तुला आह्मीं विचारूं नये. (भागीरथीस) अगे, बाबा तुला आज्ञा करील ती निमूट-पणें ऐक; त्यास कां म्हणून उलटून पुसूं नको.

**नारा०**—हाच माझा अभिप्राय; कां कीं विठ्ठलशेट मोठा दांडगा, अनुपकारी, व कृतघ्न आहे. मीं ह्या गांवच्या धन्यानें त्याजपाशीं एक गोष्ट मागितली असतां त्यानें नाहीं म्हणावें! जो आज माझ्या गांवीं राहून सुखी झाला आहे त्यानें!

**चिंतो०**—हें मोठें वाईट बाबा; तर असल्याच्या मुलाशीं आम्हीं आजपर्यंत मैत्री केली हें ठीक नाहीं केलें खरेंच. शिवरामासारिखा संवगडी दुसरा एकच मुलगा जर मला ह्या गांवांत असता, तर मी शिवरामाशीं एक शब्द बोललों नसतों.

**भागी०**—(बापास) तूं ऐकतोस ना भाऊ काय म्हणतो तें?—शिवराम आणि गहिना फार चांगलीं मुलें आहेत. आहा! त्यांसारखीं आम्हीं असतों तर काय पाहिजे होतें!

**नारा०**—तीं बरीं असोत किंवा वाईट असोत. त्यांचें मला काय? मी तुम्हांला आणखी एक वेळ सांगतों कीं, त्यांशीं तुम्ही चकार शब्द बोलूं नका—बोललांत तर तुह्मांस घरांत अडकवून ठेवीन.

**चिंतो०**—शिवरामास ह्या वाडीच्या दरवाज्याशीं तर येऊं दे! मग मी त्याला सांगेन काय आहे तें!

**नारा०**—तूं त्याचें काय करशील? त्याचा अपमान करूं नको हो; त्यास वाईट बोलूं नको हो.

**चिंतो०**—(अंमळ गोंधळून) माझा तसाच अभिप्राय; पण मी त्यास आपल्या वाडीच्या आसपास शंभर हातांत येऊं देणार नाहीं.

**भागी०**—बाबा, विठ्ठलशेट असा मनुष्य असतां तूं त्याशीं इतकी मैत्री बाळगीत होतास! तूं त्यास प्रामाणिक, जाणता, भला, म्हणून मोजीत होतास. तूं पंतोजी ठेविल्याच्या अगोदर फुकटावारी त्यानें भाऊस मोडी शिकविलें हें तुला स्मरत असेलच; आणि मलाही मूळाक्षरापासून त्याचीच शिक्षा.

नारा०—तें सर्व खरें असेल, पण आतां ह्या प्रकरणीं तूं एक शब्द काढूं नको. मी त्याशीं बोलणें वर्ज केलें, तसें तुम्हीं त्याच्या मुलांशीं करावें. काय तुला रडें आलें ? आसवें पूस पाहूं तीं ! माझें सांगितलेलें करायास तुला इतकें अवघड पडतें नाहीं !

भागी०—तसें नाहीं बाबा, त्याचा माझा फार दिवसांचा स्नेह, म्हणून अवघड वाटलें, त्याची तूं मला क्षमा कर. एरवीं तुझी आज्ञा ऐकण्यांत मी भाऊस हारीं जाणार नाहीं.

चिंतो०—पाहूं या आतां कोण हटतें तें !

भागी०—बाबा, तूं म्हणशील कीं मीं त्यांचा द्वेष करावा, तर तें माझ्या हातीं नाहीं; माझ्या मनांत तसें येणारच नाहीं.

नारा०— त्यांचा द्वेष करूं नको, आणि त्यांस उपद्रवही करूं नको. माझी आज्ञा इतकीच कीं तुम्ही त्यांचा संबंध तोडून टाका.

भागी०—तुझ्या मर्जीप्रमाणें मी करीन; पण मला एक गोष्ट मागून घ्यायाची आहे.

नारा०—काय ती ?

भागी०—कीं तुझी आज्ञा मला त्यांस सांगितली पाहिजे, ह्यासाठीं त्यांशीं एक वेळ बोलायाचें पडेल तें मला बोलूं दे.

चिंतो०—कशाला ? आतां त्यांशीं आपणांला काय करायाचें आहे ?

नारा०—खरें म्हणालीस भागीरथी; तूं त्यांना वर हेंही सांग कीं, जर त्यांच्या बापानें तीन दिवसांच्या आंत माझे पैसे दिले नाहींत, तर तो मग पस्तावेल.

भागी०—विठ्ठलशेटीनें तुझें कांहीं देणें आहे ?

नारा०—तुला वाटतें, कीं देणें नसतें तर मी असें बोलतों ? पण तें तुला मनास आणायाचें कांहीं प्रयोजन नाहीं. सांगितली आहे ती आज्ञा ऐक. (तो बाहेर जातो.)

---

## प्रवेश २.

### भागीरथी व चिंतोबा.

**भागी०**—भाऊ, शिवरामापाशीं आणि गहिनेशीं तुझी मैत्री अशीच ना ?

**चिंतो०**—ताई, तूं बाबाची आज्ञा अशीच पाळतेस ना ?

**भागी०**—तूं आज्ञा पाळण्याचा डौल मात्र घातला आहे. आंत तुझें सगळें कृत्रिम आहे. तूं आर्जव संपादून बाबापासून कांहीं पैसे काढायास पहातो आहेस. पैशावांचून तुला दुसरें कांहीं आवडत नाहीं.

**चिंतो०**—मी कधींमधीं बाबाची आज्ञा मोडीत असतों, म्हणून काय इतकी निक्षून मनाई झाली असतांही मीं त्या पोरांकडे जावें अशी तुझी इच्छा आहे ?

**भागी०**—त्यांची मैत्री तोडायास तुला कांहींच अवघड वाटत नाहीं, तर तीस तूं योग्यच नव्हेस. दुसऱ्यापासून तुला कांहीं मिळायाची आशा सरली म्हणजे तुझी ममता लागलीच उडते.

**चिंतो०**—तसल्या भिकारी पोरांनीं मला फार द्यायाचें होतें ! खरेंच !

**भागी०**—तर नुकते आठ दिवस झाले, गहिनापासून तूं मोतशिंपीची डबी कशास घेतली ? आणि शिवरामापासून कालच्या दिवशीं तूं मोठ्या युक्तीनें छुरी, कातर कशास काढिली ? शेंकडों वेळ तुला त्यांपासून खजूर, खारीक, खाऊ मिळाला असेल आणि आतां—

**चिंतो०**—आणि आतां—मी बाबाची आज्ञा ऐकणार. पण खरेंच गडे वाण्याचीं मुलें सोबतीस चांगलीं होतीं !

**भागी०**—समजलें बाबा, लांब कशाला ? आजच संध्याकाळ झाला नाहीं तों तुझें गांवच्या दुसऱ्या हैद्या मुलांशीं जुगलें म्हण.

**चिंतो०**—खरेंच, त्यांची मैत्री तुटली म्हणून त्यांत माझा काय तोटा व्हावयाचा होता ?

भागी०—त्यांत त्यांचा तरी काय तोटा व्हायाचा होता ?

चितो०—जा रे, मीं त्यांची परवा करीत नाहीं. पण हा शिवराम येतो आहेसें वाटतें. त्यास तूं सांग कीं, माझ्याजवळ येऊं नको.

भागी०—तूं त्याला भेटायास इच्छीत नसलास तर एथून जाईनास कां ?

चितो०—मी त्यास भेटूंही इच्छीत नाहीं; आणि मी एथून जाणारही नाहीं.

---

## प्रवेश ३.

### भागीरथी, चितोबा व शिवराम.

शिव०—( हातांत एक निळ्या रंगाचा झांकलेला पिंजरा घेऊन भागीरथीस ) आहा ! काय आनंद झाला आहे मला तुला पाहून !

चितो०—गड्या शिवरामा, त्या लहानग्या पिंजऱ्यांत काय रे आहे तें ?

शिव०—तें मला भिवजीनें काल नजर केलें.

चितो०—आणि तूं तें मला नजर करायास आणिलें आहेस वाटतें ?

भागी०—( एकीकडे ) भगल* भावार्थी !

शिव०—मीं तें भागीरथीसाठीं आणिलें आहे.

भागी०—मला ! नको नको, बाबा मला नको. तुला नजर केलें आहे तें मी घेणार नाहीं. पण तें आहे काय ?

चितो०—(धट्टाईनें) आण इकडे काय आहे तें मी पहातों. ( शिवरामाच्या हातांतून ओढितो, तो गच्च धरून ठेवितो.) एकादा ओंगळवाणा पक्षी असावा. आणखी काय?

शिव०—तुझ्यानें सांगवलें नाहीं. तूं जिंक भागीरथी. पण मी तुह्मांस भ्रांतींत ठेवीत नाहीं. ह्यांत चंडोल आहे. आहा!

---

*पोटांत लबाड व बाहेर भावार्थी.

काय खासा पक्षी! (तो पडदा उघडून तीस दाखवितो आणि पिंजरा तिच्या हातांत देतो.)

चिंतो०—(वाईट वाटून) इश्श रे! काय भेट आणिली आहे! त्याच्या अंगास खंडीभर तर घाण येत आहे!

भागी०—आहा! काय चांगला पक्षी! कसा सुंदर दिसतो!

शिव०—दुसरा मिळाला तर मी तुला देईन चिंतोबा. भागीरथी, तुझी त्याला संवई लागली ह्मणजे तो नानाप्रकारच्या चेष्टा करील आणि तुला हंसवील.

भागी०—ह्मणूनच मी तो तुजपासून घेणार नाहीं. (चंडोलास) अरे लबाडा, जा तूं आपल्या धन्याकडे. शिवरामा, हा तुझा तूं परत घे. (ती त्यास देऊं लागते, तो घेत नाहीं, मग ती पिंजरा तेथें एकीकडे ठेविते.)

चिंतो०—काय रे, तूं ऐकत नाहींस? नाहीं, तुला तो परत नेलाच पाहिजे.

शिव०—तो आतां माझा नव्हे, भागीरथी तूं माझा विसर पडूं देऊं नको, आणि तूं पडूं देणार नाहींस ही माझी खातरी आहे. (तो असें ह्मणून शेंपन्नास पावलें दूर जातो.)

चिंतो०—(भागीरथी) तूं त्याला हात तर लाव, मग पहा बाबा तुझी काय अवस्था करील ती!

भागी०—तूं मला एवढें भय दाखवितोस, तर मी तो घेणारच. बाबानें तूं चंडोल घेऊं नको अशी मला मनाई केली नाहीं. मला इतकीच खंत वाटते कीं, 'तूं अतःपर मजकडे येऊं नको' ह्या दुःखाच्या शब्दावांचून ह्या वेळेस ह्याच्याबद्दल शिवरामास द्यायास मजपाशीं कांहीं नाहीं.

चिंतो०—तर तें काम मला कां सांगेनास? मी त्याची आणि त्याच्या चंडोलाचीही *विदाई करतों.

भागी०—नको नको तूं तेवढा श्रम घेऊं. (ती शिवरामास मागें बोलाविते, व तो येतो; तेव्हां ती त्यास ह्मणते.) माझ्या

* पाठवणी करितों.

मित्रा, माझ्यानें ही तुझी नजर घेववत नाहीं. तुला कांहीं वर्तमान सांगायाचें आहे तें असें वाईट आहे कीं—

चितो॰—खरेंच खरेंच, शिवरामा, तूं जर अतःपर आमच्या वाडीच्या आसपास आलास किंवा आमच्या घराकडे पाहिलें तर—

शिव॰—काय? मला मनाई करायाला तुझ्याठायीं इतका निष्ठुरपणा आहे? मला वाटलें होतें कीं, तूं माझा जिवलग मित्र आहेस!

चितो॰—तर मी सांगतों कीं तुझी आमची गडी आजपासून तुटली. तुला ह्याचें वाईट वाटूं नये—

भागी॰—नाहीं रे शिवरामा, त्याला बोलतां येत नाहीं, ह्मणून तूं मनांत वांकडें आणूं नको. तुला ठाऊक असेलच कीं, तुझ्या बाबाचा व आमच्या बाबाचा कज्जा झाला आहे.

शिव॰—मला ठाऊक आहे; आणि मी त्यासाठीं मोठा चिंतेंत आहें; पण आपली मैत्री तुटावी इतक्या पल्लयास गोष्ट आली आहे असें मला वाटलें नव्हतें. त्यांतूनही चिंतोबाकडून इतका निष्ठुरपणा होईल हें माझ्या स्वप्नींही नव्हतें.

चितो॰—ताई, तूं ह्यास लावून देतेस कीं मी बाबाला जाऊन सांगूं?

शिव॰—भागीरथी, तुम्हांस मजकरितां कांहीं उपद्रव होईल असें असल्यास—

भागी॰—भिऊं नको माझ्या मित्रा, तूं अंमळ असलास तरी माझ्या बाबास वांकडें वाटणार नाहीं.

चितो॰—मी त्यास जाऊन सांगतों, मग कसें आहे तें समजेल. (तो बाहेर जातो, पण कांहीं वेळानें मागें येऊन न कळत पिंजऱ्याचा दरवाजा उघडून चंडोलास उडवितो.)

## प्रवेश ४.

### भागीरथी व शिवराम.

शिव०—देवाला स्मरून भागीरथी सांग बरें, मी तुझ्या भावाचा काय अन्याय केला आहे तो ?

भागी०—तूं चंडोल मला दिला तो एक त्याला जळ* आला आहे; दुसरें, त्याला वाटतें कीं, असें केलें म्हणजे मी बाबाचा आवडता होईन. आमच्या बाबास तुमच्या बाबाचा फार राग आला आहे; मला समजत नाहीं कां तो.

शिव०—मलाही समजलें नाहीं. माझा बाबा एकटा इकडून तिकडे फिरत होता तेव्हां त्यास मीं आपणाशीं इतकें बोलतांना ऐकलें कीं, "नारायणराव मशीं असें करील असें मला वाटलें नव्हतें." मग तो माझ्या आईकडे गेला; तेथें माझी बहीण होती, तिला काय तें समजलें असावें.

भागी०—तें कांहीं असो, पण ह्याचें कसें करावें ? माझ्या बाबानें आम्हांस तुमचें दर्शन घ्यायाची किंवा तुम्हांशीं बोलायाची मनाई केली आहे.

शिव०—काय ? तुझी माझी ही शेवटची भेट ? तुम्हीं आम्हांशीं अतःपर बोलूं नये ? हाय रे ! आतां तुला माझ्यानें कसें सोडवेल ! माझी ताई, जीस तुजवांचून क्षणभर सुखास पडत नाहीं, ती आतां कसें करील ? हाय रे भगवान, मग आमची गत कशी होईल ?

भागी०—अवसान सोडूं नको माझ्या जिवलगा गड्या; असें झालें आहे तरी आपल्या मैत्रीस धोका नाहीं. आपण एकमेकांस प्रत्यक्ष भेटलों नाहीं तरी एकमेकांची आठवण करायास आपल्यास कोणाच्यानें मना करवत नाहीं अशी कीं, तूं मला चंडोल दिला आहे, त्याला मी तुझ्या

* राग.

नांवानें क्षणक्षणा हांक मारीन. आहा! तो मला मग किती आवडेल!

**शिव०**—तूं मला हें सांगून किती आनंद देत आहेस! आतां मीं दुःख करावें असें मला वाटत नाहीं. ओहो! ठीक झालें, ही माझी ताई आली—मला ती खिन्न दिसते आहे.

---

## प्रवेश ८.

### भागीरथी, शिवराम, व गहिना.

**भागी०**—(गहिनेस भेटावयास धांवते) माझे गडे गहिने!

**गहि०**—माझे जिवलगे भागीरथीबाई! (चिंतू बापास घेऊन आला आहे; ते आड राहून हळूच ऐकताहेत.)

**शिव०**—(गहिनेस) तूं आतां एथें कांहीं वाईट वर्तमान ऐकशील ताई.

**गहि०**—मींही कांहीं बरें आणिलें नाहीं. आपला बाबा आणि आई अशीं चिंतेंत पडलीं आहेत कीं,—

**शिव०**—(भागीरथीस) पहा! मी तुला सांगत नव्हतों? (गहिनेस) बरें काय तें सांग.

**गहि०**—(भागीरथीस) तुमचा बाबा आमच्या बाबावर रागावला आहे; पण मला वाटतें कीं, तुमच्या बाबाचें मागणें अंमळ गैरवाजवी आहे.

**भागी०**—गैरवाजवी! असें होणार नाहीं. जर अशी गोष्ट आहे तर मी त्यास चार गोष्टी सांगून वळवीन. बरें, काय आहे तें मला सांग तर खरें!

**गहि०**—त्या डोंगरीजवळची आमची राई तुला ठाऊकच आहे.

**भागी०**—होय; चैत्र वैशाखांत आपण तिकडे कोकिळांचें गाणें ऐकायास जात असतों. काय रम्य जागा आहे ती!

गहि०—ती राई आमच्या बाबास विश्वासरावांनीं दिली आहे.

भागी०—बरें.

गहि०—ती तुझ्या बाबाच्या मनांत घ्यायाची आहे.

भागी०—काय ! माझ्या बाबाच्या मनांत घ्यायाची आहे ?

शिव०—काय ! आपली राई तो घेणार ?

गहि०—माझ्या बाबानें त्यास सांगितलें कीं, "तुमच्यापासून मजवर आणि माझ्या कुटुंबावर फार उपकार झाले आहेत, ते स्मरून मी ह्या गोष्टींत तुमचा संतोष करायास अनमान करितोंना; परंतु ज्यानें मला राई दिली आहे त्यानें प्राण जायच्या वेळेस माझें वचन घेतलें आहे कीं, मी ती विकूं नये. तिचा उपभोग घ्यावा, म्हणजे मला त्याचें स्मरण राहील."

भागी०—एरवीं माझा बाबा मला सर्व गोष्टींनीं पूज्य आहे; पण अशी गोष्ट जर आहे तर तो अन्याय करितो हें म्हणणें मला प्राप्त आहे. पण मला वाटतें कीं, तो फुकट मागत नसेल. तो असें कधीं मनांत आणणार देखील नाहीं.

गहि०—नाहीं नाहीं, तसें नाहीं. तो माझ्या बाबास किंमत देणार ती तीस शोभे त्याजपेक्षां अधिकही द्यावयास सिद्ध आहे.

शिव०—तो राई घेऊन काय करणार ? तोही कांहीं योजून मागत असेल.

गहि०—तो ती घेऊन त्यांतलीं सगळीं झाडें कापून टाकणार.

भागी०आणि शिव०— } कापून टाकणार ?

गहि०—राई तोडिली म्हणजे मैदान होईल आणि मागचा डोंगर चांगला दिसेल.

भागी०—होय रे होय ! आतां माझ्या लक्ष्यांत आलें. त्यानें परवां शहरांतून मेस्त्री बोलाविला होता. तो त्याशीं मो-

डतोडीच्या गोष्टी बोलत होता खरा. माझ्या बाबास असला छंद फार. त्याच्या हातीं एक नकाशा नेहमीं असतो. तो मशीं देखील दिवसांतून शंभर वेळां मोडतोडीच्या गोष्टी बोलत असतो, तें ऐकून मलाही बरें वाटतें; पण आतां मी तिकडे चित्त देणार नाहीं. तुझ्या बाबानें आपली राई कदापि देऊं नये, हें माझें मत आहे.

**शिव०**—सगळीं झाडें तोडून टाकल्यावर जे बिचारे पक्षी त्यांवर बसून सुंदर गायन करीत असतात, त्यांनीं कोठें जावें ? कोठीं कोठें करावीं ? आणि मग आपण दाणा तेथें कोणासाठीं घेऊन जावें ?

**गहि०**—मग उन्हाळ्यामध्यें आपण उष्म्यापासून थंड कोठें व्हावें ?

**भागी०**—आपण तेथें गातों तेव्हां डोंगराकडून प्रतिशब्द येतो तो मग कोण ऐकेल ?

**गहि०**—मला वाटतें कीं, पल्लवयुक्त झाडें डोंगरापेक्षां सुंदर दिसतात.

**भागी०**—असें असतां मैदान करून माझ्या बाबास काय नफा वाटतो तो कोण जाणें ! दुसरीं चोहोंकडे मैदानें आहेत तीं थोडीं आहेत ?

**शिव०**—झाडें तोडिलीं तर प्रत्येक कुऱ्हाडीच्या घायानें माझा कोणी हातपाय तोडून नेतो आहे असें मला होईल !

**भागी०**—नाहीं नाहीं. तुझ्या बाबाकडून ती राई कोणी घेऊं शकत नाहीं.

**गहि०**—कोणी शकत नाहीं ! पण आतां त्याच्यानें ती ठेववत नाहीं.

**भागी०**—कां ? माझ्या बाबाच्यानें, मला वाटतें कीं, त्यावर जुलूम करवणार नाहीं. इतकी सत्ता त्याच्या हातीं नाहीं.

**शिव०**—पण जर तो आम्हांशीं असाच राग धरील, आणि तुम्हीं आम्हांस भेटूं नये व आम्हांशीं बोलूं नये असें करील,

तर जळो रे मेली ती राई! तसल्या दहा राया द्यायाच्या प-
डल्या तरी मी देईन!

गहि०—आणि मलाही तसेंच वाटतें. भागीरथी, तुजवां-
चून मीं काय करावें बरें? तुला बरोबर घेतल्यावांचून त्या
राईंत जायाचें माझ्या मनांत देखील येणार नाहीं!

भागी०— गडे गहिने, आपण त्या राईंत काय काय मौजा
केल्या आहेत! संध्याकाळीं आपण तेथें गेलों म्हणजे स-
गळ्या दिवसाचें वर्तमान एकमेकांस सांगावें आणि सुखदुः-
खाच्या गोष्टी सांगाव्या.

गहि०—आणि तेथें आपण जाऊन कामही करावें; तूं शिक-
वावें, मीं कशिदा काढावा; शिवरामानें फुलें आणिलीं म्ह-
णजे काम मोडून आपण हार गुंफायास लागावें; माझे हार
मीं तुला द्यावे; तुझे तूं मला द्यावे. असे नानाप्रकार आ-
पण तेथें केले आहेत.

शिव०— हाय रे! आतां तें सगळें संपलें! तशा दिवसांची
आतां पुनः गोष्टच नको!

भागी०— खरेंच, तसे आनंदाचे दिवस कधीं यावयाचे ना-
हींत. पण तुमच्या वियोगानें मला दुखणें येईल; मग माझा
बाबा खंती घेईल; मग मी त्याला सांगेन कीं, मीं वांचावें
अशी तुझी इच्छा असली तर माझ्या मैत्रांना माझ्यापाशीं
येऊं दे—(तीं तिघें एकमेकांस आलिंगितात आणि डोळ्यां-
तून आसवें टाकितात.)

गहि०— पण तेथपर्यंत राई कापून जाईल.

भागी०— कां?

गहि०—हायहाय! मीं तुला सगळी कथा सांगितली नाहीं.
वर्षें दहा झालीं, तुझ्या बाबानें माझ्या बाबास उदीम करा-
यास रुपये पांचशें कर्ज दिले होते, ते अझून माझ्या बा-
बानें फेडिले नाहींत.

**भागी०**— (एकीकडे) माझा बाबा, पैसे देणें, पैसे देणें म्हणत होता ते हे.

**शिव०**—म्हणून, जर आम्ही राई दिली नाहीं, तर तुझा बाबा आम्हापासून रुपये पांचशें सव्याज ठोकून घेईल. ते आज आम्हांला कोणी देईल असें नाहीं. तुझ्या बाबाशिवाय आम्हांस दुसरा कोणी ओळखीत नाहीं; आणि तोच पैसे मागणार मग काय ?

**भागी०**—इतकेंच जर आहे, तर तें माझ्या हातीं आहे.

**गहि०**—तुझ्या हातीं आहे ! तें कसें ?

**शिव०**— काय, म्हणतेस काय भागीरथी !

**भागी०**— (आनंदयुक्त मुख करून) तुम्ही वचन द्याल, कीं कोणापाशीं सांगणार नाहीं ?

**गहि०**—तुझी गोष्ट आणि आम्ही फोडूं !

**शिव०**—तुझ्या मनांत आम्हांविषयीं संशय !

**भागी०**— बरें तर ऐका. पण त्या गोष्टीचें स्मरण झालें म्हणजे मला अजून उमड येतो. काय माझ्या आईची मजवर ममता होती ! आहाहा ! माझी आई शेवटीं दुखण्यांत पडली त्या वेळीं एके दिवशीं, खोलींत एकटी पाहून, तिनें मला पलंगाजवळ बोलाविलें आणि डोळ्यांत आसवें आणून माझा मुका घेतला आणि उशाखालून एक मोहरांची पिशवी काढून मजपाशीं दिली. देतेसमयीं ती बोलली, " माझे लाडके मुली, घे ही. कोणास सांगूं नको, हे पैसे तसेंच काम पडेल तेव्हां खरच. तुझें मन दयाळू आहे. तूं शहाणी आहेस, तूंच हे पैसे चांगल्या कारणीं खरचशील. तुझा बाप मनाचा थोर आहे, पण अंमळ हट्टी आणि डेंखी[1] आहे. आपला खटला मोठा आहे; त्यांत कितीएक गरीबगुरीब कुळांस कामांत तोटे आले आहेत, आणि त्यांस तुझा बाबा तर दमडी सोडीत नाहीं असें आढळेल, तेथें तूं त्या गरीबांस आंतून सहाय होऊन त्यांचें काम कर. तुजवर कोणी उपकार

[1] सूड घेणारा.

करील त्यासही तूं ह्यांतून देत जा; बापापाशीं मागूं नको. आज दोन वर्षें मी तुझ्याच हातून असलीं कामें घेतलीं आहेत. त्यावरून मी कोणत्या प्रकारच्या माणसांवर दया करीत होतें, तें तुझ्या लक्ष्यांत असेलच. सारांश, पैसे मी तुजपाशीं विश्वासानें ठेवतें; तूं भलें मनुष्य संकटांत पडलें आहे असें पाहून त्यास त्यांतून काढ. तूं बरें करशील तें मी समजेन कीं मींच केलें, आणि तुलाही माझें वारंवार स्मरण होईल." इतकें बोलली तों पुढें तिच्यानें बोलवेना; पण हें तिचें भाषण माझ्या हृदयांत लिहिलें आहे, तें मी कधींविसरणार नाहीं.

**गहि०**—(डोळे पुसते.) भागीरथी, तूं धन्य आहेस ! आणि तुझी आईही धन्य आहे !

**शिव०**—माझ्या बाबास आणि माझ्या आईस जेव्हां जेव्हां तिची आठवण होते, तेव्हां तेव्हां त्यांच्या डोळ्यांतून पाणी आल्याशिवाय रहात नाहीं.

**भागी०**—माझी आई पण तुमच्या आईबापांवर फार ममता ठेवीत असे. मरतेवेळेस तिनें मला सांगितलें कीं, विठ्ठल शेटीस तूं आपला मित्र म्हणून मान; आणि त्याचा उपदेश ऐकत जा. तुमचे उपकार मजवर पुष्कळ आहेत. तर ह्या गोष्टींत मी किती धन्य होईन तें पहा—एक तर माझ्या आईची इच्छा पुरवीन; दुसरें, तुमच्या बाबाची उतराई होईन; माझ्या बाबास अन्यायकर्मापासून संरक्षीन; त्यास मागून पश्चात्ताप होईल तो होऊं देणार नाहीं; सगळ्यांचा बचाव होईल; आपली सुंदर राई कापली जाणार नाहीं; तुमची आमची मैत्री राहील; व पुनः आपण एकमेकांस भेटूं, बोलूं आणि पूर्ववत आनंद करूं.

**गहि०**—( तिच्या गळ्यांत हात घालिते. ) अगे माझे गडे भागीरथी !

**शिव०**—( तिचा हात धरून ) माझा बाबा तुला मनापासून आशीर्वाद देईल; पण तुझे पैसे घेणार नाहीं.

**भागी०**—कां ? मी त्याच्या पुढें विनंती करीन. तुम्ही त्या विषयीं निर्भय असा; ह्यांतलें कोणास कांहीं समजणार नाहीं. थांबा एथें अंमळ, मी हीच पैसे घेऊन आलें.

**शिव०**—मी ते आपल्यापाशीं घेणार नाहीं.

**भागी०**—गहिने, तूं तरी तेवढे घे; आणि शिवरामा, जर तूं तिला मनाई करशील तर संभाळ; मी तुझा चंडोल घेणार नाहीं. मग मी आपल्या बाबाची आज्ञा कडकडीत मानीन; तुम्हांकडे फिरून पाहणार नाहीं. नंतर कधीं मी तुमच्या घरीं येणार नाहीं, कीं तुमच्या राईंत येणार नाहीं.

**गहि०**—तूं असें म्हणतेस पण मग—

**भागी०**—( ताडाशीं बोट नेऊन तिला दाविते. चूप. तुला बोलायास समजत नाहीं. मी तुझें अगदीं ऐकणार नाहीं. थांब एथें अंमळ मी येई तों. मला सवड फावली तर तुमच्या बाबास मी दोन ओळीही लिहीन. माझ्यानें लवकर येववलें नाहीं, तर मी पिशवी आणून ह्या बंगल्याच्या कोंपऱ्यास ठेवीन; त्या धोंड्याखालीं. त्या जागेची खूण आतांच चांगली धरून ठेव; ऐकतेस ?

**गहि०**—माझी खातरी आहे, माझा बाबा तुझे पैसे देऊन मला परत पाठवील.

**भागी०**—त्याचा त्यानें दूरवर विचार करावा. तसें केलें असतां मग मी तुम्हांस भेटायास कोठची ? मग तुमची माझी ही शेवटची भेट. ह्यापुढें तुम्हांशीं बोलायास मला बाबाची आज्ञा नाहीं. त्यास रुपये न पोहोंचले असतां असें दैवों आलेंच !

**गहि०**—काय कठोर शब्द काढतेस हे !

**भागी०**—मला बाबाची आज्ञा मान्य करणें प्राप्त आहे. पण

आपण शेजारी आहों त्या अर्थीं एकमेकांकडे पहायास कांहीं चिंता नाहीं. लोकांची दृष्टि चुकवून समयीं—

गहि०—मी तर आपले डोळे तुझ्या डोळ्यांकडे लावून ठेवीन; आणि त्यांना सांगेन कीं, तुम्ही मला मनापासून आवडतां. मी तुम्हांस मरेपर्यंत विसरणार नाहीं.

शिव०—तूं फिरायास बाहेर पडशील तेव्हां आम्हीं रस्त्यावर उभे राहून तुजकडे पाहिलें तर आम्हांस मना कोण करणार आहे ? आणि मग—

भागी०—तूं खरें म्हणालास—मग एकाद्या वेळीं हंसलों किंवा एकाद्या वेळीं वांकड्या दृष्टीनें पाहिलें तर तें कोणाच्या लक्ष्यांत येणार नाहीं; तर धीर सोडूं नका. कांहीं चिंता नाहीं, सर्व नीट चालेल. पण आपला चंडोल कोठें आहे तो ? मी आपल्या खोलींत जातें, मीं त्याला घेऊन जाईन.

शिव०—थांब अंमळ. मी त्याचा पिंजरा आणितों, आणि तुझ्या खोलीच्या दरवाज्यापर्यंत घेऊन येतों. (तो पिंजरा ठेविला होता तिकडे जातो.)

भागी०—येतें गहिना.

गहि०—हें येणें अक्षयीं नसावें.

शिव०—(भयभीत होऊन पिंजरा रिकामा घेऊन येतो.) आतां काय करूं ! चंडोल आंत नाहीं.

भागी०—काय ! माझा चंडोल गेला ? माझ्या जिवलगा शिवरामा !

शिव०—कोणीं त्याचें दार उघडून त्यास घालविलें. मला पुरती आठवण आहे कीं मीं दार लावलें होतें.

भागी०—हें माझ्या भावावांचून दुसऱ्याचें काम नाहीं. तूं तो मला दिला तेव्हांपासून त्यास वाईट वाटलें होतें, आणि आपण एथें बोलत असतां आपली दृष्टि चुकवून त्यानें हें कृत्य केलें.

शिव०—त्यानें अंमळ खेळायास नेला असेल तरी बरें !

**भागी०**—मी त्यास तुझ्यापेक्षां चांगलें ओळखितें. त्यानें तो उडविलाच असावा.

**शिव०**—बरें तर थांब, तो इतक्यांत लांब गेला नसेल. जर कोठें झाडावर असला तर त्यास दाणा दाखविला म्हणजे लागलाच खालीं येईल. मी सगळें रान त्यासाठीं फिरेन.

**भागी०**—(शिवरामास) तुला यश येऊ माझ्या मित्रा. (गहिनेस) बिचारा शिवराम! मला त्याची काकळूत येते! त्यानें काय हौसेनें मला तो दिला होता!

**गहि०**—खरेंच, तुला तो देईपर्यंत त्यास चैन पडलें नाहीं.

**भागी०**—बरें तर मी जातें गहिना. मी अशी मागच्या वाटेनें जातें आणि तूं तशी वईकडून हळूच माझ्या खिडकीखालीं ये; म्हणजे मी वरून पिशवी आणि पत्र टाकीन. माझा बाबा मध्यें कोठें नसला तर मी तुला तें स्वतः खालीं येऊन देईन.

**गहि०**—आहागे माझे मैत्रिणी! काय दयाळूपणा, काय उदारपणा हा! तुझी उतराई आम्ही कशीं होऊं! (तीं दोघें दोहों वाटांनीं जातात.)

---

## प्रवेश ६.

### नारायणराव आणि चिंतोबा.

**चिंतो०**—कां बाबा, मीं खोटें सांगितलें ? तूं पाहिलेंना? तुझ्या आज्ञेप्रमाणें चालायास ताईस काय अवघड पडलें आहे तें.

**नारा०**—बरें ही चंडोलाची गोष्ट काय रे आहे?

**चिंतो०**—आपण लपून होतों म्हणून मीं तुला सांगितलें नाहीं; कां कीं तीं ऐकतील. ती गोष्ट अशी आहे कीं, जिवलग मित्र शिवरामभाऊ, ह्यांनीं जिवलग मैत्रीण भागीरथीबाई ह्यांस चंडोल भेट केला; जिवलग मैत्रीण भागी-

रथीबाई तें हिडसें पांखरूं घेऊन अशा खुशालल्या कीं, त्यांनीं त्यास आपले जिवलग मित्र शिवरामभाऊ ह्यांचें नांव ठेविलें. पण मीं असें केलें आहे कीं, तिचें त्या पक्ष्याशीं अतःपर खेळणें होऊंच नये !

नारा०—तें कसें ?

चिंतो०—त्यांनीं चंडोलाचा पिंजरा त्या तिकडे ठेविला होता. तेथें मीं नकळत जाऊन, दार उघडून परतें त्यास उडविलें. तो उडतांच झाडाच्या खांदीवर जाऊन बसला; नंतर तो ह्या डाहळीवरून त्या डाहळीवर, त्या डाहळीवरून त्या डाहळीवर, असा उडत होता. तीं आतां त्यास जर धरतील तर मी त्यांस पक्कीं म्हणून समजेन; पण तें काय होतें ?

नारा०— तर तूं हें मोठें लबाडीचें काम केलें. विठ्ठलशेटीच्या मुलांस दुखवूं नको म्हणून तुला माझी आज्ञा होती, नव्हे ? ह्या गोष्टींत तुझ्या बहिणीसही किती दुःख झालें असेल बरें ?

चिंतो०— तिनें तुझी आज्ञा मोडिली त्याचें तिला पारिपत्य नको ?

नारा०—तिचें पारिपत्य करायाचा तुजकडे अधिकार नाहीं. धांव लवकर, माळ्याला किंवा दुसऱ्या कोणा माणसांना जाऊन सांग कीं, चंडोल धरा, आणि तसाच मजपाशीं आणा.

चिंतो०—पण बाबा, तूं ताईस मनाई केली होती कीं, विठ्ठलशेटीच्या मुलांशीं अगदीं बोलूंचालूं नये; असें असतां त्यांनीं भेट केली, ती तूं तिला घेऊं देशील ?

नारा०— शिवरामानें चंडोल आणिला त्या वेळेस त्याला माझी आज्ञा ठाऊक होती ?

चिंतो०— त्याला नाहीं, पण ताईस तर ठाऊक होती; असें असतां तिनें तुझी अवज्ञा कशी करावी ?

नारा०—त्याचा विचार मीं केला असता; तुला गरज न-

व्हती. तिनें मला तो चंडोल दाखविला असता; आणि मला तसेंच दिसतें तर मीं तो परत करविला असता. म्हणून मी तुला आणखी एकदा सांगतों कीं, धांव लवकर, आणि चंडोल सांपडे असें कर; नाहीं तर तुला काय आहे तें कळेल.

**चिंतो०**—पण बाबा, ती बोलली तें तूं स्पष्ट ऐकिलेंना? तिजपाशीं तुला नकळून असे कांहीं पैसे आहेत; आणि ती ते विठ्ठलशेटीस तुझें देणें वारायाकरितां देणार; हो रे हो! भली गोष्ट सुचली! बाबा, मी गहिनेच्या वाटेवर टपत बसतों, आणि ती पैसे नेत असतां तिला पकडून तुझ्याजवळ आणितों.

**नारा०**—करून तर पहा तसें! मीं तुला आतां काय सांगितलें त्याप्रमाणें करतोस कीं नाहीं?

**चिंतो०**—(कुरकुरतो.) मी तीस पकडतों तर भली मौज होती!

(तो बाहेर जातो.)

---

## प्रवेश ७.

**नारायणराव** (आपणाशीं विचार करितो).

पहा मी जाणता असून इतका घसरलों; आणि हीं मुलें होऊन, ह्यांनीं इतकी मैत्री, कृतज्ञता, आणि उदारपणा दाखविला! मीं भागीरथीस मना केलें होतें खरें; पण मीं तें नीट केलें काय? जे सद्गुण मीं तिला शिकविले तेच मी तिच्या ठायीं निंदूं काय? ह्या संसारारण्यांत जें एकच सुख, जें मनुष्याची एकच विश्रांति, अशी जी गुणी आणि समवयी मित्रांची संगति, तिचें सुख, मी तिजपासून कसें हिरावून घेऊं? ज्याची हानि माझी सगळी संपत्ती खर्च झाली असतां भरून येणार नाहीं; तें इतकें मी कां करितों असें पाहिलें असतां माझ्या मनामध्यें गोष्ट भरली ती झाली पाहिजे, इतकेंच ह्याचें

कारण. माझे लाडके मुली, माझे सगळे बाग, सगळे बंगले व दुसरे मजजवळ चांगले चांगले पदार्थ जे आहेत तितके सर्वही तुला प्राप्त झाले असते, तरी ते ज्या राईत तुला तुझ्या मित्रांची गांठ पडून आनंद होतो त्या राईची आठवण विसरवितेना! आहा! भली मला ही शिक्षा लागली! तूं नसतीस तर आज मलाही विठ्ठलशेटीसारिखा अमोलिक इष्ट अंतरता; तें सुख तूं माझें राखिलें. तूं मला अन्यायकर्मापासून आणि पश्चात्तापापासून राखलें. तुझें उदार चरित्र पाहून तुझ्या भावाचा नीचपणा माझ्या हृदयास फार व्यथा करितो. द्वाड पोरगा! किती नीचपणा तुझ्या ठायीं आहे रे हा! असो, आतां मला पाहिलें पाहिजे कीं, विठ्ठलशेट आपल्या मुलांप्रमाणें मनाचा थोर आहे कीं नाहीं. ह्या प्रसंगीं तो वर्तेल त्यावर माझ्या पुढील मित्रसुखाची आशा आहे—एक तर आज असें होईल कीं, मी अयोग्य मित्रापासून सुटेन; अथवा मला योग्य मित्राचा लाभ होईल. (तिकडून भागीरथी हळूच चालली आहे तिला पाहून तो बोलावितो.) भागीरथी? (ती ऐकिलें न ऐकिलें करून तशीच जाते आहे, तिला तो दुसऱ्यानें बोलावितो.) भागीरथी, इकडे ये.

---

## प्रवेश ८.

### नारायणराव आणि भागीरथी.

**नारा०**—तूं कोठें चालली होतीस? तूं मला चुकवीत कां होतीस?

**भागी०**—(अंमळ गोंधळून) ह्यासाठीं—कीं तुला उपद्रव करूं नये.

**नारा०**—मला वाटतें कीं, तुला शिवरामानें चंडोल भेट दिला होता, त्याच्या शोधास जाते आहेस.

**भागी०**—होय, बाबा त्यानें मला एक दिला खरा. मला वाटतें चिंतूनें तुला सांगितलें असावें?

नारा०—मग, तूं तो घेतला नसशील ?

भागी०—हो, घेतला तो आतां नाहीं कसा म्हणूं ? भला बिचारा शिवराम ! त्याला तो मला देतांना किती आनंद झाला !

नारा०—तो तुला परत दिला पाहिजे.

भागी०—होय बाबा, मजकडे असता तर; पण तो पळाला.

नारा०—हें खरें. ?

भागी०—होय बाबा, मी खरेंच सांगतें. पाहिजे असेल तर मी तुला त्याचा रिकामा पिंजरा दाखवितें.

नारा०—त्याला बाहेर कोणीं सोडिलें असेल बरें ? हें चिंतूचें कृत्य असावें.

भागी०—नाहीं बाबा, तूं भाऊला असें ह्मणूं नको. पिंजऱ्याचें दार चांगलें लागलें नसेल, म्हणून तो पळाला. शिवराम त्याच्या शोधास गेला आहे. त्यास सांपडला असतां तो मजकडे आणील.

नारा०—एकूण तूं त्याशीं दुसऱ्यानें बोलणार ? बरें, तूं त्यास काय म्हणशील ? तूं त्यास माझी आज्ञा अजून सांगितली आहे कीं नाहीं ? आणि त्यापासून शेवटला निरोप घेतला कीं नाहीं ?

भागी०—नाहीं बाबा, तें मला मोठें अवघड पडलें आहे. तसें एक वेळ झालें म्हणजे मग मला काळ कंठणें फार कठीण आहे—

नारा०—माझी आज्ञा मानायास तुला मोठी अडचण पडते तर ?

भागी०—म्हणून नव्हे; असें तूं मनांत आणूं नको बाबा; पण मीं अशी निष्ठुरता केली असतां मला वाटतें कीं, तूं मजवर ममता करणार नाहींस; तूं मला आपलें लेंकरूं म्हणणार नाहींस. पहा बरें, मला कांहीं खेद झाल्यावांचून मीं अकस्मात त्यांची गडी तोडिली, तर तूंच मला आ-

पल्या मनांत काय म्हणशील ? माझे मित्र मला काय म्हणतील ?

नारा०—पण त्यांच्या बापानें माझा अन्याय केला असला तर तुझ्यानें थंड राहवेल ? तुला माझा अभिमान पडणार नाहीं ?

भागी०—असें कसें होईल ? मला अभिमान पडेल; आणि तुझें समाधान होण्याबद्दल मी सर्वस्व देईन.

नारा०—मी त्यापाशीं काय मागतों, आणि तो मला काय देत नाहीं, तें तूं जाणतेस ?

भागी०—मी जाणतें; होय, मी जाणतें. हें बाबा तूं मला कां पुसतोस ?

नारा०—ह्यासाठीं, कीं मला समजलें पाहिजे कीं, विठ्ठलशेटीच्या मुलांस तें ठाऊक आहे कीं, नाहीं; आणि त्यांनीं तें तुला सांगितलें आहे कीं नाहीं.

भागी०—होय, त्यांनीं मला सांगितलें; त्यांनीं सगळें मला सांगितलें. तुला राग नको येऊं देऊं बाबा.

नारा०—बरें तुला कसें वाटतें ? मी कांहीं गैरवाजवी चाललों काय ? विठ्ठलशेटीवर माझे इतके उपकार असतां त्यानें माझी लहानशी गोष्ट ऐकूं नये ? आणि जें मी मागतों, त्याचें मजपासून त्यास शतगुणित मोल प्राप्त होणार, असें असतां.

भागी०—बाबा मी लहान मूल, तुमच्या मोठ्यांच्या खटल्यांत मला काय समजेल ?

नारा०—तूं आपल्या मनांत विचार कर, आणि तुझें मन काय म्हणतें तें मला सांग.

भागी०—बाबा मला क्षमा असावी. माझें मन कांहीं एकादी अशी गोष्ट सांगेल कीं, ती तुला आवडणार नाहीं.

नारा०—मी समजलों. मी अन्याय करितों असें तें म्हणेल, ह्यांत भ्रांत नाहीं.

भागी०—मला वाटतें कीं, तुला आतां राग येईल.

**नारा०**—नाहीं, भिऊं नको, बोल, तूं.

**भागी०**—कांहीं होऊ, तुला वाईट वाटे असें मी कधीं बोलणार नाहीं.

**नारा०**—त्याची कांहीं चिंता नाहीं, तुला काय दिसतें तें साफ बोल, माझी आज्ञा आहे.

**भागी०**—बरें तर, मला वाटतें कीं, तुझा अन्याय नाहीं आणि विठ्ठलशेटीचाही नाहीं.

**नारा०**—अगे खुशामते पोरी! आम्ही दोघेही खरे, असें कसें होईल? आम्हांतून एक खरा आणि एक खोटा असलाच पाहिजे.

**भागी०**—बाबा मला क्षमा कर. मला दिसतें तसें मी बोलतें. तुझे विठ्ठलशेटीवर फार उपकार, म्हणून तूं मागतोस तें त्यानें द्यावें, हें खरें; आणि विठ्ठलशेटीस न देण्याचें कारण आहे म्हणून तो म्हणतो तेंही खरें.

**नारा०**—तें कसेंही असो, पण तो म्हणतो तें तुला नीट दिसतेंना?

**भागी०**—तें मी काय सांगूं? मला वाटतें कीं, त्यानें तुझे उपकार जाणून आपली राई तुला द्यावी हा त्याचा धर्म होय; तसेंच, ज्यानें त्यास ती राई दिली, त्याचा करार जाणून, तुला ती देऊं नये, हाही त्याचा धर्म होय. मैदान करावें म्हणून तूं ती कापणार; आणि आपल्या मुलांस विश्रांतिस्थलासाठीं तो ती राखणार. तूं गांवचा धनी, तुझ्या हातांत सत्ता आहे, म्हणून तुला ती कापतां येईल; तुझी प्रार्थना करून तुजकडे मुलेंमाणसें घेऊन येऊन रडून तो ती राखूंही शकेल; अशी गोष्ट आहे.

**नारा०**—पुरे आतां, तुझी बुद्धि ऐकेल तो फसेल. बरें तर आतां त्यानें माझे पांचशें रुपये द्यावे, आणि आपली राई ठेवावी.

**भागी०**—तर हा तुजकडून बलात्कार त्याजवर—

नारा०—त्यांत मग समजेल खरा कोण आणि खोटा कोण तो, आं—

भागी०—नाहीं बाबा रागें भरूं नको, मला तसें वाटलें मात्र; काय म्हणावें तें सुचेना म्हणून आलें तोंडास तें बोललें. पण बाबा, पांचशें रुपये त्यानें आज कोठून आणावे ?

नारा०—कोठून आणावे, हें जर तुला ठाऊक नाहीं, तर मलाही ठाऊक नाहीं. पण जर तो तुजपाशीं मागूं लागला तर मग ?

भागी०—( बापास वेंग मारते. ) बाबा, मी आतां तें तुजपासून कसें लपवूं ? तूं मला मारलें तरी पुरवलें, आणि तें मला साजेल; मीं तसेंच केलें आहे—

नारा०—सोड, सोड मुली, मला जाऊं दे ! पण हें काय तें मी समजलों नाहीं ?

---

## प्रवेश ९.

### नारायणराव, भागीरथी, चिंतोबा व गहिना.

चिंतोबा—( गहिनेस ओढीत आणितो आहे. ) बाबा ही भली सांपडली ! इजपाशीं लाखोटा आहे. मला वाटतें कीं तो भागीरथीच्या नांवाचा असावा. चल गे काढ तो लवकर, नाहीं तर मी तुझ्या सर्वांगाचा झाडा घेईन. बाबा ही वईकडून पळत होती तेव्हां इच्या हातांत मीं तो प्रत्यक्ष पाहिला.

नारा०—चिंतू, दांडगाई करूं नको. ( गहिनेस ) मुली, तुला एथें कोणाशीं काम आहे ?

गहि०—( गोंधळून ) नाहीं—होय, मी—हीस पहात होतें.

नारा०—तूं भिऊं नको मुली. तूं कोणास पहात होतीस?

गहि०—भा-गी-रथीस—

**चिंतो०**—पण गहिने, आम्हीं तुम्हाशीं बोलूं नये म्हणून बाबानें मनाई केली आहे तें तुला ठाऊक आहेना ?

**नारा०**—( चिंतूस ) अरे उगा ऐस. ( गहिनेस ) मुली, ह्या लाखोट्याची गोष्ट काय आहे ती मला सांग.

**गहि०**—तें कांहीं नाहीं. ( चिंतायुक्त मुद्रेनें भागीरथीकडे पहाते. )

**भागी०**—माझे गडे, आपणांस आतां बाबापासून कांहीं लपवायाचें नाहीं.

**चिंतो०**—( नारायणरावास ) पहा बाबा, त्या तुझ्यासमक्ष एकीमेकींशीं कशा निर्भीडपणें बोलताहेत ! हें तुझ्या आज्ञेचें उल्लंघन नव्हे काय ?

**नारा०**—तूं उगाच रहा; गहिना, काय तें मला कळविशील?

**गहि०**—बरें तर; तुम्हांस कळवायाचेंच त्या अर्थी ऐकावें. माझ्या बाबानें भागीरथीस लाखोटा दिला आहे. भागीरथीच्या हातांत लाखोटा देऊं लागली तों चिंतूनें तो तिच्या हातून ओढिला.

**चिंतो०**—पाहिलें बाबा ! ह्यांत पैसे भरले आहेत; (भागीरथीस) थांब पोरी, आतां बाबा तुझी चांगली पूजा करील !

( तो लाखोटा बापाच्या स्वाधीन करितो )

**नारायणराव.**

( लाखोटा उघडतो आणि वाचतो. )

"परम थोर मुली, तूं आपल्या बापाच्या नकळत मला पैसे
" पाठवून दिले, ते मीं घेऊन तुझ्या बापास भरावे; आणि कदा-
" चित गोष्ट उघडी झाली असतां, तुला ठपक्यांत आणावें, हें
" मला योग्य नाहीं. असें माझ्या हातून घडलें असतां तूंच आ-
" पल्या मनांत मला काय म्हणशील ? तर मी तसें करणार नाहीं.
" जोंपर्यंत मी कर्ज आपल्या स्वकष्टार्जित द्रव्यानें फेडीन तोंप-
" र्यंत मी कर्जकरी आहें तसाच राहीन. तुझ्या बापाच्या मर्जी-
" प्रमाणें माझ्या हातून होत नाहीं म्हणून मला वाईट वाटतें,

" पण काय करूं ? माझा उपाय नाहीं. नारायणरावांनीं सत्तेच्या
" बळानें इच्छेस येईल तें मला नकळत केलें असतें तर मीं कोठें
" बोलायास आलों होतों ? तसें झालें असतें तर मला माझ्या
" मनांत इतकें आणायास तर जागा होती कीं, मीं माझ्या मि-
" त्रांशीं बोली केली होती ती मीं मोडिली नाहीं. मला ह्या
" लोकीं तुमच्या बापाची व तुमची मैत्री अमोल आहे. तूं ज-
" शी मजशीं आणि माझ्या मुलांशीं आजपर्यंत एकनिष्ठ भावा-
" नें चाललीस तसेंच पुढें चालावें ही माझी प्रार्थना आहे."

(नारायणराव भागीरथीकडे पहातो.)

**भागी**०—(त्याकडे जाते.) आतां बाबा, हे पैसे मजपाशीं कसे आले तें मी तुला सांगतें. आजपर्यंत सांगितलें नाहीं त्याची मला क्षमा कर.

**नारा**०—(तिचा मुका घेतो.) तें मला ठाऊक आहे मुली; तुमचें भाषण होत होतें तें मीं आडून सर्व ऐकिलें. तुमचा थोरपणा पाहून मला परम आनंद झाला. मी लाज सोडून ह्मणतों कीं, तूं नसतीस तर मीं आज असें अकर्म केलें होतें कीं, तें माझ्या मनास जन्मवर खातें आणि मी सुखास अंतरलों होतों. हे तूं आपले पैसे घे; आणि तुझ्या आईनें जसें सांगितलें आहे तसें ह्यांचें सार्थक कर. हे धर्माकरितां वेंचतील ह्मणून भिऊं नको. माझ्या लेंकरांनो, तुमची आवडती राई अक्षय राहो, आणि तुमची मैत्री उत्तरोत्तर वाढून दृढ होऊ.

**भागी**०—(त्याचा एक हात धरिते.) बाबा, आज तूं मला नवा जन्म दिला असें वाटतें !

**गहि**०—(त्याचा दुसरा हात धरिते.) रावसाहेब, काय भले-पणा हा ! माझा बाबा—(तिचा कंठ दाटतो, बोलवत नाहीं.)

**नारा**०—(गहिनेस) गुणाचे मुली, आपल्या बापास हें पत्र परत दे, आणि सांग कीं, ह्यांत कांहीं आणखीं लिहावयाचें आहे, तें माझी भेट झाली ह्मणजे बोलेन.

चिंतो०—हें काय बाबा! तूं आणि—

नारा०—चूप बोलूं नको, आटोप तुझी ती द्वाड जीभ. आजच्या दिवशीं तूं मला आपल्या दुष्टपणाची पूर्ण ओळख दिली!

चिंतो०—कशी? मी तर तुझी आज्ञा पाळिली. मुलांनीं आपल्या आईबापांची आज्ञा पाळूं नये, तर ह्याप्रमाणें—

नारा०—त्यांनीं पाळावी. पण आईबाप जर अन्याय करूं सांगतील, तर मुलांनीं आपणांस उचित आणि ज्यांत ईश्वर राजी तेंच करावें. मीं स्वार्थपर होऊन अन्याय केला हें तुझ्या अंतरीं जर समजलें नाहीं, तर मला तुझ्या सद्गुणांची पुढें आशा दिसत नाहीं. पहा भागीरथी कशी चालली ती!

चिंतो०—पण बयेनें मजपाशीं तसे पैसे दिले नव्हते.

नारा०—त्याचें कारण असें कीं, तिनें तुझी पूर्वीच परीक्षा केली होती. पैसे नाहींत तर गोड शब्द नव्हते काय? जेणेंकरून तूं आपल्या मित्राचें, आणि ज्यानें तुला प्रथम विद्याभ्यास करविला त्या गुरूचें, समाधान केलें असतें? पण चंडोलाचें काय झालें? तूं त्याचा शोध करविला कीं नाहीं?

चिंतो०—बागांत मला कोणी भेटलें नाहीं.

---

## प्रवेश १०.

### नारायणराव, चिंतोबा, भागीरथी, गहिना, आणि शिवराम.

(शिवराम धांवत आल्यामुळें श्वासोच्छ्वास टाकितो आहे, एका हातांत त्यानें चंडोल धरिला आहे; त्याच्या दुसऱ्या हाताचें रक्त निघालें आहे, ह्मणून त्यानें तो हात धोतरानें गुंडाळिला आहे.)

शिव०—भागीरथी! भागीरथी! ये लवकर, भली झाली गड्या! हा बघ तुझा चंडोल आणिला! अरे लबाडा, पळाला होतास ना?

(नारायणरावास पाहून तो अंमळ अडखळतो.)

**भागी०**—(त्याजकडे धांव घेते.) माझ्या गड्या शिवरामा, (त्याच्या हातून चंडोल घेते आणि म्हणते.) अरे ठका, सांपडलासना? आतां तुला मजपासून जातां येणार नाहीं जा आतां आपल्या पिंजऱ्यांत. (ती त्यास आंत घालून दार लाविते.)

**नारा०**—माझ्या प्रियकरा शिवरामा, तुझ्या हातास तें काय झालें आहे? तुझ्या धोतरास तें रक्त कसचें लागलें आहे?

**शिव०**—(आश्चर्यानें आणि आनंदानें) माझ्या प्रियकरा शि-वरामा! भागीरथी, ऐकतेसना?

**भागी०**—होय शिवरामा, सर्व गोष्टी सोईच्या झाल्या आहेत.

**गहि०**—आतां आपल्या मैत्रींत बिघाड नाहीं. (शिवराम आनंदानें नाचतो व नारायणरावास मोठ्या विनयानें नमतो; गहिना त्याचा हात धरून कष्टी होते.) तुला फार दुःख झालें भाऊ! मला हात तरी पाहूं दे!

**भागी०**—अरेरे! मजकरितां तूं इतकें दुःख पावलासना?

**शिव०**—अः, तें कांहीं नाहीं. चंडोलामागें झाडावरून धां-वतांना हातास अंमळ लागलें आहे. माझा हात मोडून पडला असता तरी मी चंडोलास घेतल्याशिवाय तुजपाशीं येतोंना.

**भागी०**—आहा! माझ्या ठिकाणीं ह्याची काय ममता आहे! बाबा, आतां लवकर याला कांहीं उपाय केला पाहिजे. सखाऊपाशीं चांगलें औषध आहे.

**नारा०**—तिला सांगून तो उपाय आधीं करीव. आतां चला मजबरोबर. मुलांनो, आजचा आनंदाचा दिवस आहे; तुम्हांस मीं मेजवानी केली आहे. तुमच्या आईबापांसही बोलाविलें आहे. आज तुम्हीं मला गुरु झालां आणि तुमचें चरित्र पा-

हून मला वाटलें कीं, तुम्हांसारिख्या गुणी मुलांपासून आईबापांनींही शिक्षा घेणें योग्य आहे!

(सर्व निघून जातात.)

---

## २०. कुळंबिणीनें ठकविलेली मुलगी.

### बाळाबाई, तिचा नवरा, दुर्गा, आणि नानी.

**दुर्गा**—बये, आज सांजची मी हरीकडे जाऊन येऊं?

**बाळा०**—नाहीं. मी जावयास सांगणार नाहीं.

**दुर्गा**—कां बये, असें कां बरें म्हणतेस?

**बाळा०**—तुला त्यांतलें कारण सांगायाचें मला प्रयोजन नाहीं; मुलांनीं वडील सांगतील तें निमूटपणें ऐकावें; त्यांस उलटा प्रश्न करूं नये. असो तुला समजावें कीं, मी जें सांगतें तें कांहीं चांगलें कारण असतें म्हणून. पण ह्या वेळेस तुला त्याचें कारण ऐकवितें इतकेंच कीं, हरी मुलगा चांगल्या गुणांचा नाहीं; तो तुला एकादी वाईट गोष्ट करूं सांगेल, आणि जर तूं त्याकडे नित्य गेलीस, तर तुला त्याचे दुर्गुण लागतील.

**दुर्गा**—पण बये—

**बाळा०**—उत्तर ऐकायाचें नाहीं; मी सांगेन तसें चाललें पाहिजे. (तें ऐकून दुर्गाच्या डोळ्यांत आसवें आलीं; तीं आईस कळूं नयेत म्हणून ती अंमळ एकीकडे गेली; मग आई बाहेर गेल्यानंतर ती एका कोपऱ्यांत बसून पुष्कळ रडते आहे, इतक्यांत नानी कुळंबीण नुकतीच बाळाबाईकडे चाकरीस राहिली होती ती घरांत आली.)

**नानी**—दुर्गा, तूं कां रडतेस? तुला काय झालें? तुला काय दुःख झालें आहे तें मला सांगशील?

**दुर्गा**—नानी, तूं एथून जा. तुझ्यानें माझें दुःख दूर करवणार नाहीं.

**नानी**—नाहीं! कां नाहीं? मी मागें चाकरीस होतें तेथें भागू

होती; तिला दुःख होई, तेव्हां ती मजकडे येई. आणि म्हणे, "माझे गडे नानी, पहा मला काय संकट पडलें आहे! आतां मी कोणता उपाय करूं?" ती असें मला विचारी आणि मी तिला बरी बुद्धि देत असें—

**दुर्गा**— मला तुझी बुद्धि नको; मी तुला सांगतें, मजविषयीं तुझ्यानें कांहीं व्हायाचें नाहीं.

**नानी**— मला इतकी तरी आज्ञा दे कीं, मी तुझ्या आईकडे जावें! ती तरी तुझें दुःख दूर करील; कांकीं तुझ्यासारखी चांगली मुलगी कष्टी पाहून मला बरें वाटत नाहीं!

**दुर्गा**— आहा! बये ना? खरेंच; तीच तर माझ्या दुःखास कारण आहे!

**नानी**— तर तुला काय बयेपासून दुःख झालें? मी असें कधीं मानणार नाहीं!

**दुर्गा**— तर कोणापासून झालें तें तुला ठाऊक आहे?

**नानी**— ठाऊक नाहीं. पण बयेपासून दुःख झालें असेल असें मला वाटत नाहीं.

**दुर्गा**— तर तुला सांगतें. तीच माझ्या दुःखास कारण आहे.

**नानी**— खरेंच का? हें मला अगोदर खरें वाटलें नाहीं. तूं शहाणी मुलगी आहेस, म्हणून तुझें म्हटलेलें बये सदा ऐकत असेल असें मी समजलें होतें. आहा तुझ्यासारखी गुणांची मुलगी मला असती, तर मी तिला तिच्या मर्जीस येतें तें करूं देतें. पण तुझ्या आईस तुजवर सत्ताच करावीशी वाटते. तिला लहर आली म्हणजे तुझी चांगलीही गोष्ट ती ऐकत नाहीं. तुझ्यासारख्या मुलीशीं तिला असें करवतें तरी कसें? तुला पाहुन मला किती दुःख होतें तें सांगवत नाहीं!

**दुर्गा**—(फिरून रडूं लागते.) माझें हृदय फुटतें नानी. माझा प्राण घाबरा होतो.

**नानी**— खरेंच कसा घाबरा होणार नाहीं? तुझे डोळे तांबडे आणि सुजलेले दिसतात! मला तुझी काकळुत येते; आपलें

दुःख मला न सांगून आपल्या जिवास उगीच क्लेश मात्र देतेस. भागूस जर तुला झालें ह्याच्या अर्ध्यानें दुःख होतें, तर ती मला सांगितल्यावांचून राहतीचना!

**दुर्गा**—तें तुला सांगायास मला धीर होत नाहीं.

**नानी**—मी तें जाणण्याची इच्छा करीतही नाहीं. पण मला वाटतें कीं, तुझी आई बाहेर हिंडायास जाते, आणि तुला घरांत तिष्ठत ठेविते, हें कांहीं असावें.

**दुर्गा**—तें नाहीं.

**नानी**—तर दुसरें काय असावें? हें पहा तुला अधिक रडें कोसळलें! मी हरीस तरी बोलावून आणूं? कदाचित् त्याशीं खेळून तुझें दुःख दूर होईल.

**दुर्गा**—(श्वास टाकिते.) त्याशीं खेळायाचें सुख मला आतां कोठचें!

**नानी**—तें तुला मिळायास कांहीं कठीण नाहीं. तुझ्यासारख्या मुलीस खेळायास सोबती पाहिजे.

**दुर्गा**—त्यास भेटूं नये अशी मला आईची सांगी आहे.

**नानी**—त्यास भेटूं नये! तुझ्या बयेची काय समजूत आहे ती मला कळत नाहीं! भागूची आई अशीच होती. ती तिला सोनूची मैत्री करूं देईना; पण मी तिला कसा धीर दिला!

**दुर्गा**—तें तूं कसें केलें?

**नानी**—ती बाहेर बसायास जाई तेव्हां मी जपें; मग भागू सोनूकडे जाई अथवा सोनू भागूकडे येई.

**दुर्गा**—आणि तिच्या बयेस तें कळलें नाहीं?

**नानी**—तें मी संभाळीं.

**दुर्गा**—तशी मी जर हरीकडे गेलें, आणि बयेनें तुला पुसलें कीं, दुर्गा कोठें आहे तर?

**नानी**—मी तिला सांगेन कीं, ती वाडींत गेली आहे किंवा बाहेरून येऊन माझ्या खोलींत निजली आहे; अशीं अनेक निमित्तें सांगेन.

**दुर्गा**—अगे पण मीं कसें समजावें कीं, माझी लबाडी बयेस कळली नाहीं ?

**नानी**—तेवढ्याविषयीं तूं मजवर विश्वास ठेव; तिला शंका देखील येऊं देणार नाहीं. तूं माझें सांगितलेलें ऐकशील तर आजच हरीकडे जा; आणि रात्रीं हवी तर रहा पुढची काळजी कांहीं करूं नको.

**दुर्गा**—एक वेळ तसें करावें अशी मलाही इच्छा होते पण तूं मला वचन दे कीं, बयेस संभाळीन.

**नानी**—जा; भिऊं नको अगदीं.

मग खेळायाच्या लोभानें दुर्गा सांजची हरीकडे गेली. तिची आई बाहेरून आली तिनें नानीस पुसलें, "दुर्गा कोठें आहे ?" नानीनें सांगितलें. "ती सगळा दिवस बसून कंटाळली, मग जेवून निजायास गेली; ती माझ्या खोलींत निजली आहे."

ह्याप्रमाणें दुर्गानें आपल्या भोळ्या आईस पुष्कळ वेळ ठकविलें. वास्तविक पाहतां तिनें आईस ठकविलें नाहीं; आपणास ठकविलें. अगोदर तिच्या वृत्तींत संतोष असे; आईच्याजवळ येऊन तिला समाधान वाटे; आई बाहेरून आली असतां आनंदानें जाऊन ती तिच्या गळ्यांत मिठी घाली; तें सगळें सुख तिला मग नाहींसें झालें. रात्रंदिवस तिच्या मनांत शंका येई आणि ती म्हणे, "अगाई, मी हरीकडेस जातें हें माझ्या आईस समजलें तर कसें होईल ?" आईचा शब्द ऐकून तिला कांप सुटावा कीं, कोण जाणे तिच्या तोंडांतून काय अक्षरें निघतील! ती जेव्हां जेव्हां आईची मुद्रा रागीट किंवा व्यग्र पाही, तेव्हां तेव्हां तिला वाटे कीं, मीं अवज्ञा केली हें तिला समजलें तर नसेल ? दुर्गाची चिंता इतक्यानेंच सरली नाहीं—नानी तिला सदा सांगे कीं, भागू मशीं फार मोकळ्या मनानें वागे. ती म्हणे कीं, बहुत वेळ तिनें मला खडीसाखर, बदाम, दूध, असें दिलें; फडताळें, पेट्या, ह्यांच्या किल्ल्या तिनें मजवर विश्वासाव्या. तें ऐकून दुर्गा-

ऱ्याही मनांत आलें कीं, औदार्याविषयीं आणि विश्वास ठेवण्याविषयीं नानीनें आपणास भागूपेक्षां अधिक चांगलें म्हणावें. मग तिनें खडीसाखर, बदाम, व आणखीही खायाच्या वस्तू कित्येक नानीकरितां चोराव्या; किल्ल्यांचा घोंस आईच्या नकळत घेऊन तिजपाशीं आणून द्यावा. ती असें करी, पण तिचें मन तिला खाई. ती मनांत म्हणे कीं, मी अन्यायकर्म करितें आहें, हें कधींतरी उघडकीस येईल; आणि बयेच्या ममतेस मी मुकेन. एके दिवशीं निश्चय करून तिनें नानीस सांगितलें कीं, आजपासून मी तुला कांहीं देणार नाहीं. नानी म्हणाली, "बरें मुली, तुझी मर्जी; पण पहा विचार कर. मग पस्तावशील! थांब तर तुझ्या आईस बाहेरून येऊं दे, आणि तूं तिची आज्ञा कशी ऐकत असतेस तें मी तिला सर्व सांगेन." दुर्गा घाबरली; आणि भिऊन नानीनें सांगितलें तसें तिनें ऐकिलें. पूर्वी दुर्गेची आज्ञा नानी ऐकत असे; आतां, नानीचा हुकूम दुर्गा ऐकूं लागली. नानीनें तीस शिव्या द्याव्या; धमकावावें; तिची हेळणा करावी. दुर्गेनें तें सगळें सोसून चूप रहावें, तिची फिर्याद तिला सांगतां येईना. ती द्वाड कुळंबीण एके दिवशीं दुर्गेपाशीं आली, आणि तीस म्हणते, दुर्गा, तुझ्या आईनें जिलब्या करून कुलपांत ठेविल्या आहेत, त्यांतल्या कांहीं मला पाहिजेत, त्या आणून दे; दुसरें, चार मांडे आणि वाटीभर दूधही आण; तूं जा, आणि लवकर किल्ल्यांचा शोध कर."

**दुर्गा**—पण गडे नानी—

**नानी**—गडे नानीचें एथें कांहीं काम नाहीं; सांगितलें तें आणतेस कीं नाहीं?

**दुर्गा**—असें कां बरें म्हणतेस! बयेस कळलें तर मग कसें होईल? आणि बयेस नाहीं कळलें तरी ईश्वर तर पहातो आहे?

**नानी**—तूं इतके दिवस हरीच्या घरीं जातेस तें ईश्वरास ठाऊक नाहीं काय? त्याचें त्यानें तुला काय पारिपत्य केलें आहे?

दुर्गास आईनें भक्तिमार्ग चांगला शिकविला होता, तेणें-करून तिची पक्की समजूत झाली होती कीं, ईश्वराची दृष्टी सर्वत्र आहे. तो आपल्या बऱ्यावाईट कर्माचें फळ देतो. त्यानें आपणांस वाईट कर्म करूं नये म्हणून सांगितलें आहे; कांकीं, आपणांस तें दुःखदायक आहे. ती अविचारानें एक वेळ आईची आज्ञा मोडून हरीकडे गेली. मग एक अन्याय केला तो छपवायास तिला दुसरा करायाचा पडला; दुसरा छपवायास तिसरा करायाचा पडला; ह्याप्रमाणें मनुष्य घसरत जातें. तिला भय कीं, नानी आपली गोष्ट उघडी पाडील; म्हणून नानी सांगे तें तें तिला ऐकणें प्राप्त होई.

ह्यावरून पहा कीं, दुर्गास किती व्यथा झाली असेल? एके दिवशीं ती आपल्या खोलींत गेली आणि कडी लावून पुष्कळ रडली. ती म्हणाली, "जो आईबापांची आज्ञा मोडितो तो किती तरी हीनभाग्य म्हणावा! मजसारिखें दुःखी कोणी नसेल! पहा, मी आपल्या दासीची दासी झालें आहें! आतां मला सुमार्गानें चालवत नाहीं. ती द्वाड कुळंबीण जी आज्ञा करील ती मानणें मला प्राप्त होतें. मी लबाड, चोर, आणि ठक झालें; भगवान मजवर दया करो!" असें म्हणून तिनें दोन्ही हात तोंडावर दिले, आणि उसासून पुष्कळ रडून देवाची करुणा भाकिली. मग विचार करूं लागली कीं, पुढें कशी गत करावी! ती अकस्मात उठली आणि म्हणाली, "मीं आतां निश्चय केला. बयेनें मला एक महिनापर्यंत जरी जवळ बोलाविलें नाहीं; जरी तिनें माझा प्राण घेतला—पण नाहीं, ती असें करणार नाहीं; ती मजवर दया करील. ती मला एक वेळ, माझे दुर्गा, असें म्हणेल. तिचें हृदय दयाळू आहे! अहा! पण हें आतां मला किती अवघड पडलें आहे तें पहा! ती रागानें मजकडे पाहील, आणि मला शिव्या देईल तें मला कसें साहवेल! असो, कांहीं चिंता नाहीं. मी तिजपाशीं आपले सगळे अन्याय सांगेन; सांगेनच. मी अतःपर ह्या रांडे कुळंबि-

णीचे जात्र सोसणार नाहीं. हा मीं त्रिवार निश्चय केला." मग ती लागलीच खोलींतून निघाली, आणि आईला एकटीला मागीलदारीं गांठून, तिच्या गळ्यास मिठी मारून, तिनें तीस आसवांनीं न्हाणलें. तिला दुःखाचें भरतें आलें; काय बोलावें तें सुचेना, तेणेंकरून तिची जिव्हा बंद झाली.

**बाळा०**—माझे लाडके मुली. तुला काय झालें असें?

**दुर्गा**—बये, काय सांगूं?

**बाळा०**—हे अश्रुपात कां इतके मुली? माझे गुणांचे मुली?

**दुर्गा**—माझे जिवलगे बये!

**बाळा०**—बोल! बोल बेटा माझे! तुजवर काय असें जड पडलें आहे तें?

**दुर्गा**—होय! तूं जर क्षमा करशील तर सांगतें.

**बाळा०**—तुझा खरा पश्चात्ताप पाहून मीं क्षमा केली बोल तूं आतां मोकळेपणें.

**दुर्गा**—माझे बये, मजपासून तुझी अवज्ञा झाली. तूं मनाई केली असतां मी पुष्कळ वेळ हरीकडे गेलें.

**बाळा०**—माझे लाडके दुर्गे! तुजपासून अशी गोष्ट झाली? जी तूं, किंचित् राग येईल म्हणून इतकी भीत असस!

**दुर्गा**—जर तुला सगळें समजेल, तर मग मी लाडकी दुर्गी कोठची?

**बाळा०**—दुर्गे, तूं मला धास्ती घालितेस. चिंता नाहीं, यत्किंचित्ही न चोरतां सगळें मजपाशीं सांग. तुला कोणीं तरी ठकविलें असावें. तूं कधीं आजपर्यंत असें केलें नाहीं.

**दुर्गा**—होय बये, मला ठकविलें, नानीनें; नानीनें मला ठकविलें.

**बाळा०**—काय! त्या रांडे कुळंबिणीनें!

**दुर्गा**—होय बये, आणि तें तिनें तुला कळवूं नये म्हणून मीं तिला तुझ्या पेट्यांच्या किल्ल्या पुष्कळ वेळ दिल्या. तिजक-

रितां खडीसाखर, बदाम आणि दुसऱ्या वस्तू मीं कोण जाणे किती चोरल्या असतील !

बाळा०—केवढी पातकी मी ! हें काय मी माझ्या लेंकीचें अकर्म ऐकतें ? द्वाड पोरी, सोड मला आतां. तोंड काळें कर एथून! अतःपर तुशीं कसें वर्तावें, ह्याविषयीं मला घरांतला विचार घेतला पाहिजे.

दुर्गा—नाहीं बये, मी तुला सोडणार नाहीं. तूं अगोदर माझें पारिपत्य कर; पण वचन दे कीं, पुढें मी मागच्याप्रमाणें तुझ्यावर ममता करीन.

बाळा०—हतभाग्ये मुली ! तुझें पारिपत्य चांगलें होईल !

बाळाबाई असें बोलून दुर्गास टाकून गेली. मग दुर्गाचा बाप आणि आई उभयतां येऊन त्यांनीं नानीस बोलावून आणिलें; आणि तिला पुष्कळ शिव्या देऊन लागलेंच घरांतून हाकून दिलें. तिनें फार फार काकळूत केली कीं, "माझ्या पाठी-वर मारा पण पोटावर मारूं नका, मी असें अतःपर करणार नाहीं." पण त्यांनीं तें ऐकिलें नाहीं. दुर्गाच्या बापाचा तर मोठा निग्रह पडला. तो तिला म्हणाला, "नानी, मी तुशीं किती चांगला वागलों आहें! तुझे किती अन्याय क्षमा केले आहेत! मला वाटलें होतें कीं मी तुजवर कृपा करितों, तेणेंकरून तूं माझ्या मुलीस बऱ्या गुणांची शिक्षा लावशील; त्या तूं तिजकडून अवज्ञा आणि चोरी करविली. तूं मनुष्य नव्हस, राक्षसी आहेस, ह्यावरून! माझ्याजवळून नीघ लवकर; आणि तुझी इच्छा असेल कीं, यमाच्या यातनेंत पडूं नये, तर पुढें चांगले गुण धर."

मग दुर्गावर पाळी आली—ती दीनवाण्यासारिखी हात जोडून बापासमोर उभी राहिली; रडून रडून तिचे डोळे सुजले; तिचें तोंड उतरलें; तिचे गाल पांढरे झाले; आणि तिचें सर्वांग कांपूं लागलें; कोणी म्हणेल कीं, तिला प्राणांताची व्यथा होत आहे! तोंडावाटे एक शब्द फुटेना. ती उगीच खालच्या मानेनें वाट पहात होती कीं, बाप काय पारिपत्य सांगतो तें ऐकावें; तों

तो तिला कठोर वाणीनें बोलला:—"पोरी, तूं आपल्या आई-बापांस ठकविलें, तूं त्यांचा मोठा अन्याय केला. जी तुला जीवा-पलीकडे लेखते, आणि तूं सुखी असावें असें जी निरंतर इच्छि-ते, अशा आईचें ऐकूं नये आणि त्या दुष्ट कुळंबिणीचें ऐकावें अशी तुला वासना कशी झाली ? आतां तुला योग्य तसें जर तुझें पारिपत्य केलें, आणि त्या कुळंबिणीसारिखें तुलाही मीं आपल्या दृष्टीवेगळें केलें, तर माझा अन्याय कोण म्हणेल ?"

**दुर्गा**— तूं मजविषयीं कधीं वांकडें मनांत आणणार नाहींस बाबा; आतां मला योग्य तसें माझें पारिपत्य कर; मी तें सगळें साहीन; पण पुनः एक वेळ माझा अंगीकार कर, एक वेळ मला आपली म्हण.

**बाप**— मी इतक्यांत तुझा अंगिकार करणार नाहीं. तूं अन्याय कबूल झालीस म्हणून तुझें पारिपत्य मात्र करीत नाहीं; पण तुझा फार दिवस पश्चात्ताप पाहिल्याशिवाय मी तुला, माझे दुर्गे, असें म्हणणार नाहीं. तूं अतःपर नीट जपून चाल. अन्यायामागें पारिपत्य चालून येतेंच; म्हणून मी तुझें वेगळें पारिपत्य करीत नाहीं; तुझी तूंच आपलें पारिपत्य करशील. बापाच्या ह्या शेवटच्या शब्दांचा अर्थ दुर्गास चांगला समजला नाहीं. तिला आपण बापापासून अशी सुटेन असें वाटलें न-व्हतें. मग ती आईच्या आणि बापाच्या पायांपाशीं नाक घां-सून त्यांस म्हणाली, "मी अतःपर तुमचे आज्ञेच्या बाहेर तिळ-प्राय जाणार नाहीं." पुढें ती तशीच चालली; पण बापानें सांगितलें होतें त्याप्रमाणें तिचें पारिपत्य होणें चुकलें नाहीं. त्या द्वाड नानीनें जिकडे तिकडे तिजविषयीं वांकड्या गोष्टी सांगित-ल्या. तिच्या आणि आपल्या ज्या ज्या गोष्टी झाल्या तितक्या तिनें लोकांपाशीं सांगून आंगच्या आणखी लबाड्या लाविल्या. ती म्हणाली, "दुर्गेनें फार दिवस माझी काकळूत करून करून मला नानाप्रकारच्या वस्तू चोरून आणून देऊन, शेवटीं माझी बुद्धि फिरविली; आणि मीं लांच घेऊन हरीची तिची भेट केली.

नंतर तो रोज सांजचा येई, आणि तीं दोघें रात्रीचीं फार वेळ एकांतांत असत." असें सांगितल्यावरून लोकांच्या मनांत दुर्गाविषयीं वांकडी कल्पना आली. तें ऐकून दुर्गास रात्रंदिवस हृद्रोग लागला. ती आपल्या बरोबरीच्या मुलींच्या मंडळींत जाई, तेव्हां पाही तों जिकडे तिकडे त्या एकमेकींच्या कानास लागत, आणि फुसफुसत; आणि तिजकडे तिरस्कारानें पहात, आणि तिला लावून बोलून हंसत. जर ती अंमळ अधिक बसली तर त्या म्हणत "ती एथें बसून संकेताच्या वेळेची वाट पहाते आहे." ती नवें वस्त्र किंवा लेणें अंगावर ल्याली, तर त्यांनीं म्हणावें, "जिला आईच्या किल्ल्या मिळतात, तिला चांगल्या वस्तूंचा काय तोटा?" कोणाशीं तिची अंमळ बोलाचाली झाली तर त्यांनीं म्हणावें, "दुर्गा, तुझें चित्त हरीकडे गेलें वाटतें, म्हणून तूं चावळत बोलतेस!" असें प्रत्येक तुके[1] तिच्या काळजांत बाण जसे लागत. जेव्हां तिला दुःखाचा वेग साहवेनासा होई, तेव्हां ती आईच्या गळ्यास मिठी मारून रडे. आई तिला म्हणे, "मुली, हें तूं आपल्या हातीं आपणावर आणिलें, तर धीर धरून सोस. भगवंतापाशीं आपल्या अपराधांची क्षमा माग; तें तुला पुढें जन्मवर उपयोगीं पडेल, आणि तुझें हित करील. ईश्वराची मुलांस आज्ञा आहे कीं, मुलांनों, तुम्ही आपल्या आईबापांस माना, आणि तीं सांगतील तसें वर्ता. अशी आज्ञा आहे ती देवानें त्यांस सुख व्हावें म्हणूनच केली आहे. बापड्यांनो, तुम्हांस अजून ह्या विश्वांत कसें वागावें, हें ठाऊक नाहीं. तुम्ही एकादें करतां त्यापासून पुढें काय उत्पन्न होईल हें तुमच्या लक्ष्यांत येत नाहीं. ईश्वरानें तुम्हांस आईबापांच्या स्वाधीन केलें आहे. जीं आईबापें तुम्हांस आपल्या जिवाप्रमाणें लेखितात, तुमचें संरक्षण करण्याविषयीं ज्यांचें ज्ञान तुम्हांपेक्षां अधिक आहे. हें तुला पहिल्यानें खरें वाटलें नाहीं, पण आतां अनुभव आला कीं नाहीं तो पहा! मुली, तुजवर संकट पडलें आहे ह्यावरून तूं समजून घे कीं, दुसऱ्या जितक्या ईश्वराच्या आज्ञा आहेत

१ टोमणें प्रत्येकीं.

त्या अशाच आहेत. त्यानें ज्यांत आमचें मनुष्यांचें हित होईल, तेंच सांगितलें आहे. ज्यांत आमचें अनहित तेंच निषेधिलें आहे. म्हणून जें निषेधिलें आहे तें आपण केलें असतां आपण आपल्या हातीं आपणांस उपद्रव करून घेतों असें होतें. सदाचरणानें हितच होईल, असा प्रथम निश्चय होत नाहीं; भ्रम पडून उलटें सुलटें दिसतें; परंतु शेवटीं भ्रांत फिटते, जसें तुलाच आतां झालें. तूं पहा कीं, एका अपराधानें तूं किती फेऱ्यांत आलीस. तर ह्याचा दाखला घेऊन, अतःपर तूं जपून चाल; आणि इतकी एक गोष्ट मनांत दृढ धर कीं, जें कर्म सदाचरणास वांकडें तें तुझ्या सुखास वांकडें."

दुर्गा आपल्या आईच्या उपदेशाप्रमाणें वागत गेली. जों जों तिची निंदा लोकांनीं करावी, तों तों तिनें ती सहन करून सदाचरणानें वागावें. असें होतां होतां, कांहींका दिवसांनीं तिजविषयीं लोकांच्या तोंडची निंदा सहज बंद झाली; शेवटीं "निर्दोष दुर्गाबाई" असें विशेषणयुक्त नांव तिला सर्वांच्या मुखानें प्राप्त झालें.

---

## २१. म्हातारा भिकारी.

**अन्याबा**—(चाकरास) ह्या म्हाताऱ्यास तूं आंत कां येऊं दिलें नाहीं ?

**म्हाता०**—महाराज, त्यानें मला बोलाविलें, परंतु मीच आलों नाहीं.

**अन्या०**—कां बरें ?

**म्हाता०**—मला सांगायाला लाज वाटते—मी कधीं केलें नाहीं तें कर्म करितों आहें. मी भीक मागायास आलों आहें.

**अन्या०**—तूं भला मनुष्य दिसतो आहेस; गरीब झालास म्हणून तुला लाज कां वाटते ? कितीएक माझे मित्र गरीब आहेत, त्यांमध्यें मी तुला लेखीन. ये बैस मजपाशीं.

**म्हाता०**—क्षमा करा महाराज, मला आतां वेळ नाहीं.

**अन्या०**—असें निकडीचें तें तुला काय काम आहे?

**म्हाता०**—ह्या सृष्टींत जें मुख्य काम करायाचें, त्याच्या तजविजींत मी आहें. आपण एथें एकटेच आहों, मी तुम्हांस खरेंच सांगतों कीं, माझ्या आयुष्याचे आठ दिवस बाकी आहेत.

**अन्या०**—तें तुला कसें समजलें?

**म्हाता०**—मला कसें समजलें तें माझ्यानें तुम्हास सांगवत नाहीं; पण मी जाणतों, कांकीं असें मला वाटतें; आणि तसें घडून येईलच. बरें आहे कीं, माझ्या मरणानें कोणाचें नुकसान होणार नाहीं. माझ्या जांवयानें आणि मुलीनें मला आज दोन वर्षें पोशिलें.

**अन्या०**—तो त्यांचा धर्मच आहे; त्यांत त्यांनीं नवल काय केलें?

**म्हाता०**—आजपर्यंत मजपाशीं पैका होता तेणेंकरून मी कोणाच्या अंगावर पडेन असें नव्हतें. तो मीं एका गृहस्थाकडे ठेविला होता. त्यानें तो ख्यालीखुशालींत उडवून, आपणास आणि मलाही गरीब केलें. महाराज, क्षमा करावी, आपणही गृहस्थच आहां; परंतु मी खरें आहे तें बोललों.

**अन्या०**—ही गोष्ट माझी प्रत्यक्ष असती तरी मी संतोषानें ऐकतों, मला राग येताना.

**म्हाता०**—मला शेवटपर्यंत काम करवतें तर चांगलें होतें! पण आतां मी अगदीं खंगलों, आणि निस्तेज झालों. मला वाटतें कीं, मीं आतां यातनेंतून सुटावें म्हणून ईश्वरानें माझे हातपाय निर्बळ केले. मी कधीं काम केल्यावांचून राहिलों नव्हतों. महाराज,मी ज्वान होतों तेव्हां काम करीं, तेणेंकरून माझें शरीर दृढ राहिलें होतें; मला कधीं वैद्य ठाऊक नाहीं. पण जें काम ज्वानपणास बळकटी आणीत होतें, तेंच म्हातारपणास श्रम देऊं लागलें आहे. मग माझ्यानें काम

होत नाहींसें झालें; तितक्यांत जवळ दोन पैसे होते तेही गेले. मला काम करायाची मनापासून आवड; पण काय करूं? हातपाय राहिले. हें आठवून माझ्या डोळ्यांस अश्रु येतात, ह्याची क्षमा असावी. मी आपल्यास दुर्बळ पाहून फार कष्टी होतों.

**अन्या०**—तुझीं मुलें तुला पोशीत नाहींत?

**म्हाता०**—मला एक कन्या मात्र आहे; तिनें आणि तिच्या भ्रतारानें माझा पुत्राहून अधिक समाचार घेतला. त्यांनीं मला असल्या पदार्थांत कांहीं वाण केली नाहीं. ईश्वर त्यांचें कल्याण करो.

**अन्या०**—तर काय तीं तुझा आतां समाचार घेत नाहींत?

**म्हाता०**—तींच गरीब झालीं, तीं माझा समाचार काय घेतात? नदीस रेल[1] आली तिनें त्यांचें घर वाहवलें; त्यांचें सर्वस्व धुपून गेलें; गुरेंढोरें मेलीं; त्यांनीं मला पोसायाकरितां कर्ज काढिलें आहे; इतकी एकच गोष्ट त्यांनीं माझ्या आज्ञेवांचून केली; तें मला फार वाईट वाटलें. आतां माझ्या उत्तरक्रियेचा तरी त्यांजवर भार पडूं नये, म्हणून मी भीक मागतों आहें. मी जुना मनुष्य परंतु नवा भिकारी आहें महाराज!

**अन्या०**—बरें, तूं रहातोस कोठें?

**म्हाता०**—तितकें मी सांगत नाहीं. माझें किंवा माझ्या मुलांचें बिऱ्हाड तुम्हीही पुसूं नये.

**अन्या०**—क्षमा करा म्हातारे बाबा, मीं सहज पुसलें.

**म्हाता०**—होय; मीही जाणतों. आठां दिवसांनीं तुम्ही स्वर्गाकडे पहा. तेथें माझें घर झांकलें राहणार नाहीं.

**अन्या०**—(त्यास मूठ भरून रुपये देतो.) म्हाताऱ्या, हे घे. ईश्वर तुला फार दिवस वांचवू!

**म्हाता०**—इतके सगळे? नाहीं, इतके मीं इच्छिले नव्हते. मला पांच पाहिजेत, त्यांहून अधिक माझ्या उपयोगीं नाहींत; स्वर्गीं कोणत्याही गोष्टीची वाण नाहीं.

---

[1] पूर.

अन्या०—तूं बाकीचे आपल्या मुलांस दे.

म्हाता०—त्यांस काम करायाचें सामर्थ्य आहे; त्यांस धर्माचें कशास पाहिजे ?

अन्या०—जा माझ्या भल्या म्हाताऱ्या ! जा आणि स्वस्थ हो.

म्हाता०—( पांच ठेवून बाकीचे रुपये परत करितो.) महाराज, हे आपले आपण घ्यावे.

अन्या०—माझ्या मित्रा, तूं मला लाजवितोस.

म्हाता०—मलाही लाज वाटते. पांच रुपये तरी मला घ्यायाला संकट वाटतें. तर हे बाकीचे ठेवावे; कोणी दुसरे भिकारी येतील त्यांस द्यावयास उपयोगीं पडतील.

अन्या०—तुझी अवस्था पाहून मला दया येते.

म्हाता०—आतां ईश्वरास माझी दया यावी; आणि तुमच्या औदार्याचें फळ त्यानें तुम्हांस शतगुणित द्यावें.

अन्या०—तूं कांहीं अन्न घेशील ?

म्हाता०—मी सकाळीं खाऊन बाहेर पडलों आहें.

अन्या०—तर कांहीं बरोबर तरी घेऊन जा.

म्हाता०—नाहीं महाराज, तें ईश्वरास आवडणार नाहीं. तुमची आवडच आहे तर एक सुपारीचें खांड द्या आणि इवला तंबाखू.

अन्या०—तुला हवी तितकी सुपारी घे; बैस आणि तंबाखु पान यथेष्ट खा, आणि जा.

म्हाता०—नको. मला इवलेंसें पुरे; अधिक सोसत नाहीं. (अन्याबा आपली बटवी त्यापुढें करितो, तो देवाकडे हात करून म्हणतो) हे भगवान, ह्या गृहस्थाचें कल्याण कर. ( ते दोघे पानतंबाखु खातात. )

अन्या०—म्हाताऱ्या, आज रात्रीचा तूं आमच्या घरीं रहासना ? तुला कोणीं पाहूं नये असें तुझ्या मनांत असल्यास, मी तुला तशीच जागा देईन.

**म्हातारा०**—नाहीं महाराज, माझ्यानें राहवत नाहीं. माझा अमोलिक वेळ मोडतो.

**अन्या०**—मला आणखी तरी कांहीं सेवा सांग.

**म्हातारा०**—तुमच्या आवडीकरितां मी कांहीं मागावें, तर मला इहलोकीं अपेक्षा राहिली नाहीं. एक सकलादीचा तुकडा ह्या हाताला गुंडाळायाकरितां असला तर द्यावा. ( हाताकडे पहातो. ) हा हात माझा अगदीं राहिला आहे.

**अन्या०**—(दोन तुकडे देतो) घे हे दोहीं हातांस दोन, माझ्या मित्रा.

**म्हातारा०**—दुसरा तो ठेवा; मला एक पुरे. माझा उजवा हात बरा आहे. तो उघडा ठेवतां येईल. डावा मात्र शक्तिहीन झाला आहे. हा उपकार मी तुमचा विसरणार नाहीं.

**अन्या०**—आणि माझ्या मित्रा, मी पण तुला विसरणार नाहीं. माझ्या मस्तकीं तुझा पुण्यवान हात एक वेळ ठेव बरें !

**म्हातारा०**—भगवान तुला सुखी राखो, आणि स्वर्गसुख देवो.

( तो जातो. )

---

## २२. समागमसुख.

माधव हा मुलगा प्रकृतीनें थंड होता. सगळा दिवस त्यानें विचारांत असावें; कोणाशीं फारसें बोलूं नये. तो आपल्या चुलत्यासंगतीं बाहेर जाई तेव्हां वाटेंत जें जें पाही तें तें घरीं आला म्हणजे एकटाच मनांत घोळी. त्याच्या चुलत्याचीं मुलें होतीं त्यांस ती त्याची प्रकृति अगदीं आवडत नसे. एके दिवशीं त्यानीं माधवाची आपल्या बापापाशीं फिर्याद केली आणि म्हणालीं, “ बाबा, हा आमच्या मंडळींत असला म्हणजे ह्यापासून आमचा उत्साहभंग होतो.” पुढें तीं बापास म्हणणार होतीं कीं, ह्याला आपल्या घरांतून लावून दे; इतक्यांत त्यांस दुसरी सौम्य युक्ति सुचली कीं, तो जसें करितो, तसेंच त्याशीं आपणही कांहीं दिवस करावें.

मग दुसऱ्या दिवशीं त्यांतील एकजण किल्ला पहायास गेला; एकजण बंदूकखाना; एकजण गोदी, धुराचें यंत्र, व तारवें; एकजण कुलाब्याची दिपमाळ; व एकजण घारापुरीचें पांडवलेणें. तीं सर्व संध्याकाळीं घरीं आलीं तेव्हां रोज गोष्टी माता सांगत, तसें त्या दिवशीं त्यांनीं माधवास कांहींच सांगितलें नाहीं. तीं नित्य एकमेकांशीं थट्टामस्करी व गोष्टी करून आनंदांत काळ घालवीत; त्या दिवशीं जिकडे तिकडे स्तब्ध, उदासीन, व विरस झालें. माधवास तें लागून मोठा पश्चात्ताप झाला. त्याला वाटलें कीं, आपला स्वभाव रंजक नव्हे हें पाहून हीं मुलें आपणाशीं तशीच वर्तणूक करूं लागलीं. मग त्या दिवसापासून तो ती प्रकृति सोडून त्यांशीं मन मोकळें करून बोलूं लागला. तेव्हांपासून त्यांचें त्याचें मन मिळून तीं परस्पर आनंद पावलीं. नंतर तो मैत्रीचें सुख अनुभवूं लागला. त्यास समजे तें तो त्यांस सांगे, व त्यांच्या तोंडून आपण ऐके. तेणेंकरून तो सर्वांस आवडूं लागला.

---

## २३. थोराचें हृदय.

### नाटक एकअंकी.

#### पात्रें.

पांडुरंगराव..................कोणी गृहस्थ.
वासुदेव ......................त्याचा मुलगा.
अंबा ..........................त्याची मुलगी.
आत्माराम ..................त्याचा भाचा.
सावित्री ......................त्याची भाची.
चाकर ......................( पांडुरंगरावाचा ).
गणोजी ......................गाडीवान.

## स्थळ.

पांडुरंगरावाचें घर.

## प्रवेश १.

पांडुरंगराव.

दुसऱ्याचीं मुलें आपल्या घरीं आणून असें होतें. हाच आत्माराम, ह्यावर माझा किती लोभ! तो माझ्या मुलांपेक्षां मला अधिक आवडत होता; आणि तोच आतां किती द्वाड निपजला तो पहा! मला आश्चर्य वाटतें, लहानपणीं त्याची चर्या चांगली दिसत होती, तें सगळें उलटें कसें झालें? त्याची भलाई किती! त्याचें धैर्य किती! संतोषवृत्ति काय! ज्याचा सिंहासारखा पराक्रम! मेंढरासारिखी गरीबी! हे गुण पाहून त्याजवर कोणाचा लोभ जडणार नाहीं? असो, आतां त्यानें माझ्या दृष्टीसमोर येऊं नये; मी त्याचें नांव ऐकायासही राजी नाहीं. अरे, कोण आहे तेथें? सावित्रीस बोलावून आणा.

---

## प्रवेश २.

पांडुरंगराव व सावित्री.

**सावि०**—मामा, तूं मला कां बोलाविलें? काय आज्ञा आहे?

**पांडु०**—तुझ्या सोद्या भावाचें तुला कांहीं शुभवर्तमान सांगायाचें आहे.

**सावि०**—(फिकी पडते.) कोणाचें, आत्मारामाचें?

**पांडु०**—हें घे; हें वासुदेवाचें पत्र आलें आहे, हें वाच; नाहीं तर मी तरी तुला वाचून दाखवितों. (तो वाचतो.)

(वासुदेव पांडुरंगरावाचा लेंक, व आत्माराम त्याचा भाचा, ह्या उभयतांस उमरगांवीं शिकायास ठेविलें होतें; तेथून वासुदेव आपल्या बापास पत्र लिहितो.)

" शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना वि०,

" तुला एकादें अनिष्ट वर्तमान लिहावयास मला खेद वा-
" टतो, परंतु लिहिल्यावांचून परिणाम नाहीं; तें तूं दुसऱ्यापासून
" ऐकशील त्याजपेक्षां मजपासून ऐकिशील तें चांगलें. मला आ-
" पल्या आत्मारामाचे ढंग चांगले दिसत नाहींत. त्यानें
" आपलें घड्याळ विकलें; व पोथ्या पढायाच्या त्याही बहुत-
" करून विकल्या. मी तुला कळवतों मला कसें समजलें तें.
" माझी हितोपदेशाची पोथी चोळून जर्जर झाली, म्हणून मी
" पोथीविक्याकडे एक नवी घ्यायास गेलों होतों; त्यानें मला
" एक दाखविली, ती मीं आत्मारामाची म्हणून तत्काळ ओ-
" ळखिली. ती त्याचीच अशी माझी खातरी कशावरून झाली,
" तर त्याचें नांव तिजवर लिहिलें होतें. मग मीं ती चार रुप-
" यांस विकत घेतली; आणि कोणापाशीं बोललों नाहीं; कांकीं
" शाळेंतील मुलें त्याचा तिरस्कार करतील म्हणून. गुरुजींस
" मात्र एकांतीं वर्तमान सांगितलें. त्यांनीं पोथीविक्यास बोला-
" वून आणून चौकशी केली तों तो कबूल झाला कीं, 'मीं आ-
" त्मारामापासून विकत घेतली खरी.' नंतर त्यांनीं आत्मारा-
" मास विचारिलें. तोही कबूल झाला कीं, मला पैशाची गरज
" लागली म्हणून मीं विकली; आणि मला दुसरी घ्यायास पैसे
" मिळत तोंपर्यंत मीं माझ्या मित्राजवळ दोन होत्या त्यांतून
" एक उसनी घेतली आहे. पैसे काय केले म्हणून गुरुजींनीं पु-
" सलें तेव्हां त्यानें त्यावर कांहीं निमित्त सांगितलें; पण मला तें
" सगळें तर्कट दिसलें. मग मला घड्याळाचा संशय आला, म्ह-
" णून मीं त्यास विचारिलें कीं, किती वाजलेरे आत्माराम ?
" तो अंमळ गोंधळून म्हणाला, 'मीं आपलें घड्याळ नीट
" करायास घड्याळजीकडे दिलें आहे.' मीं त्या घड्याळजीच्या
" दुकानीं लागलाच गेलों आणि विचारिलें तों, सगळा तो-
" तया ! मग मीं त्यास आपला भाऊ जाणून फजीत केलें.

" त्यानें मला उत्तर केलें कीं, तुला माझ्या कारभारांत पडा-
" याचें कांहीं काम नाहीं. मला घड्याळाची गरज नाहीं म्ह-
" णून विकलें."

**पांडु०**—सावित्री ऐकिलेंना? आतां तूं काय म्हणतेस?

**सावि०**—मामा, तुला वाईट वाटलें असेंच हें ऐकून मलाही वाईट वाटलें जरी, तरी—

**पांडु०**—धीर धर अंमळ; इतक्यांत झालें नाहीं. ह्याहून चांगल्या गोष्टी त्या अजून पुढेंच आहेत. (तो पुन्हा वाचतो.)
" नंतर त्यानें काय केलें तें ऐक. परवांच्या दिवशीं तिसऱ्या
" प्रहरीं गुरुजींस न पुसतां तो बाहेर गेला; तो संध्याकाळ
" झाला तरी घरीं आला नाहीं; जेवणाचा वेळ झाला तरी
" दिसला नाहीं. सगळी रात्र बाहेर होता. तो सकाळीं आला.
" मग त्याची जी फजिती झाली आहे ती काय सांगूं? त्यास
" पुसलें कीं तूं कोठें होतास? तेव्हां त्यानें पूर्वींच गोष्ट रचून
" ठेविली होती ती सांगितली; आणि ती जरी खरी असली
" तरी, आज संध्याकाळीं त्याचा न्याय गुरुजींसमक्ष होणार
" आहे, तो नीट झाला असतां मला वाटतें कीं, त्याची अप्र-
" तिष्ठा करून त्याला एथून हांकून देतील; घरीं तरी परत पा-
" ठवितील. तूं इतका लोभ करीत असतां त्याची कृतघ्नता पा-
" हून व आपला दुर्लौकिक, व असल्या गुणानें त्याचें अक-
" ल्याण पाहून, मला बहुत खेद होतो. रात्रीस जेथें होता तें
" ठिकाण त्यानें मला सांगितलें, पण तें मला अगदीं खरें दि-
" सलें नाहीं. त्या ठिकाणाचें नांव तुला लिहीत नाहीं. कारण
" कीं तूं त्यावर अधिक रागावशील. तो आतां मला धाक दा-
" खवितो कीं, मी पळून घरीं जाईन."

**पांडु०**—त्याला येऊं तर दे; त्याला माझ्या उंबऱ्याच्या आंत पाय तर घालूं दे मग समजेल! तो रात्रीं जेथें जात असेल तेथेंच राहो. सावित्री, तूं मला त्याविषयीं एक शब्द बोलूं नको. गुरूनें त्यास अडकवून ठेविलें किंवा फजिती करून

हांकून दिलें, तरी तें मला सारिखेंच, मी त्याची चिंता अतः-
पर वहाणार नाहीं. त्याला हवें असेल तर त्यानें देशांतरीं
जावें; पाहिजे तर कोणाची गुलामगिरी करावी. मीं फार दि-
वस त्याला आपल्या मुलाप्रमाणें वागविलें.

सावि०—खरें मामा, आमचा तूं बापाहून अधिक प्रतिपाळ
केला.

पांडु०—मीं तो आपल्या संतोषानें केला. मी देशांतरीं अ-
सतां तुमच्या आईनें माझीं मुलें संभाळिलीं होतीं तसा मीं
तुमचा सांभाळ केला, ह्यांत नवल नाहीं. पण—

सावि०—आत्माराम अंमळ हूड आहे; म्हणून त्यापासून
एकादा अन्याय झाला असेल. एरवीं तो हाडाचा कसा आहे
तो तुझ्या लक्ष्यांत असेलच. त्याकडून एकादा अन्याय झाला
असला तर त्यास त्याच्या चौपट खंती होत असते.

पांडु०—मीही त्याला पुष्कळ अन्याय क्षमा केले असतील.
त्यानें दारू जाळतांना केंस भाजून घेतले तें; आपल्या दि-
वाणखान्यांतला आरसा फोडिला तें; किनखाबाचा अंगरखा
चिखलांत खराब केला तें; गाडी मोडली तें; हे सर्व अप-
राध मीं त्याला क्षमा नाहीं केले ? मी म्हटलें असो, पोर-
पणा आहे; ह्यांत कांहीं दुर्गुण नाहीं. पण घड्याळ विकणें;
पोथ्या विकणें; शाळा सोडून न विचारितां बाहेर जाणें; रा-
त्रीस बाहेर निजणें; गुरूपासुन पळून जाईन म्हणून म्हणणें;
आणि मजकडे येऊन हें सगळें साजेंरें करून दाखवीन म्ह-
णून मनांत आणणें; ह्या गोष्टी फार वाईट आहेत.

सावि०—माझ्या मामा, तूं प्रथम तो आपली अंगसुटका
कशी करितो तें ऐक, मग तुला करणें असेल तें कर.

पांडु०—आतां–मी त्याचें ऐकूं ? भगवान करो आणि अतःपर
त्याचें दर्शन मला न होवो ! मी माझ्या सर्व कुळांस, व घ-
रांतील माणसांस सांगून ठेवितों कीं, तो गांवांत आला अ-
सतां काठ्यांनीं झोडा.

**सावि०**—आहा मामा, असें करूं नको ! तूं इतका कठोर त्यावर होऊं नको. मी तुझी भाची. मी तुला माझ्या बापासारिखा मानितें: एक वेळ माझी प्रार्थना ऐक.

**पांडु०**—बरें पहा तूं मी तसें करितों कीं नाहीं तें !

**सावि०**—तर तूं तसें केलें असतां मला असें वाटेल कीं, तूं माझ्या आईस विसरलास; आणि तुझा लोभ मजवरून उणा झाला.

**पांडु०**—काय तुजवरून ? तुजकडे काय अन्याय आहे ? तुझ्या भावाच्या अन्यायाकरितां माझी तुजवर नावड कधीं होणार नाहीं. पण तूं मला अतःपर भावाविषयीं भीड घालूं नको. माझी प्रीति संपादुन तूं स्वस्थ ऐस.

**सावि०**—माझ्या भावावर तुझी अवकृपा पाहून मला सुख कसें होईल मामा ?

**पांडु०**—त्याला तें साजे. त्यानें पैशांचें काय केलें ? व रात्रीस बाहेर कोठें गेला होता तें त्यानें कां सांगितलें नाहीं ?

**सावि०**—पत्रावरून मला असें दिसलें, तो तीं दोन्ही कबूल झाला; वासुदेवास मात्र तें खरें वाटलें नाहीं. ( ती पांडुरंगरावांकडे डोळ्यांत आसवें आणून पहाते.) माझ्या मामा, तूं कठोर होऊं नको !

**पांडु०**—( अंमळ थंड होऊन) बरें तर पाहूं या; त्याचा गुरु काय म्हणतो तें. तोंपर्यंत मी त्यास अवकाश देतों.

---

## प्रवेश ३.

### पांडुरंगराव, सावित्री व चाकर.

**पांडु०**—तुला काय पाहिजे ?

**चाक०**—खालीं कोणी माणूस आला आहे, तो तुम्हांस भेटायास इच्छितो.

**पांडु०**—तो काय घेऊन आला आहे ?

**चाक०**—शाळेंतून पत्र घेऊन आला आहे, हें घ्यावें.

**पांडु०**—(लाखोट्यावरील नांवाकडे पहातो.) ठीक! मी ह्याचीच वाट पहात होतों. हें गुरूच्या हातचें खरें. मी त्यांचें अक्षर ओळखितों. मनुष्य कोठें आहे? त्याला म्हणावें थांब, मी उत्तर देतों.

**चाक०**—त्यास वरती बोलावूं?

**पांडु०**—मीच खालीं येतों. मी त्याच्या तोंडून सर्व वर्तमान ऐकणार. (तो खालीं जातो. सावित्री त्याच्या मागुन जाते. चाकर तीस खूण करून खोळंबवितो.)

---

## प्रवेश ४.

### चाकर व सावित्री.

**चाक०**—सावित्रीबाई, इकडे या.

**सावि०**—कां, काय म्हणतोस ?

**चाक०**—(हळूच) आत्माराम एथें आला आहे.

**सावि०**—काय, माझा भाऊ?

**चाक०**—जरी येऊन पोहोंचला नसला तरी आतां येऊन पोहोंचेल. गांवाजवळ आला आहे.

**सावि०**—तुला हें कोणीं सांगितलें?

**चाक०**—गुरूकडून माणूस आला आहे त्यानेंच सांगितलें-त्यास तो वाटेंत भेटला. आहा बये! त्यानें काय बरें असें केलें?

**सावि०**—त्यानें कांहीं अनुचित केलें नसावें. तो तसें कधीं करणार नाहीं, हें तूं खास समज.

**चाक०**—तो असें करिल असें मलाही कधीं वाटलें नव्हतें. आम्हां सर्वांस तो आवडतो, हें देवास ठाऊक असेल; आम्ही त्यासाठीं प्राण देऊं. त्याची इवली चाकरी केली तर त्यानें तो उपकार कधीं ठेविला नाहीं. तुमच्या मामानें जेव्हां जेव्हां आम्हांवर रागें भरावें, तेव्हां तेव्हां त्यानें आमची रदबदली करावी. शेजारीपाजारी गरीब लोक आहेत, तितके त्यास बरें म्हणतात. मला आश्चर्य वाटतें,

गुरुजींनीं त्यावर कसा राग केला ? त्यानें कांहीं खोडी केली असेल, म्हणून ते त्यास शिक्षा लावायास गेले असावे. तो अंमळ मानी आहे. तें पाहून त्यास वाटलें असेल कीं, आपली अप्रतिष्ठा होऊं नये, म्हणून तेथून तो निघाला असेल.

**सावि०**—माणसाची त्याची गांठ कोठें पडली ?

**चाक०**—एथून एक मजलेवर. तो नदीच्या कांठीं एका झाडाखालीं निजला होता.

**सावि०**—आहा ! गरीब बापडा !

**चाक०**—तो उठे तों माणूस तेथें खोळंबला होता, त्यास पाहून तो किती चमकला असेल तें पहा ! त्याला वाटलें कीं, हा मनुष्य आपणास परत न्यावयाकरितां पाठविला आहे, म्हणून त्यानें माणसास सांगितलें कीं माझे तुकडे तुकडे केले तरी मी तुझ्याबरोबर येणार नाहीं.

**सावि०**—खरेंच, मी त्याचा धीट स्वभाव जाणतें.

**चाक०**—तेव्हां माणसानें त्यास सांगितलें कीं, तूं मला इतका आवडतोस कीं, मला मार जरी बसला, किंवा माझी चाकरी जरी गेली, तरी तुला दुःख होईल तें मी कधीं करणार नाहीं.

**सावि०**—तर आत्मारामानें आतां काय करायाचें योजिलें आहे.

**चाक०**—तो थकला होता तरी हळूहळू माणसाबरोबर चालला. ते दोघे शिंवेपर्यंत बरोबर आले. तेथें तो आंबराईत लपून बसला आहे. त्यानें माणसास सांगितलें कीं, मामा पत्र वाचून काय म्हणतो तें परत येऊन मला कळीव.

**सावि०**—आहा ! माझें त्याचें भाषण होतें तर बरें होतें !

**चाक०**—तोही हेंच इच्छीत असेल.

**सावि०**—आमचा मामा आंबराईकडून नित्य फिरायास जात असतो. तो रागांत आहे, आणि पहिल्यानेंच तेथें ह्याची त्याची गांठ पडली, तर अनर्थ होईल. तर कृपा करून तूं

धांवत जा; आणि त्यास सांग कीं आपल्या कोठाराकडे ये; आणि त्या मागें लपून रहा; किंवा कोठें पेंढ्यांत लपून बैस. मामा बाहेर गेला म्हणजे मी तुला भेटेन—

चाक०—भिऊं नका बाईसाहेब. मी स्वतः त्याला तेथें आणितों आणि लिकवितों. (तो जातो.)

---

## प्रवेश ५.

### सावित्री (एकटी).

सावि०—हा भाऊ मला किती तरी श्रम देतो! तरी मला त्यावर लोभ केल्यावांचून राहवत नाहीं.

---

## प्रवेश ६.

### सावित्री आणि अंबा.

सावि०—ताई! मी तुशीं बोलायाकरितां वाट पहात होतें. बोलून तुला कांहीं वाईट वर्तमान सांगावें हें माझ्या दैवीं आलें आहे!

अंबा—मला तें सगळें आधींच समजलें. नुकतेंच बाबानें माझ्या भावाचें पत्र मजकडून वाचविलें; त्यावर गुरूचें पत्र आलें, त्यानें तर त्याचा राग दुणावला!

सावि०—आतां माझ्या भावाच्या दोषाचा मीं कसा परिहार करावा तो मला सुचत नाहीं.

अंबा—मी पैज मारितें कीं, तो निर्दोष आहे. तुला वासूचें कृत्रिम ठाऊक नाहीं? तो अन्याय करितो आणि ते लोकांवर घालितो. तुझ्या भावाविषयीं माझ्या बापाच्या मनांत त्यानें आजच वांकडें आणिलें असें नाहीं; ह्यामागें दहा वीस वेळ त्यानें त्यास बाहेर घालवून द्यावयाचें केलें होतें; पण शोध करून पहातां शेवटीं सगळा अन्याय वासूचा असें झालें. मला त्याच्या पत्रावरूनच दिसतें कीं हें कांहीं तरी

त्याचेंच कंवटाळ आहे, आत्मारामानें कांहीं मूर्खपणा मात्र केला असावा.

**सावि०**—आहा! काय तूं मला धीर दिला हा! माझा भाऊ रीतीनें चांगला, मनानें मोकळा, आचरणानें स्वच्छ, स्वभावानें उदार, प्रकृतीनें निःशंक आहे; पण अंमळ उतावळा, धट्ट, आणि आग्रही आहे. त्यानें एक वेळ निश्चय केला कीं, तो कदापि सोडीत नाहीं; आणि त्याच्या म्हटल्याप्रमाणें जे चालत नाहींत त्यांची मग तो मर्यादा ठेवीत नाहीं.

**अंबा**—आणि माझा भाऊ, मत्सरी, कृत्रिमी, दंभी, पोटांत शिरून घर घेणारा, असा आहे. जसें मांजर प्रथम मखमाली सारिखीं मऊ पावलें करून अंगावर ठेवितें, नंतर आपणांस भरंवशांत घालून तिख्यासारिख्या नखांनीं फाडितें, तसा तो आहे. तुझ्या भावांत आणि ह्यांत किती अंतर! माझा भाऊ घेऊन तुझ्या भावासारिखा भाऊ मला कोणी देईल तर तत्क्षणीं मी घेईन. ह्या वेळेस गोष्ट वाईट इतकीच आहे कीं, आत्माराम एथें नाहीं.

**सावि०**—आणि जर तो एथें असला तर!

**अंबा**—आं! कोठें आहे तर तो सांग, कीं ही मी त्याजकडे धांवलें. मला तो केव्हां दृष्टीस पडेल असें आतां झालें आहे!

**सावि०**—तो आपल्या कोठारापाशीं आहे. (कान देऊन) चुपचुप! मामा एकटाच आपणाशीं कांहीं बोलतो आहे, असें मला वाटतें.

**अंबा**—बरें, तूं आत्मारामाची बहीण, म्हणून तूं त्यास प्रथम भेटावें हें नीट आहे. मी बाबाजवळ एथें असतें, आणि तो अंमळ थंड होईल तर पाहतें. तूं धांव, जा त्याजकडे आणि त्याला धीर दे.

**सावि०**—हो, आणि चांगली शिक्षाही करीन. त्याला हें सगळें योग्य आहे.

(ती बाहेर जाते.)

## प्रवेश ७.

### पांडुरंगराव आणि अंबा.

**पांडु०**—ह्या पोरानें माझें पित्त असें खवळविलें आहे कीं, खालीं माणूस वाट पाहतो आहे त्याबरोबर पत्राचें उत्तर द्यायास माझ्यानें एक अक्षर देखील लिहवत नाहीं. असो, तो उद्यां जाईल. मला अंमळ स्वस्थ होऊं दे.

**अंबा**—असें कां बाबा, तूं काय अजून त्या बिचाऱ्या मुलावर रागांतच आहेस ? त्याचा अन्याय काय इतका मोठा आहे ?

**पांडु०**—खरेंच, तुम्हां पोरींना तो मोठा दिसत नाहीं; कांकीं तुम्हीही तशाच आहां. मला वाटतें कीं, त्याजपेक्षांही वाईट, तुम्हांपुढें गुणी मुलगा शिक्षा घ्यावयास असतांही—

**अंबा**—बाबा, कोण तो ?

**पांडु०**—माझा गुणांचा वासुदेव.

**अंबा**—आहा ! आपला वासू ? फार प्रामाणिक खरा ! बहुत थोर !! शिक्षा घ्यावयास योग्य !!!

**पांडु०**—मी जाणतों, सावित्रीला आणि तुला तो आवडत नाहीं. तुमच्या लापटणिकेवरून त्याविषयीं माझ्या मनांतही आणिकशी गोष्ट आली होती; पण गुरूनें त्याची आज मोठी तारीफ लिहिली आहे, त्यावरून माझा संशय दूर झाला.

**अंबा**—त्या सगळ्या गुरूंनीं, उपगुरूंनीं त्यास वाणून वाणून तुला कंटाळा आणला नाहीं पुरे. ते त्याच्या बापाची मातबरी जाणतात. धूर्त आहेत ते, बापाजवळून पैका काढायाचा असला म्हणजे लेंकाचे गुण वर्णून काढीत असतात सगळे.

**पांडु०**—लोक तसें करितात हें मीही जाणतों, पण वासूची मला अजून एकही वाईट गोष्ट आढळली नाहीं; आणि आत्मारामानें नाहीं तरी सहस्रावधि केल्या असतील.

**अंबा**—पण त्याच्या कृत्यापासून कोणाला उपद्रव झाला नसेल, त्याचा त्यासच झाला असेल.

पांडु०—तुम्ही एखाद्याला वेडें कराल. त्यानें माझी गाडी मोडली त्यांत काय माझा तोटा झाला नाहीं ? गाडी सोनेरी रंगाची, नुकती नवी केलेली, तिजकरितां दोन हजार रुपये मला पडले !

अंबा—ती गोष्ट आकस्मिक झाली, अज्ञानपणानें झाली. त्याचें वय पाहून तो त्याकडे दोष म्हणून लावितां येत नाहीं. गणोजी गाडी जोडून परीक्षा पहात होता, तों आत्माराम त्याच्या पाठीस लागून त्याजवळ बसला; तितक्यांत हातचा चाबूक खालीं पडला म्हणून दोऱ्या आत्मारामाच्या हातीं देऊन गणोजी खालीं उतरला; घोड्यांनीं दोऱ्या नेभळे हातांत पाहून मस्ती केली, आणि ते पळाले. बरें झालें कीं सामान तुटून घोडे निघून गेले, त्यामुळें दुसरें कोणी फार दुखवलें नाहीं; गाडी मात्र मोडली.

पांडु०—होय, हें कांहीं फार नाहीं झालें ! ह्यांत माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचा तोटा झाला नाहीं !

अंबा—कां ?आत्मारामाच्या डोक्यास खोंक नाहीं पडली ? तें असो, पण बिचाऱ्या गणोजीची चाकरी गेली, तें मला फार वाईट वाटतें.

पांडु०—तें आठवलें म्हणजे अजून माझ्या पायांचा जाळ मस्तकीं जातो. त्या कृत्यानें माझा आठशें रुपयांचा नाश झाला !

अंबा—अहा बाबा ! त्या वेळेस आत्माराम आपल्या मनांत किती ओशाळला ! गणोजीची आपणाकरितां बेअबरू झाली, तें त्याला वारंवार मनांत खाई.

पांडु०—ते दोघेही लबाड बेटे. दोघांस एकदाच हांकून देणें योग्य होतें. मला हें आश्चर्य वाटतें कीं, तुला कैवार घ्यावयास वाईट माणसेंच कशीं मिळतात ! तूं मुलगा झाली असतीस तर आत्मारामास सोबती चांगली साजतीस ! मग तुम्ही दोघें मोठमोठाले चमत्कार करितां !

**अंबा**—नाहीं पण—

**पांडु॰**—चुप बोलूं नको! तूं मला कंटाळा आणिला. मला बाहेर फिरायास जायाचें आहे. जा, आणि सावित्री कोठें आहे तिला घेऊन ये. (तो पागोटें न घालतांच बाहेर जातो)

---

## प्रवेश ८.

अंबा.

(आपणाशीं) ह्याला वळवायाला फार कष्ट लागतील. असो आशा सोडूं नये. ह्याचें तोंड मात्र कठीण आहे.

---

## प्रवेश ९.

अंबा आणि सावित्री.

**सावि॰**—(किंचित् दाराची फळी उघडून डोकाविते.) चुपचुप.

**अंबा**—कां?

**सावि॰**—मामा बाहेर गेला?

**अंबा**—नुकताच गेला. आत्माराम कोठें आहे?

**सावि॰**—तो मागील दाराच्या जिन्याशीं आहे.

**अंबा**—त्याला हळूच वर आपल्या खोलींत आण.

**सावि॰**—नाहीं. तें ठीक नाहीं! जानकी तेथें आहे.

**अंबा**—त्यास एथेंच आणायास काय चिंता आहे? बाबा बाहेर गेला म्हणजे एथें कोणी येत नाहीं.

**सावि॰**—खरें म्हटलें; आणि समयीं एथून त्यास झुकायालाही चांगलें; तूं एथें ऐस, मी त्याला आणितें.

---

## प्रवेश १०.

अंबा.

त्यापासून कधीं मी सगळें पुसून घेईनसें मला झालें आहे! त्याच्या भेटीनें मला मोठा आनंद होईल. मला त्यास पाहून

एक सगळें वर्ष लोटलें. ओहो! हा तो आला वाटतें. (त्यास भेटायास सामोरी जाते.)

---

## प्रवेश ११.

अंबा, सावित्री, आणि आत्माराम.

**अंबा**—(त्यास आलिंगिते.) आहारे माझा भाऊ!

**सावि०**—आपणास ह्यानें इतकें संकटांत पाडिलें आहे, त्या अर्थी ह्यास मोठा सत्कार उचित आहे.

**अंबा**—मी त्याला पाहून सगळें विसरलें.

**आत्मा०**—अंबाताई, तुझी ममता अजून मजवर तशीच आहे. सावित्रीताईसारिखी तूं मजवर कठोर दिसत नाहींस.

**सावि०**—असें काय? मी तुझ्या मामासारिखी असों द्यायाची होतें, मग-

**आत्मा०**—मला पहिल्यानें सांगा कीं, मामा काय म्हणतो? तो मजवर रागावला आहे हें खरेंच काय?

**सावि०**—तुला आम्ही एथें आणून लपविलें, हें जर त्याच्या कानीं गेलें, तर मग आम्हांस हें घर सोडून देशांतरीं जायाचें पडेल!

**अंबा**—होयग बाई! खरेंच! त्याच्यासमोर जायाचें अजून अंमळ नांव घेऊं नका. ह्या वेळेस तो एकादा अनर्थ करील!

**आत्मा०**—आमच्या गुरूनें काय बरें त्याला लिहिलें असावें?

**सावि०**—त्यानें तुझ्या पराक्रमाचें फार वर्णन केलें आहे!

**अंबा**—काल पत्र आलें त्यांत वासूनें कांहीं तुझें वांकडें लिहिलें आहे.

**आत्मा०**—काय! वासूनें लिहिलें? तर आतां मला दुसरा परिहार नको. त्याला सगळी गोष्ट ठाऊक आहे, आणि मी त्याला सर्व कांहीं सांगितलें आहे.

**अंबा**—त्याचें पत्र वाचलें असतां तुजकडे काडीमात्र अन्याय दिसत नाहीं.

**आत्मा०**—त्यांत जर माझा तिलप्राय अन्याय असेल तर चोराचे हाल ते माझे हाल!

**सावि०**—असो, तें बोलून फळ नाहीं. तुम्हां दोघांतून कोणी तरी एक भला किंवा लबाड असावा.

**आत्मा०**—तुला मी अन्यायी वाटतों? माझा अन्याय काय? घड्याळ विकलें हा ना?

**सावि०**—आणखी कांहीं नाहीं? तूं शेला पागोटें विकलें नसशील म्हणून कोणी म्हणावें?

**आत्मा०**—खरेंच; मला आणखी पैशांची गरज लागती तर सगळें विकलें असतें.

**सावि०**—आहा! काय चांगलें उत्तर? आणि नित्य रात्रीस बाहेर निजावें!

**आत्मा०**—एक रात्र बाहेर होतों गे ताई.

**सावि०**—आणि त्या साठीं गुरु योग्य शिक्षा करतील म्हणून पळावें!

**आत्मा०**—योग्य शिक्षा नव्हे, जुलूम करतील असें कां म्हणसना? मी अन्याय करीन तर शिक्षा करावी, उगीच शिक्षा म्हणजे? जर मीं ती शिक्षा घेतली असती तर मग मीं आपणावर काळिमा आणिली होती; आणि त्यांनीं मला अप्रतिष्ठा करून शाळेंतून काढून दिलें असतें, तर मग मला एथें तुम्हांजवळ यावयास तोंड नव्हतें.

**अंबा०**—पण भाऊ, तूं ह्याचा परिहार कसा करितोस तें सांग; आम्हांला कळलें पाहिजे; आम्ही बाबापाशीं तुझी सफाई करूं.

**आत्मा०**—तर वास्तविक गोष्ट अशी आहे—कांहीं दिवस झाले, जवळच्या गांवीं यात्रा भरणार म्हणून आमच्या शाळेंत बोलूं लागले. तेव्हां मौज पहावी, आणि हौस पुरवावी, म्हणून गुरूनें आम्हां कित्येकांस यात्रेस जावयास आज्ञा दिली.

**सावि०**—असें काय! तर मला वाटतें, घड्याळाचे आणि हितोपदेशाचे रुपये आले तितके सगळे डाळिंबें, पेरू, बर्फी, पेढे घ्यावयास खर्च झाले असतील; कांहीं दरवेशांचें अस्वल, माकडांचा तमाशा, पहायासही खर्चले असतील!

**आत्मा०**—(अंबास) मला वाटतें, माझ्या ताईला असल्या वस्तु फार प्रिय आहेत, त्यांकरितां कोणी जें मागेल तें ती देईल. मीं तसें नाहीं केलें. ऐक, मला तहान लागून माझ्या अंगाचा दाह झाला म्हणून गुजराथी ब्राम्हणाचें भांगेचें दुकान होतें तेथें निर्मळसें पाणी प्यावें म्हणून गेलों.

**सावि०**—हें तर त्याहून वाईट! कसें असो, पण तें भांगवाल्याचें दुकान तर खरें!

**आत्मा०**—ताई, तुझा स्वभाव फार कठीण गडे. माझें सगळें ऐकून तर घेशील! तेथें आम्ही बसलों असतां—

**अंबा**—(दाराकडे कान देऊन ऐकते.) घात झाला! बाबाचे शब्द ऐकूं येतात!

**सावि०**—पळ! पळ! पळ लवकर!

**आत्मा०**—नाहीं मीं मामापुढें जाऊन त्याच्या पायां पडेन, आणि त्याचें सांत्वन करीन.

**अंबा**—नको भाऊ, तसें करूं नको. तो ह्या वेळेस तुझें ऐकणार नाहीं. माझ्यासाठीं इतकें तूं करूं नको.

**आत्मा०**—तर तुझें ऐकूं?

**अंबा**—होहो! तें सगळें तुझ्या वांटचें मी करीन. (ती त्याला मागल्या दाराकडे लोटते, आणि बाहेर लावून देऊन दिवाणखान्याचें दार ढांकिते.)

---

## प्रवेश १२.

पांडुरंगराव, अंबा आणि सावित्री.

**अंबा**—आहा! बाबा, मला वाटतें तूं फिरून आलास बाहेरून.

**पांडु०**—माझें पागोटें कोठें आहे तें पाहतों; जळो तें, कोठें ठेविलें तें स्मरत नाहीं!

**सावि०**—(चोहोंकडे पाहते.) हें आहे.

**पांडु०**—तें मजकडे आणायाचें तुला सुचलें नाहीं?

**सावि०**—खरेंच, मला सुचलें नाहीं बाबा.

**अंबा**—सर्वदा चित्ताची स्वस्थता राखणारा असा विरळा.

**पांडु०**—खरेंच, तुम्हांला कामें पुष्कळ म्हणून तुमचें चित्त व्यग्र!

**अंबा**—माझ्या मनांत नुकतीच आत्मारामाची गोष्ट आली होती.

**पांडु०**—मीं काय निरंतर त्याच्या नांवाचा बोभाट आपल्या कानांनीं ऐकावा!

**अंबा**—बरें बाबा, आतां त्याची आम्ही गोष्ट बोलणार नाहीं. तूं फिरून येतोसना लवकर?

**पांडु०**—मी आतां आज बाहेरच जायाचा नाहीं. (सावित्री आणि अंबा एकीमेकींच्या तोंडाकडे पाहून मान हालवून खूण करितात कीं मसलत फसते.) आणि आतां उशीरही झाला आहे; शिवाय मला कोणीं सांगितलें कीं, माझा जुना गाडीवान खालीं आला आहे, तो मशीं बोलायास इच्छितो आहे.

**अंबा व सावि०**—काय, गणोजी!

**पांडु०**—माझें जें नुकसान व्हायाचें तें होऊन चुकलें, आणि त्याचें त्याला पारिपत्यही पुष्कळ झालें. पण आतां तो काय म्हणतो तें मला ऐकिलें पाहिजे.

**अंबा**—तूं फिरून येस तों तो हवें असलें तर थांबेल.

**पांडु०**—नाहीं नाहीं, मी त्याचें ऐकून त्याला लवकर निरोप देणार. (त्या दोघी एकीमेकींच्या कानांशीं लागतात). (अंबास) तुझा बाबा (आणि सावित्रीस) तुझा मामा, अग तुला म्हणतो तें निमूटपणें तूं तसेंच ऐकावें.

(सावित्री हळूच जावयास लागते.) पोरी, तूं कोठें चाललीस?

**सावि०**—(गोंधळून) मला खालीं कांहीं काम आहे.

**पांडु०**—बरें तर गणोजीला सांग कीं वर ये. (सावित्री जाते.)

---

## प्रवेश १३.

### पांडुरंगराव आणि अंबा.

**पांडु०**—मला त्या गरिबाची काकळूत येते. असा चांगला गाडीवान मला मिळाला नव्हता. माझे घोडे असे त्यानें तुळतुळीत ठेविले होते कीं, त्यांच्या पाठीवर रूप पहावें. तो त्यांचे दाणे चोरून कधीं दारू प्यावयास गेला नाहीं.

**अंबा**—तूं त्याला क्षमा केली असती तर आत्मारामास इतका खेद होताना.

**पांडु०**—फिरून फिरून त्याची गोष्ट काढितेस! गणोजीस काढायास आणि मला गाडीवानावांचून इतकी अडचण भोगायास तो कारण. त्याला काढल्यानंतर मला कोणीच आवडला नाहीं. त्याची जागा चालवायास मला दुसरा कोणी तसा मिळायाचाच नाहीं.

---

## प्रवेश १४.

### पांडुरंगराव, अंबा, सावित्री व गणोजी.

**सावि०**—मामा, हा गणोजी आला.

**गणो०**—महाराज, मी क्षमा मागतों. मला वाटतें कीं, आतां मजवरून आपला राग गेला असेल. प्रार्थना करितों कीं, मी आपणापाशीं धट्टाईनें आलों, आणि रुस्कत मागतों म्हणून आपल्या मनांत वांकडें येऊं नये.

**पांडु०**—मीं तुला तेव्हांच रुस्कत दिली नाहीं काय?

**गणो०**—आपण म्हटलें कीं, "हा घे तुझा रोजमुरा; माझ्या

घरून ह्या क्षणीं जा; आणि पुनः माझा उंबरा चढूं नको." तुम्हीं मला संथपणानें बोलायास किंवा रुस्कत मागायास अवकाशच दिला नाहीं.

पांडु०—तूं माझी गाडी मोडली असतां तुशीं मी अन्य रीतीनें चालावें असें कांहीं राहिलें नव्हतें. त्या वेळेस त्या आत्म्या पोराची मान मोडली असती तर भलें काम होतें.

गणो०—त्या वेळेस मग मी अबधाकलों; कांहीं बोललों नाहीं; आणि आमच्या गाडीवानाचें ज्ञान चाबकापर्यंत, पण तोच महाराज माझ्या हातून पडला तेव्हां तशी गोष्ट झाली. पण अतःपर मी फार जपून चालेन.

पांडु०—बरें, तें आतां सगळें गेलें. तूं हल्लीं काय करीत असतोस?

गणो०—महाराज, मी तुम्हांस सोडल्यापासून विपत्तिच भोगतों आहें. तुमची चाकरी सोडल्यावर मी खंडेराव शिरक्यापाशीं राहिलों. अहा, काय धनी तो! त्यानें काठी उगारल्यावांचून चाकरांशीं बोलूंच नये! तो बिचारा स्वर्गीं स्वस्थ असो!

पांडु०—तो आतां मेला तर?

गणो०—त्याच्या मरणानें त्याच्या हाताखालच्या लोकांस आनंद झाला. त्यापासून पोटभर दाणेही मिळूं नयेत, आणि सदा माराशीं गांठ!

अंबा—गणोजी, अशा धन्यापाशीं तूं कां राहिलास बरें?

गणो०—तर कोठें जाऊं बये? माझ्या बायकोस तेथें जवळच चाकरी लागली होती, म्हणून मला त्याकडे राहणें प्राप्त झालें. ती मिळवी तितक्यांत पोरांचा कांहीं चरितार्थ चाले. खंडेरावासमोर सर्व कांपत असत. त्याला मृत्यूनें मात्र कांपिवलें. सांप्रत मला चाकरी नाहीं, आणि काय करावें तें सुचत नाहीं.

**पांडु०**—पण तुला माहीत नाहीं, कीं मी कोणास विपत्ति इच्छीत नाहीं; आणि जुन्या चाकरांस तर सर्वथा नाहीं.

**गणो०**—खरेंच, मलाही तें ठाऊक आहे. पण ते भयंकर शब्द कीं, "पुनः माझा उंबरा चढूं नको" ते अजून माझ्या कानांत गुंगताहेत! खंडेरावांनीं मजवर दहा वेळ काठी उगारिली असती, तरी इतकें भय मला वाटलें नसतें!

**अंबा**—तर तेव्हांपासून तुला चाकरी नाहीं?

**गणो०**—हें पुणेंशहर नव्हे. असल्या गांवढ्यांत पोटाची पंचाईत, तेथें गाड्याघोडीं कोण ठेवितो? मी शेतावर खपें, माझी बायको हेलमजुरी करी, माझीं पोरें भीक मागत; इतकेंही करून आम्हांस पोट भरणें कठीण पडे. आम्ही भुईचें आंथरूण करूं; आणि आकाशाचें पांघरूण करूं. माझी बायको तर दुःखानें मेली.

( डोळे पुसतो. )

**पांडु०**—झालें हें सगळें ठीकच झालें; तूं मजपाशीं कां आला नाहींस?

**अंबा**—( सावित्रीस हळूच ) आतां बाबा निवळलासा दिसतो. आतां आत्मारामाविषयीं कांहीं शुभलक्षण वाटतें.

**गणो०**—अहा! महाराज, काय बायको होती! अशी चांगली बायको झाली नसेल. जेव्हां जेव्हां मी रित्या हातीं घरीं येईं, आणि उपाशीं निजायास जाईं, तेव्हां तेव्हां तिनें आपल्या भाकरींतून मला अर्धी भाकर द्यावी. जेव्हां मला राग यावा, तेव्हां तिनें मला कोमळ वचनांनीं थंड पाडावें. हाय! आतां ती मेली, ती मला जीवंत करवत नाहीं! ती मेली तेव्हांपासून माझ्या विपत्तीस आरंभ झाला; आतां शेवट कोठें होईल तो ईश्वर जाणे!

**सावि०**—अहा, गरीब बिचाऱ्या! तुझी मला दया येते.

**गणो०**—बायको मेल्यानंतर मला कोठें चाकरी मिळायाची आशा राहिली नाहीं, तेव्हां थोडे दिवसांवर, मीं आपला

मुलगा व मुलगी हातीं घेऊन रात्रीचा गांव सोडला; तो मध्यरात्रपर्यंत चालत होतों; मग एका झाडाखालीं निजलों. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं एक गांव आमच्या दृष्टीस पडला. प्रारब्धयोगानें त्या दिवशीं तेथली यात्रा होती. तेथें हेल वाहून मीं कांहीं पोटास मिळविलें; तों तेथें मला आत्माराम भेटला; तो केवळ ईश्वराचा अवतार साक्षात्! खरें सांगतों, तो तसाच आहे!

**पांडु०**—काय तो आल्या पोऱ्या! ईश्वराचा अवतार! तें चांडाळ पोर!

**अंबा** आणि **सावि०**—(पुढें होऊन गणोजीकडे आनंदानें पाहतात.) काय? आत्माराम! आमचा आत्माराम!

**गणो०**—महाराज, मला पाहिजे ती शिक्षा करा, पण त्यास वाईट म्हणूं नका. मला पायांखालीं तुडवून मारा व्हावें असलें तर!

**सावि०**—गणोजी, चालूं द्या तुमची गोष्ट.

**गणो०**—माझी धाकटी चांपी एका भांगवाल्याच्या दुकानीं भिक्षा मागावयास गेली होती; तेथें वासुदेव आणि आत्माराम दोघे बसले होते.

**पांडु०**—वाहवा! चांगला धंदा! भांगवाल्याच्या दुकानीं?

**सावि०**—नाहीं मामा, तें ब्राम्हणाचें दुकान असावें; एरवीं माझा भाऊ तेथें जाणार नाहीं.

**पांडु०**—पण त्या गांवीं जायाचें त्यांचें काम काय होतें?

**अंबा**—त्यांना गुरूनें जावयास रजा दिली असली तर? आपला गुणांचा वासुदेवही तेथें होता, ऐकिलें कीं नाहीं?

**गणो०**—त्यानें लागलेंच माझ्या मुलीस ओळखिलें; आणि वासूनें त्यास पुष्कळ वारिलें तें न ऐकून, तो तेथून उठला, आणि त्यानें पहिल्यानें माझ्या मुलीस कांहीं मिठाई आणून खायास दिली; नंतर तिला हातीं धरून चालला, आणि तिजपासून सर्व वर्तमान ऐकून घेतलें. मग तो तिला घेऊन

मजपाशां आला. मी सगळ्या दिवसाच्या मजुरीनें शोषून तेथें एकीकडे ओंजळीनें पाणी पीत होतों, तों त्याला पाहून मी हर्षानें वेडा झालों. माझ्या अंगावर चिंध्या होत्या, जिकडे तिकडे मळ लागला होता, तसाच मी त्याला उराशीं कवटाळून कडकडां भेटलों, इतका कीं, जवळ लोक होते त्यांस वाटलें कीं, मी त्या कोंवळ्या मुलास चिरडून टाकतों कीं काय! त्यासही मला पाहून मोठा आनंद झाला. मग तेथें लोकांची दाटी होती म्हणून त्यानें माझा हात धरून मला एकीकडे नेलें.

**अंबा**—बाबा, मी आतां हवी असली तर पैज मारीन कीं—

**पांडु॰**—उगी बैस पोरी! बरें, मग गणोजी?

**गणो॰**—मग आपणास सांगितलें असें त्याला मी आपलें सविस्तर वर्तमान सांगितलें. तें ऐकून त्याला रडें कोसळलें; तें कांहीं केल्या आटोपेना. तो मला म्हणाला, "गणोजी, मला क्षमा करा. ह्या सर्व विपत्ति तुम्हांस मजमुळें भोगायाच्या पडल्या; तर आतां मी प्रतिज्ञा करितों कीं, तुमचें दुःख दूर करीन तरच निद्रा घेईन." मग तो खिसा चांचपून त्यांतून लहानशी पिशवी काढून मला म्हणाला, "हे घ्या कांहीं पैसे, मजपाशीं सध्या इतकेच आहेत." मीं ते घेत नाहीं म्हटलें, म्हणून त्याला मोठा राग आला; तेव्हां मीं त्याला म्हटलें, "रावजी, तुम्हांला हे खाऊसाठीं दिले असतील; ते मीं कसे घ्यावे? मला कष्ट करायाची संवय आहे; कसेंही करून मी पोट भरितोंच आहें." असें म्हणतांच त्याला मोठा क्रोध येऊन त्यानें हातपाय आपटले, आणि मला वाटतें कीं, मी पैसे घेतोंना तर, तो मला त्या वेळेस मारता!

**पांडु॰**—पिशवींत किती पैसे होते?

**गणो॰**—सरासरी चार रुपयांचा ऐवज. त्यानें त्यांतील दोन आण्यांचा खुर्दा मात्र ठेविला. तो म्हणाला, "तुम्हीं माझ्या

मामाचे जुने आणि प्रामाणिक चाकर; तुम्हीं कांहीं चोरी लबाडी केली नाहीं; असें असतां मुलांसहवर्तमान ह्या वयांत तुम्हीं भीक मागावी; तुम्हांस रहावयास ठिकाण नसावें; तुम्हीं क्षुधेतृषेनें तळतळावें; आणि तें आम्हीं पहावें! धिक् आमचें जिणें! तर तुम्हीं आतां असें करा कीं, कोठें लहानशी खोली घ्या. तीन दिवसांच्या आंत मी आपल्या मामास लिहून उत्तर आणवितों, आणि तुमची कांहीं सोय काढितों. मामास आपण दोघांनीं रागें भरविलें खरें, पण तो दयाळू आणि उदार आहे, तो तुमची विपत्ति ऐकून कळवळेल, आणि वळेलच."

**पांडु०**—तो असें बोलला? वास्तविक?

**गणो०**—महाराज, मी शपथ करितों हवी तर.

**अंबा**—नको नको; तूं खोटें बोलणार नाहींस, माझी खातरी आहे. सांग पुढें सगळी गोष्ट.

**गणो०**—नंतर त्यानें माझ्या बेंडूस आपल्या मांडीवर बसविलें; आणि तो मला पुसतो. "तुमचीं मुलें काय करीत असतात?" मीं म्हटलें, "काय करतील? कोठें झाडाखालीं जाऊन फुलें जमा करून आणितात, आणि त्यांचे तुरे करून विकतात; नाहीं त्या वेळेस काटक्या जमा करितात; तेंही नाहीं त्या वेळेस भीक मागतात." तो म्हणाला, "छी छी छी! हें ठीक नाहीं; अशांत कांहीं जीव नाहीं. ह्यांत तीं आळशी आणि स्वच्छंद मात्र होतील. तुम्हीं मुलांस कांहींतरी एकादा धंदा शिकवा; आणि मुलीस कोठें चाकरीस ठेवा."

**अंबा**—बाबा, आत्मारामानें ह्याला हें नीट सांगितलें नव्हे?

**गणो०**—मीं म्हटलें, खरेंच पण ह्या असल्या चिंध्या अंगावर असतां ह्यांस मी कोणापाशीं नेऊं? माझ्याजवळ एक पन्नास रुपये असते तर मीं ह्यांस सोईस लावलें असतें. एथें जवळच एक खत्री आहे, तो पोरें चाकरीस ठेवीत असतो, त्यास मीं वीस रुपये दिले असतां तो बेंडूस घेईल; व

एक रंगारीण आहे ती माझ्या चांपास ठेवील; तिला अं-मळ चिरगुट पांघुरणें करून मात्र सजिवलें पाहिजे. मग माझें एकट्याचेंच राहिलें, त्यांचा भार नाहीं; मी कोठेंही कोणाची चाकरी करून पोट भरीन, असा रिकामटवळ्या-सारिखा इकडे तिकडे फिरणार नाहीं.

**पांडु॰**—आणि ह्यावर आत्मारामानें काय म्हटलें ?

**गणो॰**—त्यानें तें ऐकून मात्र घेतलें, आणि तो गेला, तो चौ-थ्या दिवशीं आला; आणि मला म्हणाला, "तो खत्री कोठें रहातो ? त्याच्याकडे मला न्या." मीं त्यास त्याच्याकडे नेलें; ते दोघे एकांतीं काय बोलले तें मला त्यानें सांगितलें नाहीं. मग मला म्हणाला कीं, "रंगारणीकडे चला." मीं तिजकडे त्यास नेलें, तेथें मला दरवाजाशीं ठेवून तो आंत गेला, आणि तिशीं कांहीं बोलला; तेंही मला त्यानें सांगितलें नाहीं. मग आम्हीं दोघे परत आलों. पांचपन्नास पावलें चालून तो उभा राहिला; आणि माझा हात धरून म्हणाला, "माझ्या मित्रा, आतां तूं मुलांची कांहीं काळजी करूं नको, मीं ह्यां-ची सोय केली." पुढें त्यानें मला एक दुकान दाखविलें, त्या दुकानदारास त्यानें अगोदरच पैसे देऊन ठेविले होते; तेथून त्यानें मला हा आंगरखा, पागोटें आणि सखलाद, अशीं देवविलीं; तीं हीं आतां माझ्या अंगावर प्रत्यक्ष आहेत—त्यांनीं मी मोठा मनुष्य दिसतों, नाहीं बरें ?

**अंबा**—( गहिंवरून ) अगा माझ्या गुणांच्या, माझ्या भल्या आत्मारामा !

**पांडु॰**—( डोळे पुसतो. ) आतां मी समजलों घड्याळ कोठें गेलें तें.

**गणो॰**—इतकेंच नाहीं महाराज. तो माझ्या खिशांत माझ्या नकळत पैसे घालीत होता तों मीं त्यास धरिलें, आणि म्हणालों, "तुझे उपकार मजवर पर्वताइतके झाले आहेत आतां मला आणखी पैसे नकोत." मग त्यास जो राग

आला तसा कधीं कोणास आला नसेल. तो मला म्हणाला, "माझ्या मामानें तुजकरितां पैसे धाडले ते तूं घेत नाहींस हें मामास कळलें तर तो काय म्हणेल?" मग मी ते घेऊन तुम्हांकडे येऊं लागलों, तें पाहून तो मला म्हणाला, "मामाची आज्ञा अशी आहे कीं, ह्यांतलें तूं कांहीं कोणाला सांगूं नये, ह्यासाठीं हें तूं मामापाशीं जरी बोललास तरी तो फार रागावेल." मीं मग आपल्या मनांत म्हटलें, "अहाहा! पांडुरंगराव असे धर्मात्मा आहेत नाहीं? तर ह्यावरून मला दिसतें कीं, मी त्यांकडे गेलों असतां ते मला माझे अपराध क्षमा करून पुनः चाकरीस ठेवितील." असें मीं मनांत आणिलें, पण तुम्हांपाशीं येऊं नये ह्याविषयीं त्यानें माझ्या पोटांत भय घातलें.

पांडु०—अहा रे माझ्या आत्मारामा! माझ्या जिवलगा आत्मारामा! तुझ्याठायीं लहानपणापासून थोरपणा आणि उदारचित्तता मी पहात आलों ती अजून तशीच आहे!

अंबा—तर शेवटीं तूं काय योजून एथें आला आहेस?

गणो०—मी आलों एवढ्यासाठीं; एथल्या लोकांचें मला एक पत्र पाहिजे, कीं मी ह्या गांवचा खरा, आणि बेंडू हा माझा मुलगा खरा. असें पत्र दाखविल्यावांचून तो खत्री म्हणतो कीं, मी तुझ्या मुलास आपल्याजवळ ठेवणार नाहीं; म्हणून मला एथें येणें पडलें. गांवांत शिरलों तों मला कोणीं सांगितलें कीं, "यशवंतरावांस एक गाडीवान पाहिजे." तें ऐकून मला असें वाटलें कीं, आत्मारामाच्या योगानें मला आतां प्रारब्धही अनुकूळ आहे; तो तसाच मी यशवंतरावांकडे गेलों, तों त्यांनीं सांगितलें कीं, "तूं मागें कोणाजवळ होतास त्यांच्या हातचें अबरूपत्र आणिलें तर तुला ठेवीन." पाहिलें तों खंडेराव तर परलोकीं गेले, तेथें माझ्यानें जाववत नाहीं; म्हणून भीत भीत तुम्हांपाशीं आलों. मनांत कीं कदाचित् तुम्हीं मला अबरूपत्र दिलें नाहीं, तरी

तुम्हीं आत्मारामाच्या हातानें जे मजवर उपकार केले त्यां-विषयीं तुमचे उपकार मानावे, आणि परत जावें.

पांडु०—नाहीं माझ्या भल्या गणोजी, तसें होणार नाहीं. आत्मारामानें जे तुजवर उपकार केले, त्यांत माझा अगदीं संबंध नाहीं. त्यानें आपणास उघडें करून तुला झांकलें; त्यानें आपण उपाशीं राहून तुला जेऊं घातलें! त्यानें पुण्य-कर्म केलें; त्याचा वांटा मी कसा घेऊं? तुझ्या योगानें तोही माझ्या कृपेस पात्र झाला; हा त्यावर तुझाही मोठा उपकार झाला. त्यास तूं आज केवढ्या संकटांतून काढिलें? होय, आज जर तूं आला नसतास, तर मीं त्याला अक्षयीं माझ्या दृष्टीवेगळें केलें होतें!

गणो०—महाराज, आपण असें म्हणतां? तर माझ्यासारखा भाग्यवान आज ह्या सृष्टींत कोणी नाहीं! काय? आत्मारामास मीं संकटांतून बाहेर काढलें! आम्हीं परस्पर परस्परांस असे कामास आलों! अहा! काय आनंदाचा दिवस आज!

पांडु०—त्या घातक्या वाशानें माझें अंतःकरण त्याविषयीं क्षोभविलें होतें. त्या लुच्चानें मला असें फार वेळ ठकाविलें. अतःपर मी त्याचा विश्वास कसा धरूं? धरणार नाहीं. पण मला शाळागुरूचें नवल वाटतें!

अंबा—कां बाबा? त्यालाही त्यानें असेंच ठकविलें नसेल कशावरून?

पांडु०—पण तो मला लिहितो कीं, आत्माराम पळाला आहे! त्यानें निराश होऊन आपल्या जिवास एकादें कांहीं केलें, किंवा तो एकाद्या संकटांत पडला तर कसें होईल!

गणो०—एक घोडा! एक घोडा! एक घोडा मात्र द्यावा; मी त्यास परत आणितों; तो द्वीपांतरीं गेला असला तरी तेथून आणीन!

सावि०—(मामाचा हात धरिते.) मामा, तूं त्याला क्षमा करिशील? तूं त्याला एक वेळ आपल्या पोटाशीं धरिशील?

पांडु०—जरी त्यानें आपलें सगळें विकलें असलें, जरी तो जन्मला तसा नागवा मजपाशीं आला, तरी मी त्यास आतां अंतर देणार नाहीं. ( सावित्री अंबास खूण करिते, आणि आपण धांवत बाहेर जाते.)

अंबा—बाबा, जर तो एथेंच कोठें असला तर ?

पांडु०—काय एथें ? त्याला कोणीं पाहिलें ? कोठें आहे तो, कोठें आहे तो ?

गणो०—अहा ! एथें जर तो आहे, एथें जर तो आहे, तर मग काय ! मग मी आनंदानें उडेन !

अंबा—बरें बाबा, तर तो तुझ्या दृष्टीस पडेल.

---

## प्रवेश १५.

### पांडुरंगराव, अंबा, सावित्री, गणोजी, आणि आत्माराम.

( आत्माराम दिवाणखान्यांत प्रवेश करून मामास साष्टांग नमस्कार घालितो; गणोजीच्या पोटांत आनंद मावत नाहीं; सावित्री आणि अंबा आनंदाश्रु टाकितात. )

आत्मा०—( हात जोडून उभा राहून ) अहा मामा ! माझ्या पूज्य मामा, तूं माझे अपराध क्षमा करिशील ?

पांडु०—क्षमा करीन. तूं मला आतां सहस्र वांट्यांनीं अधिक आवडतोस. तुला क्षमा योग्य आहे. तूं मला अतःपर सोडून जाऊं नको !

आत्मा०—नाहीं मामा, कधीं जाणार नाहीं. ( वळून गणोजीकडे पाहतो, आणि त्याचा हात धरितो. ) अहा ! जर मामा तूं ह्या गरीबाचे आणि ह्याच्या मुलांचे हाल पाहिले असते, जर ते सगळे जसे मजमुळें झाले, तसे तुजमुळें झाले असते, तर तुला किती खेद होता !

गणो०—नाहीं आत्मारामा, माझ्या हालांस मीच कारण. मीं

तुला गाडीवर कां घ्यावें ? मीं तुझ्या हातांत तापट घोड्यांच्या दोऱ्या कां द्याव्या ? पण तुझ्यासारख्या मुलास नाहीं कोण म्हणेल ? जरी ती गाडी माझ्या अंगावरून निघून जाती, तरी माझ्यानें तुला नाहीं म्हणवतेंना ! तर आत्मारामा, आतां ह्याची खूण धर; आणि आजपासून मजपाशीं नाहीं ती आळ घेऊं नको. तूं घेतली तर मी तुला नाहीं म्हणणार नाहीं, पण मग मी आपला प्राण ठेवणार नाहीं.

**पांडु०**—आत्मारामा तूं आपलें घड्याळ, पुस्तकें आणि मला वाटतें कीं चिरगुटेंही विकलीं तें मला कां लिहिलें नाहीं ? तुला ह्या वस्तूंचा उपयोग समजत नाहीं, इतका हा तुजमध्यें वेडेपणा नव्हे काय ?

**आत्मा०**—होय मामा, तें खरें; पण गणोजीच्या कुटुंबास एक क्षणभरही मीं कष्टांत पहावें, हें मला महापातक दिसलें. आणखीही तूं रागावून गणोजीस हांकून दिलें होतें, म्हणून मला भय वाटलें कीं, त्यास सहाय होण्याविषयीं तूं मला मना करिशील; आणि मग जर मी तुझी आज्ञा मोडितों तर मोठ्या टपक्यांत येतों.

**पांडु०**—काय ? तर तूं माझी आज्ञा मोडिली असती ?

**आत्मा०**—होय मामा, पण इतक्याविषयींच मात्र—

**पांडु०**—माझ्या शूर मुला, पुढें ये. मला तुझा मुका घेऊं दे! असो; पण मला पत्र आलें आहे, त्यांतील एका गोष्टीविषयीं मला अजून संशय आहे, तितका माझा फेड. तूं रात्रीस बाहेर होतास तो कोठें होतास ?

**आत्मा०**—मी गणोजीकरितां पैसे घेऊन गेलों होतों. आमचे गुरुजी त्या रात्रीस कोठें बाहेर गेले होते, म्हणून लवकरच दरवाजा लागेल हें मला ठाऊक होतें, त्यासाठीं मी लौकर घरीं यावयास निघालों तो अंधारांत वाट चुकलों.

**सावि०**—अहारे भाऊ, तर मग तुझी अवस्था काय झाली असेल ? आणि तूं कोठें निजला असशील ?

आत्मा०—मला वाटेंत एक खोपट आढळलें. तेथें दारीं एक फळ्याचा तुकडा होता, त्यावर निजलों; पण तशी झोंप मला कधीं आली नव्हती. गणोजीस सुखी करून माझ्या जिवास मोठें समाधान झालें होतें.

अंबा—अहो ! काय दुष्ट वासू तरी ! त्याला हें सगळें ठाऊक; पण त्यानें आम्हांस कळविलें नाहीं !

पांडु०—ह्या क्षणापासून मीं त्यास पाणी सोडिलें; आतां तूं माझा—

आत्मा०—नाहीं मामा, असें करूं नको ! दुसऱ्यास दुःखांत पाडून मी सुखी कसा होईन ? आणि त्यांतून तुझ्या पोटच्या मुलास !

सावि०—( त्याचा हात धरिते. ) असल्या भावास मी किती वानूं ? किती जिवाशीं धरूं ?

पांडु०—बरें तर, तो शाळेंत असेल, आणि तूं मजपाशीं ऐस. मी तुला आपल्या हृदयांत सतत ठेवीन. तुला शिकवायास गुरु पाहिजेत; ते शंभर कोसांवरून आणायाचे झाले तरी आणीन.

गणो०—( नमतो. ) माझ्या चांगल्या धन्या, तुझी वृत्ति मीं सदा सारखी पाहिली.

पांडु०—( त्याची पाठ थापटतो. ) गणोजी, तूं यशवंतरावांपाशीं वचनानें गुंतला आहेस काय ?

गणो०—मी कसा गुंतूं ? मला तुम्हांपासून रुस्कत कोठें मिळाली आहे अजून ?

पांडु०—तुला रुस्कर मिळणार नाहीं. माझी इच्छा आहे कीं, तूं आणि आत्मारामानें एका ठिकाणीं असावें, आणि एकमेकांस सुखी करावें. पण त्यास पुनः गाडीवर येऊं देऊं नको हो ! मी तुझ्या मुलांचाही सांभाळ करीन.

गणो०—( आनंदाचा उमड येऊन डोळ्यांतून आंसवें टाकितो आहे. ) माझ्या धन्या, तूं खरेंच म्हणतोस? मी हें स्वप्न

तर पहात नाहीं ? अहा ! तर प्रथम मला घोडशाळेंत जाऊन माझ्या जुन्या मैत्रांस भेटूं दे !

( सर्व जातात. )

---

## २४. जुना चाकर.

मुकुंदशेट आणि विठू.

विठू—बाबा, तूं रामजीला काढशील, तेव्हां त्याच्या जागेवर ठेवायाला मीं एक चाकर पाहिला आहे.

मुकुं०—तुला ही कामगिरी कोणीं सांगितली बरें? मी त्यास काढणार हें कशावरून ?

विठू—तर काय तूं नेहमी त्या म्हतारड्यासच ठेवणार? त्यापेक्षां मला वाटतें कीं, तरणा चाकर मोठा उपयोगीं पडेल.

मुकुं०—चांगल्या चाकरास कंटाळावें ही गोष्ट फार अनुचित! त्यास म्हतारडा म्हणतांना तुझ्या चित्तांत खाल्लें कसें नाहीं? तो माझ्या चाकरींत म्हातारा झाला. तुला त्यानें लहानाचा मोठा केलें ! तुला दुखणें येई तेव्हां तो तुझी फार काळजी वाही; तेणेंकरूनच तो लवकर म्हातारा झाला असें नाहीं कशावरून? ह्यावरून तूं पहा कीं, त्याच्या म्हातारपणाची थट्टा करावी ही किती कृतघ्नता आहे ! आणखी, हा तरी तुझा खचित निश्चय होतो कीं, तरणा चाकर त्यापेक्षां अधिक उपयोगीं पडेल ? तर ह्याविषयीं एकादा निश्चय करायास अजून तूं फार लहान आहेस; हें तुझ्याहून जाणत्याचें काम आहे. एकाद्या दिवशीं मी तुझ्या अनुभवास आणून देईन कीं, आस्थापूर्वक चाकरी करण्याविषयीं व धन्याचें हित पाहण्याविषयीं तरण्यांपेक्षां म्हातारे जास्त उपयोगी आहेत.

विठू—तूं म्हणतोस त्या अर्थी मी तें खरेंच मानितों. पण त्याचे केंस झडले आहेत; त्याला पाहिलें म्हणजे मला चिन्हच वाटतें, आणि हंसूं येतें.

मुकुं०—हें तुझ्याठायीं कांहीं प्रतिष्ठित लक्षण नव्हे मुला! मला वाटलें नव्हतें कीं, तूं असा अधम आहेस. तुला ठाऊक नाहीं. त्याला फार दिवस दुखणें लागून त्याचे केंस गेले तें? त्याची थट्टा करणें ती ईश्वराची थट्टा. त्यानें तो रोग मुळीं उत्पन्न केला.

विठू—पण तो नित्य कुरकुरतो, आणि दुर्मुखलेला असतो; दुसऱ्या चाकरांसारिखा चैनी हंसतमुख नाहीं.

मुकुं०—वयामुळें त्याच्याठायीं ती प्रौढता आहे. पण तो कुरकुरेल कशाकरतां? तो अठरा वीस वर्षांच्या पोऱ्यासारिखा चपळ नाहीं म्हणून काय तो तुला आवडूं नये? अगा मुला! असें मनांत आणतांना तुझ्या अंगास शाहरे यावे! ईश्वरानें मला फार दिवस आयुष्य दिलें असतां ह्याप्रमाणें तुं माझाही कंटाळा करिशील नव्हे?

विठू—काय तुझा? नाहीं बाबा. मी असा द्वाड नाहीं.

मुकुं०—तर रामजीचा कंटाळा करावा हा द्वाडपणा नव्हे? कांकीं तो म्हातारपणामुळें मागल्यासारिखा चपळ नाहीं म्हणून?

विठू—बाबा मीं चुकलों, मला क्षमा करा; मला आतां फार खेद झाला कीं मी—

मुकुं०—तूं उगीच कां राहिलास? तुला खेद कां झाला तें सांग.

विठू—तो माझा अन्याय जर मीं तुला सांगितला, तर तूं मला फार रागें भरशील आणि मला मारशील.

मुकुं०—मुला, तूं असें पक्कें समज मला मारायाची हौस नाहीं. मी तो उपाय तसेंच कारण पाहून एकाद्या वेळेस करितों. अन्याय झाला असतां मोठ्या ममतेनें, आणि चांगला उपदेश करून, मी तुला आणि तुझ्या बहिणीला मार्गावर आणितों. तूं अन्याय काय केला आहे तो मला ठाऊक नाहीं, म्हणून तुला मी पारिपत्य करणार नाहीं, हें माझ्यानें निश्च-

यानें कबूल करवत नाहीं. तूं काय अशी बोली करवून कबूल होणार ? छी, हें चांगलें नव्हे. तुजवर माझी ममता किती आहे हें तुला ठाऊकच आहे, तर तीवर विश्वास धरून तूं मजपाशीं कबूल व्हावें.

विठू—बरें बाबा, तर मी कबूल होतों कीं, मीं रामजीस "चोरट्या म्हाताऱ्या" असें म्हटलें.

मुकुं०—काय? तुजपासून अशी गोष्ट झाली ? त्या भल्या मनुष्यासंगतीं कसें वागावें हें तूं इतकें विसरलास? आणि ते शब्द रामजीनें ऐकिले ?

विठू—होय बाबा, म्हणूनच मला पश्चात्ताप होतो.

मुकुं०—पश्चात्ताप व्हावा हें चांगलें मुला. पण तोंडावर कोणास वाईट म्हटलें त्याचाच पश्चात्ताप व्हावा आणि पाठीमागें म्हटलें त्याचा होऊं नये, असें तुला वाटत असलें, तर वास्तविक पाहतां दोन्ही अन्याय समान आहेत.

विठू—खरें बाबा, तोंडावर किंवा मागें मी रामजीस असें म्हणूं नये; पण मीं तोंडावर म्हटलें म्हणून मला फारच खंती होते, कांकीं—

मुकुं०—तूं मजपुढें मन मोकळें करून कांहीं पुढें सांगायास इच्छितो आहेस, असें मला वाटतें. चालूं दे; गोष्ट संपीव.

विठू—होय बाबा, जेव्हां मीं रामजीस वाईट म्हटलें तेव्हां त्यानें डोळ्यांतून आसवें टाकिलीं; आणि तो म्हणाला, "मी एक तर म्हातारपणाच्या क्लेशानें पीडलों आहें, त्यांत आणखी मला मुलांनीं त्रास द्यावा; काय प्रारब्ध!"

मुकुं०—गरीब बिचारा रामजी! मला वाटतें कीं, ती गोष्ट त्याच्या जिव्हारीं लागली असावी. ह्या वयांत त्याला पोरांनीं चाळवावें, हें साहणें फार कठीण आहे. पण ज्या मुलास त्यानें बाळपणापासून ममतेनें वागविलें, असें कीं, ते त्याचे उपकार कधीं फेडितां येणार नाहींत, त्या मुलानें त्यास असें दुखवावें हें त्यास अतिदुःसह झालें असेल!

विठू—अहा बाबा, मी किती निंद्य म्हणावा, मी त्यापाशीं क्षमा मागेन; आणखी मी शपथ घेतों कीं, माझ्या कुडींत प्राण आहे तोंपर्यंत मी त्यास पुनः कधीं दुखविणार नाहीं.

मुकुं०—बरें मुला, म्हटल्याप्रमाणें वागलास तरच तुला आजचा अपराध देव क्षमा करील, आणि मीही क्षमा करीन. आपण सगळे परस्वाधीन प्राणी आहों; कामक्रोधादिकांस वश होऊन एकाद्या वेळेस अनुचित कर्म करितों; पण त्याचें वारें निघून गेल्यावर आपणांस पश्चात्ताप व्हावा, आणि गर्व सोडून झाल्या अपराधांबद्दल ईश्वरापाशीं क्षमा मागावी, आणि पुनः आपणांपासून तसा न होऊं देण्याविषयीं निश्चय करावा. पण तूं मला सांग कीं, तुला रामजीस असें म्हणायास कारण काय झालें? त्यानें तुझा कांहीं अन्याय केला होता काय?

विठू—होय बाबा, त्यानें आपणाकडून जरी नसला केला, तरी मला तसें वाटलें. मी आपला तीरकमठा घेऊन खेळत होतों, तों त्याच्या तोंडावर तीळ पाहून मीं त्यावर नेम धरिला; त्यावरून त्यानें मला म्हटलें, "खबरदार विठू; नाहीं तर मीं तुझ्या बाबास जाऊन सांगेन." त्यानें मला असें धमकावलें त्यावरून मला फार राग आला, आणि मीं त्याला शिवी दिली.

मुकुं०—तर तूं आपणाकडून त्याला दाटून दुखविलें.

विठू—तें मीं नाहीं कसें म्हणूं?

मुकुं०—तर तूं विशेष अपराधी; म्हणूनच त्याच्या डोळ्यांस पाणी आलें!

विठू—बरें तर बाबा, तूं सांगशील तर मी ह्या क्षणीं त्याकडे जाऊन क्षमा मागतों. तो ती देईपर्यंत मला चैन पडणार नाहीं.

मुकुं०—होय मुला, असल्या कामास एक क्षणही जाऊं देऊं नये; जा, जाऊन ये; मी एथें आहें. (विठू जातो आणि समाधान पावून परत येतो.)

विठू—बाबा, आतां माझें अंतःकरण मला स्वस्थता देतें; कांकीं रामजीनें मला मनापासून क्षमा केली; आणि मला वाटतें कीं, मी अतःपर असा अन्याय करणार नाहीं.

मुकुं०—ईश्वर तसें तुजकडून करवो; त्याच्या कृपेवांचून तुझा कोणताही निश्चय पार पडणार नाहीं.

विठू—त्याची कृपा व्हावयास काय उपाय करावा?

मुकुं०—त्याकरतां तूं त्यास भज, आणि त्याचें साह्य माग; तो तुला तें नाहीं देत असें कधीं म्हणणार नाहीं.

विठू—मी तें मनापासून मागेन. पण बाबा, मीं दुसरें एक तुझ्या आज्ञेवांचून काम केलें आहे; कदाचित् तुला त्याचा राग येईल.

मुकुं०—काय तें मुला?

विठू—तूं मला कोरा रुपया भेट म्हणून दिला होता, तो मीं रामजीस दिला.

मुकुं—त्यासाठीं मी रागें कां भरेन? तूं असलें काम स्वबुद्धीनें करावें, त्यांत मला समाधान आहे. तुला मीं पैसे देतों तितके तूं हवे असले तर खर्च. ते तुझे; ते तूं धर्मकृत्यांत खर्चले तर त्याहून दुसरें अधिक चांगलें कृत्य काय आहे? सांगितलें आहे कीं, आपण लहानपणापासून धर्मकृत्याचा अभ्यास ठेवावा; पण तें धर्मकृत्य आपलें सामर्थ्य पाहून आणि व्यवस्थेनें करावें, नाहीं तर धर्म तोच अधर्म होतो. पण रामजीचें आतां समाधान झालेंना?

विठू—त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु आले, ते मीं पाहिले बाबा.

मुकुं०—माझ्या मुला, मी तुला त्याविषयीं शाबासकी देतों. चांगल्या अंतःकरणाचे आहेत ते कोणासही व्यथा देत नाहींत. सर्वच सत्कर्मे आपल्या अंतःकरणांत समाधान उत्पन्न करितात; पण परोपकार करण्यांत फारच समाधान आहे.

विठू—अहा! जर ईश्वरानें कधीं मला सामर्थ्य दिलें, तर

मी आपल्या आसपासच्या गरीब लोकांचे क्लेश दूर करीन.

मुकुं०—मी भगवंतापाशीं मागतों कीं, तो हा गुण तुजमध्यें दृढ करो; आणि तो आचरायास तुला सामर्थ्य देवो.

विठू—तर मग मी सदा आजच्यासारिखेंच समाधान पावेन?

मुकुं०—हा इतका एकच आनंद कधीं विटत नाहीं. प्रथम हा तूं आपल्या घरच्या मनुष्यांवर उपकार करून भोग. जर तुझे चाकर भले मनुष्य आहेत, तर तूं त्यांशीं बरेपणानें वागून त्यांची ममता आपल्याकडे लावून घे. त्यांस कधीं-मधीं देणगीही दे. जर तूं त्यांस योग्य वेळीं आणि प्रसन्न चित्तानें ती देशील, तर ते तुझे दृढ मैत्र होतील.

विठू—पण बाबा, त्यांस रोजमुरा मिळतो नव्हे ?

मुकुं०—तो त्यांच्या चाकरीचा; त्यांत आपण कांहीं त्यांस अधिक केलें असें नाहीं. पण त्याशिवाय त्यांस कांहीं इनाम दिलें असतां त्यांची ममता आपणांवर जडते, आणि ते अधिक काम करितात.

विठू—हें कसें तें मी चांगलें समजलों नाहीं.

मुकुं०—ह्या रामजीचाच मी दृष्टांत देतों. ह्याच्या चाकरीबदल मी ह्यास अन्नवस्त्र, रोजमुरा देतों. तें घेऊन त्यानें बोली केली आहे तितकी चाकरी केली म्हणजे तें फिटलें नव्हे ? आतां तूं पहा कीं, तो घरांतल्या सर्व वस्तूंची खबरदारी ठेवितो, दुसऱ्या चाकरांची देखरेख करितो, तेणेंकरून माझा फार नफा होतो. हें तो माझ्या ममतेमुळें सर्व करितो; कां कीं मी त्याला वेतनाशिवाय आणखी देणगी देतों. तूं मोठा होशील तेव्हां तूं ज्याच्या त्याच्या तोंडानें चाकरांची कागाळी ऐकशील; तर मी तुला खरेंच सांगतों कीं, हा अन्याय धनी लोकांचा आहे; ते त्यांस भय दाखवून वागवूं पाहतात, प्रीतीनें वागवीत नाहींत.

विठू—आतां मी पक्कें समजलों; आणि माझ्या अंगावर सं-

सार पडेल तेव्हां तूं सांगतोस तसेंच मी करीन, आणि तुझ्या उपदेशाप्रमाणें वागेन.

मुकुं०—तसें केलें तर तुला त्यापासून संताप होणार नाहीं; माझ्या बाबानें मला ह्याविषयीं एक गोष्ट सांगितली आहे ती मी नित्य स्मरत असतों.

विठू—अहा बाबा, जर तुला श्रम होणार नाहीं, तर ती ऐकावी अशी माझी इच्छा आहे.

मुकुं०—तूं मजकडे अपला अन्याय कबूल केला, आणि तूं रामजीविषयीं उदारपणा दाखविला, हा तुझा भलेपणा पाहून मी संतोषानें ती गोष्ट तुला ऐकवितों.

"दमाजीराव म्हणून कोणी सरदार होता. तो सरकारचाकरींत म्हातारा झाला, तेव्हां तो आपल्या इनाम गांवावर येऊन राहिला. त्याची बायको मोठी पतिव्रता होती; व त्यास पांच मुलें होतीं, तीं आईबापांच्या आज्ञेंत तत्पर होतीं. त्याचा थोरपणा, त्याचा गोड स्वभाव, त्याच्या घरांतील स्थितिरीति पाहुन, त्या गांवचे सर्व लोक, व त्याचे ओळखीदेखी त्यास मानीत. असें तें सुखी कुटुंब जो पाही त्याचा आत्मा समाधान पावे. उमेदवार माणसें त्याच्या चाकरीस रहायाची इच्छा करीत. त्याचा कोणी चाकर मेला किंवा गेला असतां, त्याच्या जागेवर रहावयास उड्या पडत. त्याच्या चाकरांच्या तोंडावर सर्वदा आनंदवृत्ति दिसावी; जसें कोणी म्हणेल कीं, ते त्याचीं लेंकरें आहेत, चाकर नव्हेत. त्यानें आज्ञा करणें त्या नीतियुक्त, जशा ज्याच्या शक्तीस योग्य, तशा कराव्या. तेणेंकरून कोणाच्या मनांत कधीं त्याची अवज्ञा करावी, अशी कल्पना आलीच नाहीं. त्याच्या घरीं चाकरांत परस्पर भावांप्रमाणें गोडी होती. कधीं त्यांमध्यें बोलाचाली झाली, तर धन्याची चाकरी अधिक कोण बजावतो, आणि त्याच्या हितास अधिक कोण जपतो, ह्याविषयीं मात्र व्हावी. जाधवराव शिंदे दमाजीचे जुने मित्र, हेही दमाजीसारिखे चा-

करी सोडून आपल्या इनाम गांवीं रहात होते. ते एके दिवशीं त्याच्या घरीं आले. तेव्हां गोष्टींवरून गोष्ट निघतां, जाधवरावांनीं गोष्ट काढिली कीं, 'मी दुसऱ्या सर्व गोष्टींत सुखी आहें, परंतु माझ्या चाकरांविषयीं बेजार आहें; मला त्यांविषयीं जपतांना पुरे झालें आहे. जो चाकर पहावा तो आळशी, बेअदब, आणि कुचर आढळतो.' दमाजी त्यास ह्मणाला, 'तेवढ्याविषयीं मी सुखी आहें. आज दहा वर्षें झालीं, मला असें स्मरत नाहीं कीं, मला कोणीं रंजीस केलें. मी त्यांविषयीं समाधान पावतों; आणि तेही मजविषयीं समाधान पावतात.' जाधवराव म्हणाले, 'असेल, पण असें विरळा आढळतें. त्यांस चांगलें ठेवण्याविषयीं किंवा चांगलें करण्याविषयीं तुम्हांस कांहीं युक्ति ठाऊक असावी.' दमाजी ह्मणाले, 'युक्ति सोपी आहे; ही पहा तुम्हांस दाखवितों.' असें म्हणून त्यांनीं एका पेटीकडे बोट केलें. त्यांस जाधवराव म्हणाले, 'मी समजलों नाहीं.' त्यावर त्यांनीं कांहीं उत्तर न करितां पेटी उघडून दाखविली. त्यांत सहा खण होते. एकएकावर हें लिहिलें होतें—अधिकोत्तर खर्च—माझा व बायकोचा खासगत खर्च--माझ्या कुटुंबाचा—माझ्या मुलांचा—चाकरांचा—देणगीचा. दमाजी म्हणाले, 'मी आपल्या कुळांपासून एक वर्षाचे रुपये अगाऊ वसूल करितों त्यांचे सहा वांटे करितों. पहिल्या खणांत वांटा घालतों तो अदृष्ट खर्चास ठेवितों; त्यास तसें प्रयोजन पडतें तेव्हांच हात लावितों. दुसऱ्यांत जें घालितों तितक्यांत मी आपला व बायकोचा खर्च ठेवितों. तिसऱ्यांत कुटुंबाच्या पोटाचा खर्च; चवथ्यांत मी आपल्या मुलांच्या विद्याभ्यासाचा खर्च; पांचव्यांत चाकरांचा मुशारा; सहाव्यांत त्यांस किंवा दुसऱ्या कोणास देणगी, धर्मादाय वगैरे खर्च भागवतों. ह्या शेवटल्या खणामुळें मला चाकरांपासून सुख आहे. मुशाऱ्यांत ते बोलीप्रमाणें चाकरी करितात; पण ज्यांची बोली केली नाहीं अशीं कामें आहेत तीं,

ते देणगीच्या लोभानें जीव लावून आणि माझ्या आज्ञेपेक्षांही अधिक करितात."

---

## २५. परशुराम आणि कृष्णी.

एके दिवशीं उन्हाळ्यांत, गोपाळराव ह्यांनीं आपल्या परशुराम आणि कृष्णी अशा दोन्ही मुलांस कबूल केलें होतें कीं, मी तुह्मांस आज संध्याकाळीं आपल्याबरोबर एक चांगला बाग गांवाबाहेर जवळच आहे तो पहायास नेईन. मग संध्याकाळ झाला तेव्हां ते माडीवर पोशाग करावयास गेले; मुलें खालीं होतीं. परशुरामास आतां आपल्या दृष्टीस मोठी मौज पडेल म्हणून जो आनंद झाला, तो ब्रह्मांडीं मावेना! तो नाचूं उडूं लागला; इकडून तिकडे आणि तिकडून इकडे धूम खेपा घालितो आहे, आणि मोठ्या तयारींत आहे; इतक्यांत बापानें तेथें एक फुलझाडाची कुंडी आणून ठेवली होती, त्या झाडाच्या फुलास त्याच्या शेल्याचा झपाटा लागून तें डांगळीपासून तुटून पडलें. तें हातांत घेऊन त्यास कृष्णी म्हणते, "अगा भाऊ! हें तूं काय केलें?" तिच्या हातांत फूल होतें, इतक्यांत गोपाळराव वरून खालीं आले. त्यांनीं रागें भरून कृष्णीस म्हटलें, "मुली मीं इतक्या श्रमानें हें फूल राखून ठेविलें होतें कीं, त्यापासुन बीं प्राप्त व्हावें; तें तूं असें तोडावेंना?" ती कांपत कांपत म्हणाली, "माझ्या बाबा, कृपा करून तूं मजवर रागावूं नको." गोपाळराव अंमळ थंड होऊन म्हणाले, "मुली, मी रागें नाहीं भरलों, पण आतां आपण दुसऱ्याच्या बागांत जाणार, तेथेंही तुला अशींच फुलें तोडायाची इच्छा होईल; म्हणून मी तुला बाहेर नेत नाहीं; ह्याविषयीं तुला वांकडें वाटूं नये."

कृष्णी खालीं पाहूं लागली, आणि स्तब्ध उभी राहिली. तें पाहून परशुरामाच्यानें उगीच राहवलें नाहीं. तो डोळ्यांत आसवें आणून बापापाशीं गेला, आणि म्हणाला "बाबा, तो माझ्या

---

१ डहाळी.

ताईचा अन्याय नव्हे; तें फूल मीं तोडलें, म्हणून मला घरीं ठेव आणि ताईस बरोबर ने."

तीं मुलें अशीं समजुतदार पाहून, आणि त्यांची परस्परांविषयीं ममता पाहून गोपाळरावांस दया आली; त्यांनीं त्यांस पोटाशीं धरिलें, आणि ते म्हणाले, "तुम्ही दोघेंही माझीं आवडतीं; दोघेंही मजबरोबर चला."

मग परशुरामास आणि कृष्णीस जो आनंद झाला, तो काय सांगावा! तीं बापाबरोबर त्या बागांत गेलीं. त्यांत त्यांनीं नानाप्रकारचीं झाडें पाहिलीं. तेथें कृष्णी आणि परशुराम आपआपलीं चिरगुटें आटोपून बागांतून चालताहेत, तें पाहून गोपाळरावांस समाधान वाटलें. त्यांचें फूल त्यांनीं नासलें तें असतें तर त्यापासून त्यांना संतोष झाला असता खरा; परंतु त्या प्रसंगीं त्या बहीणभावंडांमध्यें परस्पर प्रीति, त्यांची निर्द्वेषता व शहाणपण पाहुन, त्यांस त्याहून सहस्रगुणित आनंद झाला.

---

## २६. हट्टी मुलगी.

मुलांनो, ज्या तुम्हां कोणास वाईट गुणाची खोड लागली असेल, त्या तुमच्या सुखासाठीं मी ही पुढची गोष्ट सांगतों; त्यांत तुमच्या लक्ष्यांत येईल कीं, एक वेळ जर मनाचा दृढनिश्चय केला तर भलती लागलेली खोड टाकायाचें अवघड पडत नाहीं.

" चंद्रु म्हणून एक मुलगी होती. ती सात वर्षेंपर्यंत आपल्या आईबापांचा केवळ जीवप्राण होती. ह्या वयास मनुष्याच्या ज्ञानाचा उदय होऊं लागतो; आणि त्याला बरें वाईट समजूं लागतें; पण चंद्रूच्याठायीं तें उलटें झालें. तिला जी एक द्वाड खोड लागली त्यास दृष्टांत एक कुत्र्यावांचून दुसरा कोठचा मला दिसत नाहीं. जसें एकादें पिसाळलेलें कुत्रें गुरगुरतें,

आणि ज्याच्या त्याच्या अंगावर तुटून पडून चावे तोडावयास जातें तसें कोणीं चुकून तिच्या खेळण्यास हात लावला तर तिनें त्याकडे कुशीस वळून पहावें, आणि एक घटिकापर्यंत दांतओंठ खावे. एकाद्या अन्यायासाठीं तिला कोणीं हळूच जरी धमकाविलें, तरी तिनें लागलेंच उसळावें; हातपाय आपटावे; आणि रागानें आसपासचे पदार्थ भुईवर फेंकावे. तिचा बाप, तिची आई, व सगळीं घरचीं माणसें, तिला कंटाळलीं. कोणी आपणास जवळ उभें करीत नाहीं, आईबापही आपला तिरस्कार करितात, म्हणून तिला एकाद्या वेळेस पश्चात्ताप होई, आणि ती डोळ्यांतुन आसवेंही गाळी; पण सवई पडतां पडतां मग तिला तो खेद होईनासा झाला; आणि तिचा द्वाड स्वभाव दिवसानुदिवस दृढ होत गेला. एकदा दिवाळीच्या दिवशीं तिनें आपल्या आईस एक भरलेली टोपली पदराखालीं झांकून खोलींत नेतांना पाहिलें; तेव्हां ती तिच्या मागून खोलींत घुसूं लागली. तों तिच्या आईनें तिला ढकलून मागें सारिलें. त्या समयीं तिला झटका येऊन जो तिनें अनर्थ केला, आणि रागानें दाराची फळी जी हापटली, त्यामुळें तें सगळें घर दणाणलें. मग एक घटिका जाऊं देऊन तिच्या आईनें तिला बोलावून नेलें. त्या समयीं खोलींत जाऊन तिला फार विस्मय झाला. जिकडे तिकडे दिवे उजळले आहेत; आणि नानाप्रकारचीं चांगलीं चांगलीं खेळणीं खोलीभर मांडून ठेविलीं आहेत. असें पाहून ती चकित झाली, आनंदानें तिच्या तोंडावाटे एक शब्द निघेना! तिची आई तीस म्हणाली, "चंद्रू इकडे ये, आणि ह्या चिठीवर काय लिहिलें आहे हें वाच." त्या खेळण्यांत एक चिठी होती, ती चंद्रूनें हातीं घेऊन वाचली; तों त्यांत मोठमोठाल्या अक्षरांनीं हें लिहिलें होतें:–'हीं खेळणीं जी मुलगी चांगली गुणांची तिला ठेविलीं आहेत.'

चंद्रू लाजून खालीं पाहूं लागली, एक शब्द बोलेना. तिला तिच्या आईनें विचारिलें, 'कां मुली, हीं कोणासाठीं आहेत

बरें?' ती डोळ्यांत आसवें आणून म्हणाली, 'हीं माझ्यासाठीं नव्हत बये.'

'बरें तर, ती दुसरी चिठी आहे, पहा तींत कांहीं तुझें आहे का?'

चंद्रुनें ती हातीं घेऊन वाचिली. तींत 'जिला आपले द्वाड गुण समजत आहेत आणि जी दुसरी दिवाळी येईपर्यंत ते नीट करायास इच्छिते त्या हट्टी मुलीचीं हीं आहेत,' असें लिहिलें होतें. ती वाचून चंद्रुस रडें कोसळलें; तिनें आईच्या गळ्यास मिठी मारली, आणि म्हणाली 'अहा बये, ही मी! ही मी!' त्या वेळीं आनंदीबाईसही गहिंवर आला. कांहीं मुलीचे द्वाड गुण स्मरून व कांहीं तिचा पश्चात्ताप पाहून, कांहीं पळें गेल्यानंतर ती चंद्रुस म्हणते, 'घे मुली हीं तूं, तूं बरे गुण धरण्याविषयीं निश्चय केला, तो तुझा ईश्वर पार पाडो!'

चंद्रू म्हणाली, 'नाहीं बये; ह्या वेळेस हीं सगळीं पहिल्या चिठींतल्या मुलीचीं आहेत. तर आतां हीं मी तशी होईपर्यंत असूं दे.' हें उत्तर ऐकून आनंदीबाईस बहुत समाधान वाटलें. तिनें तीं सगळीं खेळणीं एका पेटींत घालून, तीस कुलूप घालून, ती चंद्रुस म्हणाली, 'मुली, घे ही किल्ली तुझ्या स्वाधीन, आणि तुला जेव्हां वाटेल कीं, आतां मी हीं घ्यावयास योग्य आहें, तेव्हां पेटी उघड.'

ह्या गोष्टीस दोन महिने लोटले. तितक्या काळांत चंद्रुस कधीं झटका आला नाहीं. एके दिवशीं तिनें आईच्या गळ्यांत हात घालून पुसलें 'बये, मी आतां ही पेटी उघडूं?' आनंदीबाईस प्रेमाश्रु येऊन ती तीस म्हणाली, 'होय माझे जिवलगे, उघड आतां. पण मला आधीं सांग कीं, तूं आपला स्वभाव नीट करायास काय उपाय केला?' चंद्रू म्हणाली, 'त्याविषयीं मला मोठे प्रयास पडले; मी नित्य आपल्या मनांत ती गोष्ट घोळीं. पण सकाळसंध्याकाळीं देवाची प्रार्थना करीं कीं, हे देवा, माझा निश्चय चळूं देऊं नको!' तें ऐकून आनंदीबाईस किती आनंद

झाला, तो वर्णवत नाहीं! मग चंद्रू त्या सर्व खेळण्यांची धनीण झाली; आणि आपल्या आईचा प्रेमा तिनें आपणाकडे संपूर्ण ओढून घेतला.

एके दिवशीं आनंदीबाईकडे एक मुलगी आली होती, ती अशीच हट्टी होती. तिच्यासमक्ष आनंदीबाईनें चंद्रूची गोष्ट सांगितली. ती ऐकून त्या मुलीस जो पश्चात्ताप झाला तेणेंकरून तिनेंही चंद्रूप्रमाणें आपले द्वाड गुण सोडायाचा, आणि तीप्रमाणें सर्वांस आवडती व्हावयाचा निश्चय केला. तिलाही तसेंच फळ प्राप्त झालें. ह्याप्रमाणें आपल्या आचरणानें चंद्रूनें दुसऱ्यांस बरे गुण लावले. तेणेंकरून ती अधिक सुखी झाली."

---

## २७. आशाभंग.

एका आदित्यवारीं प्रातःकाळीं, अमृतराव बापाबरोबर माहिमास मौज मारायासाठीं जावयास सजून तयार झाला होता. तेथें जायाचें तें पूर्वी पंधरा दिवस त्याच्या मनांत सर्वदा घोळत होतें. तो लवकर निजून उठत नसे, तो त्या दिवशीं कोंबडेआरवणीं उठला. त्यानें घरच्या सगळ्या माणसांस उठविलें, गाडीवानास ताकीद केली, आणि आपण न्हाऊन धुऊन सिद्धतेंत आहे, इतक्यांत अकस्मात् आकाश काळें झालें; अभ्रें दाट आलीं; मोठा वारा सुटला; त्यानें सर्व झाडें डोलूं लागलीं; आणि चोहोंकडे धुळीनें दिशा धुंद झाल्या. अमृतराव क्षणक्षणा अंगण्यांत जाऊन आकाशाकडे पाही; फिरून माडीवर जाई; तो तीन तीन पायऱ्या उडे; आणि आपला बाप सोकरजी ह्यास धीर देई कीं, "बाबा, कांहीं चिंता नाहीं, हें आतां सगळें जिकडे तिकडे जिरेल, आणि दिशा निर्मळ होतील. मला वाटतें कीं, आपण निघालों तरी चिंता नाहीं."

सोकरजीनें मुलाचीं भविष्यें ऐकून तसें केलें नाहीं. तो म्हणाला, "बाबा, अंमळ वाट पाहिली पाहिजे." इतकें म्हणतो आहे तों विजा कडकडूं लागल्या; आणि मोठा पाऊस कोस-

ळला. तेव्हां अमृतरावास पस्तावा जो झाला तो सांगतां येत नाहीं! तो म्हणाला, "हा जळला आजच कशास आला पाऊस!" संध्याकाळचा प्रहर दिवसपर्यंत पाऊस पडून मग जिकडे तिकडे निरभ्र झालें, आणि ऊन पडलें; झाडें पानें सगळीं टवटवीत दिसूं लागलीं. मग अमृतराव बहुत दिक्क होऊन राहिला होता, तो अमळ हुशारींत आलासा पाहून, बापानें त्यास महालक्ष्मीपर्यंत बाहेर फिरायास नेलें. तेव्हां हवेची स्वच्छता पाहून, पक्ष्यांचे शब्द ऐकून, जिकडून तिकडून सुगंध येतो आहे तो घेऊन त्याच्या हृदयास समाधान झालें. त्यास सोकरजी म्हणतो, "पाऊस पडल्यानें सर्वत्र काय फेरफार झाला तो तूं पाहिला ना? कालच जिकडे तिकडे धुंद कसें दिसत होतें? ऊष्मा काय होत होता? सर्व व्याकुळ कसें झालें होतें? इतकी जिकडे तिकडे टवटवी दिसायाचें काय कारण बरें?"

अमृतराव म्हणाला, "आजचा पाऊस."

"तूं तर पाऊस भरून आला म्हणून सकाळीं चडफडत होतास!" त्यास ते शब्द बापानें उच्चारतां बहुत जाचले; तो लज्जित झाला. त्या वेळेस बापाच्या लक्ष्यांत आलें कीं, ह्यास ही गोष्ट समजली कीं, ज्यांत बहुतांचें कल्याण, ती गोष्ट आपलें अकल्याण होऊनही झाली, तरी चांगली. ती करायाची आपल्या वांट्यास जरी आली, तरी मोठ्या हौसेनें करावी, चडफडूं नये.

---

## २८. अंतिक.

### नाटक एक अंकी.

पात्रें.

श्रीपतराव ... (राजा) विजयी होऊन आपल्या राजधानीस आला आहे.

---

१ खजिल.

सगुणाबाई ( शिरकी )...सरपाग्याची स्त्री.
दलपतराव.........सरशिलेदार—तिचा भाऊ.
हरबाजी.........गाड्यांचा नाईक-तिचा वडील मुलगा.
शामराव.........अंतिक—तिचा धाकटा मुलगा.
शाळागुरु.
खिजमतगार.

स्थळ, राजाचा वाडा.

---

## प्रवेश १.

(राजा आपल्या महालांत मंचकावर निजला आहे. त्याच्या बाहेरच्या खोलींत अंतिक एका बांकावर निजला आहे.)

राजा ( पहांटेस उठतो ).

आहा! आज मला निद्राशी वाटली. ह्याला स्वस्थपणाचें सुख म्हणावें. एथें बांके, नौबती ह्यांचा उपद्रव नाहीं. (तो घड्याळ पहातो.) काय! वीस घटिकाच रात्र गेली? नाहीं अधिक गेली असावी, मला वाटतें कीं, मी बारा तासांवर निजलों. अंतिका! अरे अंतिका!

अंतिक—(अर्धा जागा उसळून बसतो, आणि पुनः पडतो.) आं! कोण हांक मारतें? येतों.

राजा—तिकडे कोणी आहे कीं नाहीं रे? काय, कोणी बोलत नाहीं?

अंति०—(कुशीस वळतो आणि जांभई देतो.) आहा! काय झोंप लागली होती!

राजा—कोणी बोलत आहेसें मी ऐकतों. कोण आहे तें? (तो उठून दिवा फिरवितो आणि पुढें जाऊन अंतिकास पाहतो.) काय, हें मूल एथें एकटेंच! ह्यानें माझी चवकी करावी कीं मीं ह्याची? ह्या खिजमतगारांच्या ज्ञानास काय म्हणावें?

अंति०—(अर्धा जागा होऊन उठतो आणि डोळे चोळतो.) महाराज!

राजा—ऊठ ऊठ मुला, तुझ्या घड्याळांत किती वाजले आहेत तें सांग; माझें बंद झालें.

अंति०—(बांकास धरून उभा राहतो; अर्धा निजेंतच आहे.) आं! काय महाराज ?

राजा—( हंसतो. ) तूं अजून निजेंतच आहेस मुला ? अहा! काय तोंड ! असें चित्र काढलें तर फारच चमत्कारिक दिसेल! मुला, तुझ्या घड्याळांत किती वाजले ते सांगशील?

अंति०—( डाळे चोळतो. ) घड्याळ महाराज ? मला क्षमा करावी; मजजवळ घड्याळ नाहीं.

राजा—तूं निजेंत बोलतोस कीं तुझ्याजवळ खरेंच घड्याळ नाहीं ?

अंति०—माझ्याजवळ कधींही घड्याळ नव्हतें.

राजा—नव्हतें ? तुझ्या बापानें तुला एथें घड्याळावांचून पाठविलें ? तुझ्या सारिख्याजवळ तर घड्याळ अवश्य असावें !

अंति०—माझा बाबा ! आहा ! जर तो जिवंत असता–

राजा—तुला बाप नाहीं तर ?

अंति०—मी जन्मास आल्याच्या आधींच तो मेला. मी त्यास पाहिलें नाहीं.

राजा—बाप नाहीं तर आणखी कोणी तुला वडील असावें, त्यानें किंवा तुझ्या आईनें तुला घड्याळ द्यावें.

अंति०—माझी आई महाराज ? अहा ! ती तुह्मांस ठाऊक नाहीं ! ती फार दरिद्रानें पीडिली आहे; तिजजवळचें सगळें मजकरितां तिनें खर्च केलें; घड्याळ घ्यावयास तिजपाशीं पैसे नाहींत.

राजा—आणखी कोणी तुझें वडील आहे कीं नाहीं ?

अंति०—माझा मामा आहे, महाराज.

राजा—(हंसतो ) जगांत मामा फार आहेत; पण तुझ्या मामाचें नांव काय ?

**अंति०**—तो आपल्या हुजूरपागेवर असतो.

**राजा**—खरें, मला स्मरलें; त्यानेंच तुला मजपाशीं आणिलें नव्हे ! आतां माझ्या मुला, तूं ही मेणबत्ती घे,आणि समोरच्या खोलींत जा; तेथें आरशाच्या दोहों बाजूंस दोन घड्याळें टांगलीं आहेत, त्यांतून उजवेकडचें आण; खबरदार मेणबत्तीची ज्योत कशास लावून घर पेटविशील नाहीं तर—जलदी कर !

**अंति०**—होय महाराज. ( जातो. )

---

## प्रवेश २.

### राजा.

काय चांगला मुलगा आहे ! काय त्याची सरलता ! अशी एकाद्या थोर मनुष्यांत असती, आणि तो मनुष्य जर माझा मित्र असता तर काय पाहिजे होतें ? पण हा लहान फार, मला ह्याचा उपयोग नाहीं; मी ह्याला ह्याच्या आईपाशीं पाठवितों.

---

## प्रवेश ३.

### राजा आणि अंतिक.

**अंति०**—( एका हातांत मेणबत्ती आणि दुसऱ्या हातांत घड्याळ घेऊन ) महाराज, तीन घटिका रात्र आहे.

**राजा**—तर माझा तर्क खोटा नव्हे; आतां लवकरच उजाडेल. (अंतिकाकडून घड्याळ हातीं घेऊन ) पण मीं तुला आणायास सांगितलें तें हें नव्हे; हेंच उजवेकडे होतें ?

**अंति०**—हेंच उजवेकडे होतें.

**राजा**—बरें तर हेंच जरी होतें तरी, जर तुला आपलें हित समजतें, तर दुसरें आणितास; कांकीं हें हिरेजडित आहे, तुझ्यासारिख्या मुलास बाळगायास योग्य नाहीं पण हें तूं लोभानें आणिलें असशील; अथवा जे अधिक आशा करून

सगळेंच गमावितात, त्यांसारिखें करायास गेला असशील. मला खरेंच सांग.

अंति०—महाराज काय बोलतात तें मी समजलों नाहीं.

राजा—तर तुला समजवितों. तुला डावें उजवें काय तें समजतें ?

अंति०—( फिरफिरून एका हाताकडे पाहून दुसऱ्या हाताकडे पाहतो. ) डावें आणि उजवें महाराज ?

राजा—( त्याची पाठ थापटतो. ) बरें मुला, तें असो. जा धांव, पहिल्यानें आपल्या मामास एथें बोलावून आण.

---

## प्रवेश ४.

राजा.

काय भलें, काय मनोहर मूल आहे हें ! हेंही मला दुसरें कारण होतें कीं, ह्यास ह्याच्या कुटुंबांत पाठवावें; कांकीं राजदरबार हें बुद्धिभ्रष्ट व्हावयाची जागा, एथें राहून ह्यानें बिघडूं नये. खरेंच, मी ह्यास ह्याच्या घरीं पाठवीन तें चांगलें; पण जर ह्याची आई फार गरीब आहे, ह्याचें संरक्षण तिच्यानें करवत नाहीं, तर ह्यानें कोठें जावें ? मी प्रथम ह्या गोष्टीचा शोध करितों. बरें, दलपतराव मला सर्व सांगतील.

---

## प्रवेश ५.

राजा आणि अंतिक.

अंति०—( येऊन सांगतो. ) माझा मामा येतो आहे महाराजांपाशीं.

राजा—तूं असा कां ? सुस्त दिसतोस ? तुला काय झोंप येते मुला ?

अंति०—होय महाराज; येते आहे खरी अमळ.

राजा—तर जा पुनः आपल्या बांकावर नीज. मी तुझ्या-

एवढा लहान होतों, त्या वेळेस मला नीज किती गोड लागत होती, तें मला ठाऊक आहे. जा स्वस्थ नीज, मी तुला आज्ञा देतों. (अंतिक जाऊन बांकावर निजतो.)

---

## प्रवेश ६.

राजा, दलपतराव, आणि अंतिक.

(बांकावर अंतिक निजला आहे.)

दल०—महाराज, आपला सेवक.

राजा—या, आंत या दलपतराव; कां मीं तुम्हांकडे लहान बोलावणेकरी पाठविला होता तो कसा आहे? तो माझ्या हुजूर चाकरीस उपयोगीं आहे ना?

दल०—(गाल खाजवितो.) खरें महाराज, तो अमळ लहान खरा.

राजा—अथवा घोड्यावर स्वार होऊन माझ्या कामगिरीस जावयास?

दल०—मग तो परत येईल कशास!

राजा—अथवा मजजवळ एथें रात्रीस चौकी करायास?

दल०—(किंचित हंसून) होय, जर महाराज जागे असणार नाहींत तर.

राजा—तर पहा कीं, मीं ह्या मुलाला काय करावें? कांहीं नाहीं हें स्पष्ट दिसतें. तर असा मुलगा जो तुह्मीं मजपाशीं आणिला, त्यानें माझी चाकरी करावी, ह्या अर्थावर आणिला नाहीं; मीं त्याचा भाग्योदय करावा, ह्यासाठीं आणिला मला वाटतें. तुह्मीं सांगितलें कीं, ह्याच्या आईच्यानें ह्यास पाळवत नाहीं; ती काय इतकी दरिद्रानें पीडली आहे? खरेंच सांगा.

दल०—(छातीवर हात देऊन) होय महाराज; ह्यांत असत्याचा लेश नाहीं.

राजा—कोणत्या कारणामुळें बरें?

दल०—ह्या मागच्या लढाईमुळें. ह्या लढाईंत कितीएक भाग्यवान झाले; कितीएक धुळीस मिळाले. ह्याच्या आईचें काय जें होतें, त्यांतलें कांहींच राहिलें नाहीं; वस्तुमात्र लुटू-न, जाळून, पोळून, फोडून, तोडून फस्त झालें. त्यावर आणखी तिच्यामागें पंचाईती भांडणाच्या लागल्या; कांकीं लढाईमागून त्या येतातच, जशी दुष्काळामागें जरीमरी; पण इतक्या गोष्टीनें मात्र ती दैववान आहे कीं, तिचीं मुलें सोईस लागलीं आहेत. धाकटा हा, तुमचा अंतिक आहे; व मोठ्याची गाड्यांत असामी आहे. आतां ती आपले कसेही दिवस काढील.

राजा—महाविपत्तीनें काढील ह्यांत भ्रांत नाहीं.

दल०—खरें महाराज. ( अमळ उदासीनपणानें ) ती एका गांवढ्यांत जाऊन राहिली आहे; तेथें एकटीच असते. मी तिजकडे जात नाहीं. मी तिचा भाऊ, तिची विपत्ति मा-झ्यानें पाहवत नाहीं.

राजा—तुम्ही तिचे भाऊ प्रत्यक्ष ?

दल०—होय महाराज, भाऊपणा दैवीं आला आहे खरा.

राजा—( त्यास धिक्कारून ) दैवीं आला आहे ? आणि तुम्ही तिला भेटायास जात नाहीं ? मी समजलों रावजी. तिची विपत्ति पाहून तुम्हांस लाज वाटेल, आणि कदाचित तुमच्या मनास वाईट वाटलें तर तुम्हांवर कांहीं खर्च पडेल. (दलप-तराव घाबरतात. ) तुमच्या बहिणीचें नांव काय ?

दल०—सगुणाबाई शिरकी, महाराज.

राजा—( विचार करितो. ) सगुणाबाई शिरकी ? रणधीर-राव शिरके आपल्या लष्करचे सरपागे होते नव्हे ?

दल०—होय महाराज.

राजा—ते पहिल्या लढाईंतच पडले नव्हे ?

दल०—खरें, ते ह्या मुलाचे बाप महाराज. बहुत सचवटीचे मनुष्य, आणि मोठे शिपाई होते. ते हल्ल्यास गेले, तेव्हां

जसें कोणी म्हणेल कीं, मेजवानीस जाताहेत. त्यांना सिंहाची छाती होती.

राजा—मला त्यांचें चांगलें स्मरण आहे; आणि मी इच्छितों कीं—

दल०—( जवळ जातो. ) महाराज काय इच्छितात?

राजा—त्यांच्या बायकोशीं बोलावें.

दल०—आज्ञा झाली तर तें ह्या क्षणीं करितां येईल. ती शहरांत आहे.

राजा—ती एथें आहे? आणवा तिला; लवकर तिला एथें येऊं द्या. मी तिशीं बोलून तिचें मुलगें तिच्या स्वाधीन करणार—

दल०—महाराज—

राजा—तुम्ही तें मला सांगूं नका; जा लवकर. ( तो बाहेर जातो. )

---

## प्रवेश ७.

### राजा आणि अंतिक ( निजलेला. )

राजा—काय! तिची अशी दशा झाली! केवढा अनर्थ हा! ह्या लढाईमुळें किती लोक विपत्तींत पडले असतील! इतकें बरें आहे कीं, मीं होऊन लढाई उद्भविली नाहीं. गत्यंतर नाहीं म्हणून मला तलवार धरणें प्राप्त झालें. ( तो उठतो आणि अमळ इकडून तिकडे फिरून अंतिकाच्या बांकापाशीं उभा राहतो. ) सुखकर मुलगें! कसें स्वस्थ निजलें आहे! जसें कोणी म्हणेल समाधि लागली आहे! हा आपल्या मनांत समजत असेल कीं, मी आपल्या आप्ताच्या घरीं आहें; मला एथें कोणाची अडचण नाहीं. अहा! केवळ सरळ भाव तो हा! ( पुनः फिरतो. ) ह्याची आई, ती जर दलपतरावासारिखी असली तर मला तिचें कांहीं मनास आणायास का-

रण नाहीं. पण प्रथम तिचा स्वभाव ओळखायास मी तिला आधीं कसून पाहीन; आणखी मग—मग मला काय कर्तव्य तें करीन. (तो बांकाशीं ओणवून मुलाकडे न्याहळून पाहतो, तों त्याच्या खिशांतून किंचित बाहेर निघालेलें एक पत्र त्याच्या दृष्टीस पडतें.) पण हें काय आहे? (तो पत्र उघडतो आणि लिहिणाराचें नांव वाचतो, तों सगुणाबाईची सही पाहून म्हणतो.) हें ह्याच्या आईनें पाठविलें आहे. मी वाचूं हें? कांकीं मी तिचें स्वरूप जाणायास इच्छितों. ती आपल्या लेंकराशीं कृत्रिम करणार नाहीं; बरें पाहूं या. (तो वाचितो)

" अनेक आशीर्वाद विशेष—

" तुझ्यासारख्या मुलानें एरवीं पत्र लिहिणें अवघड; परंतु तूं " मला लिहावयास आळस केला नाहींस; आणि तेंही चांगलें लांब " लिहिलें आहेस ही तुझी मजविषयीं आस्था पाहून माझ्या प्र- " त्ययास आलें कीं, मजवर तुझी भक्ति आहे. ती पाहून मी " तुझी आभारी आहें. तूं मला लिहितोस कीं, मामानें माझी " व राजेसाहेबांची मुलाकत करून दिली आहे. ते मजवर " लोभ करितात; ते बहुत थोर, बहुत शांत आहेत; आणि " माझेंही मन त्यांचेकडे फार ओढतें." (तो मुलाकडे पहातो.) काय माझ्या गड्या, तूं असें आपल्या आईस लिहिलें होतें? तर तूं मजवर लोभ करितोस, म्हणून मी तुजवर करितों ह्यांत कांहीं मी विशेष करीत नाहीं. " मुला, तूं त्यां- " ची कृपा संपादितोस, ही गोष्ट चांगली करितोस; कांकीं " त्यांच्या साहाय्यावांचून तुला ह्या लोकीं अन्य गति नाहीं. तुला " बाप नाहीं, आणि जरी आई आहे, तरी त्यासाठीं तुझी कमी " कींव करावी असें नाहीं. मी तुझें संगोपन करावें हें देवानें " माझ्या हातीं ठेविलें नाहीं. हीगोष्ट मला रात्रंदिवस बहुत दुःख " देते. माझ्या सर्व विपत्तींमध्यें ही विपत्ति मोठी आहे. जेव्हां " मी आपल्या एकटीकडे पाहतें, तेव्हां मला फार संकट वाटत " नाहीं पण जेव्हां तूं माझ्या मनांत येतोस, तेव्हां माझें हृदय " फुटतें, आणि आसवें खळत नाहींत." एथें बहुत कोमलता

आणि चित्ताची बहुत आर्द्रता दिसते; ही चांगली आई आहे; अशीच जर चांगली बायको असली—पण ती कां नसावी ? आहेच ह्यांत मला संशय नाहीं. " माझ्या लाडक्या, काय करूं?
" माझ्या इच्छेप्रमाणें तुला मी भाग्यास मिळायाच्या मार्गास
" लावूं शकत नाहीं. मी निरुपाय होऊन एथें एकांतवासांत प-
" डलें आहें. पण इतकें करीन कीं, मी तुला ममतेनें आणि
" मनापासून वारंवार चांगला उपदेश करावयास चुकणार नाहीं,
" आणि जोंपर्यंत माझीं पत्रें तुला येतील, तोंपर्यंत तीं तुला
" सन्मार्गच दाखवितील; तर तूं आजपर्यंत माझ्या मनाप्रमाणें
" वागलास, ह्याची खूण, तूं हें माझें पत्र आपल्याबरोबर नि-
" त्य बाळगीत जा. दुसरें मी तुला काय देऊं ?" ( अंति-
काकडे पाहतो.) हा आईच्या आज्ञेंत वागतो हें ह्यावरून सिद्ध होतें—" तूं मजकडून जाऊं लागलास त्या वेळेस मी तुला
" आपल्या आसवांनीं न्हाणून जो उपदेश केला आहे, त्यास व
" तुझ्या स्वधर्मास, तूं चुकावें असा जेव्हां प्रसंग तुजवर पडेल,
" तेव्हां तूं हें पत्र स्मर; हें उघड; हें वाच; आणि मनांत आण
" कीं, माझी आई आहे, तिनें माझ्या आशेवर मात्र जीव धरि-
" ला आहे, आणि एकांतवासांत काळ काढिते आहे." 'तिनें माझ्या आशेवर मात्र' काय? काय ह्याला दुसरा भाऊ नाहीं?
" आणि विचार कर कीं, मी कुमार्गी गेलों असतां ती दुःखानें
" प्राण सोडील; मग असें होईल कीं, जें हृदय इहलोकींच्या
" सगळ्या पदार्थांपेक्षां मला अधिक चाहत होतें, त्यास मी
" कटारीनें खोंचलें." ती खरें म्हणते, मूल द्वाड निघालें म्हणजे आईबापांस असेंच होतें—ह्यानें बिघडावें असें हें स्थळ खरें;
" असें असतां तिनें ह्यास एथें कां पाठवावें बरें ?" तुजविषयीं
" मला कोणत्याही गोष्टीची शंका येऊन किंवा तुजवर माझा
" अविश्वास होऊन मी असें म्हणतें असें नाहीं. तुझें आचरण
" पाहून माझी खातरी होते कीं, तुजपासून वांकडी गोष्ट क-
" दापि व्हावयाची नाहीं. पण तुझ्या भावाच्या गुणांनीं मला

" फार रडविलें. मला वाटतें कीं, तूं माझी काकळुत जाणून,
" तसा माझ्या दुःखास कारण होणार नाहींस." असें आहे का!
ह्याचा वडील भाऊ ? गाडदी ? त्याविषयीं मला आणखी चां-
गलें समजून घेतलें पाहिजे. " तूं सदा माझी मर्यादा ठेवितोस.
तुझी वागणूक पाहून मला आनंदाश्रु येतात, हें मी तुला ख-
" रेंच सांगतें. तर मुला, तूं असेंच चालावें; भलें व्हावें;
" मग तुझी आई कशाही दरिद्रांत असो, कशीही दुःखी
" असो; ती सर्व विपत्ति विसरेल." ही बायको थोर दिसते.
असें नसतें तर विपत्तींत हिची बुद्धि नीच व्हावी, पण ती
तशी नाहीं; ही साध्वी आहे. " तुझ्या पत्राच्या शेवटीं तूं
" मला लिहितोस कीं तुझ्या बरोबरच्या सर्वांस घड्याळें आहेत.
" ह्यावरून मी जाणलें कीं, तुलाही एक असावें. पण तूं तितकेंच
" लिहून उगा राहिलास; हा तुझा संकोच पाहून मी आनंद
" पावलें. मी दैवहीन, म्हणून तुला घड्याळ पाठवावयास
" मला शक्ति नाहीं; मी दरिद्री हें तुला ठाऊकच आहे, म्हणून
" मला क्षमा कर. कांहीं कामामुळें मला राजधानीस जायाचें
" पडतें, तेव्हां माझ्याजवळ थोडके पैसे आहेत ते वाटखर्चीस
" पाहिजेत; तो खर्च अगत्याचा, न करून सुटका नाहीं. पण
" माझें वचन घे कीं, माझें चालेपर्यंत मी तुझी इच्छा पुरवीन;
" आणि जरी तुला जें व्हावें तें मला देववलें नाहीं, तरी मी तुला
" बुद्धि देण्यास कधीं अंतर करणार नाहीं. पुनः तूं लवकरच
" माझ्या दृष्टीस पडावें, अशी इच्छा करितें, हे आशीर्वाद."

ह्या बायकोनें अशा विपत्तींत असूं नये. मी हें पत्र घेऊन
राणीस दाखवितों. पण नाहीं; हें ह्या मुलाचें धन मी कसें
हरण करूं ? ( तो पुनः तें पत्र त्याच्या आंगरख्याच्या खिशांत
घालितो. ) काय स्वस्थपणानें हा अजून निजला आहे! (मुलास
हातीं धरितो. ) मुला ! ऊठ ऊठ. (अंतिक उठतो आणि कांहीं
वेळ त्याकडे पाहतो.) (आपल्याशींच ) माझ्या गळ्याची शपथ

हा मुलगा मनोहर आहे ! चल माझ्या गड्या, आतां ऊठ, दिवस फार आला, ऊठ.

अंति०—( हळूच उठतो. ) होय महाराज.

राजा—तूं अजून निजेंतच आहेस ? चल; माझ्या खोलींत जा, (तो जातो) आणि दिवे मालीव; आणि दरवाजा लावून घे--झालें ? आतां जेथून घड्याळ आणिलें तेथें जा इकडून ह्या वाटेनें, लवकर, नीट जा; आणि तिकडून परत ये. कां आतां पुरता जागा झालास ना ?

अंति०—होय महाराज.

राजा—आतां मला सांग कीं, तुला पत्र लिहितां येतें काय ?

अंति०—होय महाराज, लिहायास बसलों असतां लिहितों. मीं दोन लांब पत्रें लिहिलीं आहेत.

राजा—आपल्या आईस लिहिलीं वाटतें.

अंति०—( संतोषानें ) होय महाराज, माझ्या आईस.

राजा—तिची गोष्ट बोलतों, तेव्हां तुझ्या डोळ्यांत आनंदाची टवटवी दिसते मला. ( एकीकडे ) दरिद्रदशेंत असतांही, काय ह्यांची एकमेकांवर प्रीति ! पण तुझी आई चांगली आहे रे ?

अंति०—अहा ! महाराज जर तुम्ही तिला ओळखत असतेत!

राजा—मी तिशीं ओळख करीन, पण ती तुला कशी वाटते तें सांग.

अंति०—ती अशी भली आहे, आणि अशी माझी माया करिते-

राजा—तर तिचे मुलगेही तिजसारिखे चांगले असावे. मी ऐकतों कीं, तुझा वडील भाऊ चांगला नाहीं पण तूं-

अंति०—( मान हालवितो. ) माझा भाऊ हरबाजी ?

राजा—होय, मी ऐकतों कीं, तो तुझ्या आईस फार कष्टी करितो; हें खरें काय ?

अंति०—अहा महाराज ! मला तें बोलतां येत नाहीं. जर जमातदाराच्या कानावर ही गोष्ट गेली तर, ते मोठे तिखट आहेत.

**राजा**—मी तुला वचन देतों मुला, त्याला ह्यांतलें मी कांहीं समजूं देणार नाहीं. बोल तूं सर्व, काय आहे तें. तुझ्या भावानें काय केलें ?

**अंति०**—त्यानें पुष्कळ वाईट चाळे केले. ते सगळे मला ठाऊक नाहींत. पण माझी आई त्यावर फार रागावली होती, एवढें मला ठाऊक आहे. त्याची अब्रू झांकावी म्हणून ती फार खराबीस आली. ( तो राजाजवळ जातो, आणि हळूच बोलतो.) ती म्हणाली कीं, मी असें केलें नसतें, तर त्याला केव्हांच चाकरींतून हांकून दिलें असतें.

**राजा**—हांकून दिलें असतें ? कशाकरितां ?

**अंति०**—अहा, महाराज, माझ्यानें तें सांगवत नाहीं.

**राजा**—काय ? मला ?

**अंति०**—तिनें मला देखील समजूं दिलें नाहीं.

**राजा**—(हंसतो.) तें तिनें नीट केलें. पण तूं आपणाकरितां कधीं घड्याळाविषयीं आईस लिहिलें होतें ?

**अंति०**—एकच वेळ.

**राजा**—तेव्हां ती तुजवर रागें भरली नव्हे ?

**अंति०**—नाहीं, नाहीं महाराज. तिनें मला उलटें लिहिलें कीं, मी कसेंही करून, माझें सामर्थ्य चालेपर्यंत, तुला एक विकत घेऊन देईन. तिला मीं लिहिलें म्हणून त्याची मला खंती होते आतां; कांकीं, तिचें पोट भरायाची भ्रांत आहे. तिची अवस्था पाहून मी फार दुःखी आहें.

**राजा**—तूं दुःखी असावेंच. चांगल्या लेंकानें आईवर खर्च घालूं नये. त्यानें तिला साह्य करावें, हा त्याचा धर्म होय. घड्याळाचीच गोष्ट आहे तर तुला तें कोणीही देईल. (तो पैशांची पिशवी बाहेर काढितो.) धर, घे ह्या बारा मोहरा. ह्या मी तुला इनाम दिल्या, हात कर पुढें.

**अंति०**—( भीत भीत हात पुढें करितो; राजा त्यावर मोहरा मोजून घालितो.) महाराज, ह्या काय मला ?

**राजा**—होय खरेंच तुला; पण खरें सांग तूं ह्यांचें काय करशील?

**अंति०**—इतक्यांचें घड्याळ येईल नव्हे ?

**राजा**—येईल पण चांगलें येईल. पण तुला घड्याळाचें अगत्यच नाहीं; एथें तीं पुष्कळ आहेत. ( अंतिक आशाभरित त्यांकडे पाहतो.) मी तुझ्या जागीं असतों तर ह्या पैशाचा मी कांहीं चांगला उपयोग करितों. असो, तूं तुझ्या मर्जीस येईल तें कर. मी जातों नित्यकृत्यास. पण मी परत येईं तों तूं एथेंच ऐस. ( राजा चालूं लागतो. )

**अंति०**—(त्यास बोलावितो.) महाराज!

**राजा**—कां तुला काय पाहिजे ?

**अंति०**—माझी आई शहरांत आली असावी. ती आज सकाळीं येणार होती. मी तिला भेटून येऊं? महाराज मला रजा देतील ?

**राजा**—नाहीं मुला, तुला जाण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं; तुझी आईच तुजकडे येईल; तुला ती एथेंच भेटेल; अंमळ धीर धर. ( तो जातो. )

---

## प्रवेश ८.

### अंतिक. (एकटा.)

(आपल्याशीं) ती एथें येईल? ती मला एथेंच भेटेल? ह्याचें कारण काय बरें असेल? असो काय असेल तें; मला भेटीशीं कारण. एक, दोन, तीन, चार, (मोहरा मोजतो.) बारा मोहरा! घड्याळ घ्यावयास! काय मी दैववान! मला वाटतें कीं, तें ह्या वेळेस माझ्या हातांत आहे! टिकटिक वाजतें तें मला ऐकूं येतें! मी त्याची किल्ली फिरवितों आहें. पण महाराजांनीं सांगितलें कीं, मी तुझ्या जागीं असतों तर ह्या पैशांचा कांहीं चांगला उपयोग करितों. ह्याचा काय बरें अर्थ असेल ? ते काय करते? होय! त्यांकडे घड्याळांची वाण नाहीं; म्हणून त्यांना त्याची नेवाई[१] वाटत नाहीं. बरें, पण त्यांनीं मला आणखीही सांगितलें कीं,

---

१ कौतुक.

चांगल्या लेंकानें आईस साह्य करावें. निभ्रांत; त्यांनीं हें आमच्या प्रकरणींच म्हटलें. इतक्या मोहरा माझ्या आईकडे असल्या तर तिला फार उपयोगीं पडतील नव्हे ? (तो दोहीं हातांत चेपून मोहरा उराशीं नेतो.) घड्याळ घेऊं कीं आईस देऊं? नाहीं, घड्याळच घ्यावें; नको पण आईकडेही पहावें! आणि अशा ममताळू आईकडे तर अगत्यानें; तिनें काल मला पत्र पाठविलें त्यांत ती लिहिते कीं, मी मोठ्या विपत्तींत आहें. तिला हे पैसे दिले असतां काय आनंद होईल! एकदाच तिचें संकट दूर होईल! तर काय मी हे तिला देऊन आपणास नाहींतसे करूं ? (निश्चय करितो.) होय, करावेच. पण ती आतां लवकरच येईल तर बरें; नाहीं तर माझी बुद्धि फिरेल एकादी; मला घड्याळाचाही ध्यास आहे ! चुपचुप कोणी येतें आहे.

---

## प्रवेश ९.

### सगुणाबाई, दलपतराव व अंतिक.

**अंति०**—(आईस भेटावयास धांवतो.) काय ! तूं, माझे बये?

**सगु०**—(मुलाकडे लक्ष्य न देतां भ्याल्यासारखी आसपास पहाते.) मला समजत नाहीं; पण मी मोठी चिंतेंत आहें भाऊ; राजेसाहेबांनीं मला कां बोलाविलें असेल बरें ?

**दल०**—हा मुलगा पहा; ह्यास ते तुझ्या स्वाधीन करणार.(ती मुलाकडे साश्चर्य आणि सचिंत पाहते, तो आनंदानें तिच्या गळ्यास मिठी मारतो.) वास्तविक पाहतां ह्याला एथें आणणें हा वेडेपणा. महाराजांनीं ह्यास काय करावें? दुसरीं मुलें वाढतील आणि रोजगारास चढतील; पण हें (अनादरानें) असें खुजट पोर आहे कीं, कोणत्याही उपयोगीं पडावयाचें नाहीं. तूं दुःखांत असतां तुझें दूध प्याला आहे म्हणून असा झाला मला वाटतें. हें झाड मुळासच रोगटलें, ह्याला शक्ति यावयाची नाहीं; आणि हा वाढावयाचा नाहीं.

सगु०—( खेद पावून ) अहा ! भाऊ ! दैव माझें !

दल०—तर, राजेसाहेबांकडे तूं ह्याविषयीं प्रार्थना करूं नको हो; करून फळ नाहीं. थोरल्याकरितां हवें तर कांहीं बोल; तो कांहीं तरी मनुष्यसा दिसतो.

सगु०—थोरल्याविषयीं ?

दल०—होय, त्यालाही बोलावूं पाठविलें आहे.

सगु०—भाऊ, तूं मला भय घालितोस. त्याचे गुण महाराजांस समजले—

दल०—( अनास्थेनें ) असतील, कां न समजावे ? ( नाक मुरडतो, आणि उदासीनता दाखवितो. ) त्यानें लोकांची उचापत फार काढली आहे, आणि त्यास कांहीं दिवसांनीं लश्करांतून पळून जावें लागेल, किंवा बंदीखान्यांत जावें लागेल. हें महाराजांस समजलें तर कसें होईल? आणि हें सगळें येणार मजवर–(तापून) तूं पहा कीं, माझी भलाईच मला नडते आहे; आणि मला वाटतें कीं, त्याकरितां मला पहाऱ्यांत जायाचें पडेल. मी तुझ्या पोराच्या खटल्यांत पडलों नसतों तर बरें होतें ! असो, पण अतःपर पडणार नाहीं, (तो चडफडत चडफडत पुढें जातो, मागें येतो.) नाहीं ! माझ्या कुडींत प्राण आहे तोंपर्यंत मी अतःपर तुझ्या पोरांचें नांव घेणार नाहीं ! (ता निघून जातो. )

---

## प्रवेश १०.

### सगुणाबाई व अंतिक.

अंति०—( तिला चिंतेंत पाहून ) मामाचा सदा तापट स्वभाव, बोलूं दे त्याला बये; तूं कांहीं चिंता करूं नको.

सगु०—तूं उगीच ऐस मुला; तुला समजत नाहीं—

अंति०—ओहो ! मला मामापेक्षां अधिक समजतें—तो म्हणतो तसे राजेसाहेब नाहींत; ते कोणास उपद्रव करायाचे

नाहींत. ह्याचा दाखला हा पहा, पहा लागलाच. (हातां-तल्या बारा मोहरा दाखवितो.) पहा, ह्या सगळ्या त्यांनीं मला दिल्या.

सगु०—(आश्चर्य पावून) असें कसें होईल? राजेसाहेबांनीं दिल्या?

अंति०—त्यांनीं एका मोठ्या पिशवींतून काढिल्या. ती सगळी मोहरांनीं भरली होती; आणि तूं येण्याच्या अगोदर नुकत्याच मला दिल्या. आई, जर त्यांची इच्छा झाली, जर त्यांची कृपादृष्टि झाली, तर मग काय! ते मातबर आहेत! आपणांस गबर करून सोडतील.

सगु०—पण हें कसें झालें मला समजत नाहीं. त्यांनीं कांहीं योजून ह्या तुला दिल्या असतील.

अंति०—ह्यांत संशय काय? त्यांचें घड्याळ बंद झालें होतें. ते काल सगळा दिवस शिकारीस गेले होते, म्हणून त्यास किल्ली द्यावयास विसरले, आणि आज प्रातःकाळीं (तो खोली-कडे जातो आणि दरवाजा उघडितो.) ती बये, ती जागा राजेसाहेबांची निजायाची, त्यांनीं मला तेथें बोलाविलें आणि म्हटलें, मुला, तुझ्या घड्याळांत किती रात्र राहिली आहे तें पहा. माझ्या जवळ घड्याळ नव्हतें—

सगु०—म्हणून त्यांनीं तुला हे पैसे दिले?

अंति०—होय! त्यांनीं घड्याळ विकत घ्यावयास दिले (फिरून मोहरा दाखवितो.) ह्या बघ बारा मोहरा.

सगु०—मजकडे पहातोस काय? मी तुझें खरें मानणार नाहीं.

अंति०—कां? पण मला घड्याळाची उतावीळ नाहीं; तें मीं कधींही घेतलें तरी कामास येईल. (आईचा हात ध-रतो.) तूं घे ह्या बये, आपल्याजवळ ठेव.

सगु०—(हुंदका येऊन) काय! माझ्या जिवा, असें आहे?

अंति०—बये तूं सदा रडतेस, ह्याचें मला वाईट वाटतें. अहा! मजपाशीं पुष्कळ पैसे असते तर बरें होतें. मग मी तुला

कधीं रडूं देतोंना. सगळे दमडीनदमडी मी तुझ्या स्वाधीन करितों.

**सगु०**—(त्याला प्रेमानें जवळ घेते.) काय! तूं तसें करितास? खरेंच ?

**अंति०**—तुला संतोषीत पाहून मला फार आनंद होतो.

**सगु०**—(त्याचा मुका घेते.) तुझी वासना पाहून मुला मी सुखी झालें. राजेसाहेबांनीं आपली सगळी दौलत जरी मला दिली, तरी ह्या वेळच्या आनंदाचें मोल होणार नाहीं— मुला, मजसारिखी हीनभाग्याची आई आहे तिला मुलाची आपणाविषयीं सदयहृदयता पाहून किती समाधान होतें त्याचा तुला अनुभव नाहीं!

**अंति०**—(तिचा हात फिरून धरितो.) तूं हे पैसे घे पण, मी तुला विनंती करितों; नाहीं म्हणूं नको—

**सगु०**—होय मुला, मी घेतें; आणि तूं एथें असतां तुला गरज आहे म्हणून मी तुला ह्याचें—

**अंति०**—मला काय तूं ह्याचें घड्याळ घेणार ?

**सगु०**—तूं राजेसाहेबांपाशीं आहेस, म्हणून तुजजवळ एक असावें.

**अंति०**—मला त्याची कांहीं गरज नाहीं. राजेसाहेबांच्या प्रत्येक खोलींत घड्याळें आहेत. त्यांनीं मला स्वतः सांगितलें कीं, घड्याळावांचून तुझें कांहीं अडणार नाहीं.

**सगु०**—पण त्यांनीं तुला घड्याळाकरितां पैसे दिले नव्हे ?

**अंति०**—असें ते बोलले, इतकेंच.

**सगु०**—मला दिसतें तर तूं मला ठकवितोस; तूं माझ्या वरील ममतेमुळें एकादी लबाडी करीत असशील.

**अंति०**—लबाडी ? तर तुला माझें खरें वाटत नाहीं ? ह्या वेळेस एथें राजेसाहेब असते, तर तुला समजलें असतें. अहा ! ते लवकर येतील तर बरें. (मागें फिरून पाहतो.) ओहो हे, तेच स्वतः आले, आतां पहा बरें—

---

## प्रवेश ११.

राजा, सगुणाबाई व अंतिक.

अंति०—( राजासमोर जातो. ) बरें हें खरें कीं नाहीं महाराज ? आपण मला बारा मोहरा दिल्या ? पहिल्यानें घड्याळ घ्यावयास.

राजा—होय, माझ्या मुला.

अंति०—आणि मग, तुला घड्याळाचा तोटा नाहीं, हेंही आपण नाहीं सांगितलें ?

राजा—तेंही खरेंच.

अंति०—(लागलाच आईकडे फिरून) पहा बये. आतां कसें ?

सगु०—(घाबरी होऊन) महाराज, हें मुलगें अज्ञान, सरळ भावानें बोलतें; मर्यादा कशी ठेवावी तें ह्यास समजत नाहीं; ह्याची क्षमा असावी.

राजा—क्षमा ! बाई, मला सरळपणा फार आवडतो; असा सर्वांत असता तर काय न होतें ! वास्तविक असेंच सर्व असावें. मुला, मला वाटतें तुझ्या आईस खरें वाटलें नाहीं.

अंति०—(अंमळ साचत) नाहीं महाराज. पहिल्यानें तिला खरें वाटलें नाहीं; मी तिला मोहरा देत असतां ती घेईना.

राजा—ती घेईना हें तूं काय म्हटलें ? तर काय तुझ्या दृष्टींत माझें बक्षीस हलकें दिसलें, म्हणून तूं दुसऱ्यास देऊं लागलास ? असें होणार नाहीं.

अंति०—(काचावतो) महाराज—

राजा—मला जर असें आधीं समजतें तर मी तुला देतोंना. खरेंच सांग, तूं तसें केलें काय ?

अंति०—(आईकडे बोट करितो.) अहा महाराज, माझी आई फार गरीब आहे !

राजा— (त्याची हनुवटी धरितो.) भल्या मुला ! तर तूं आपल्या गरीब आईची कीव जाणुन घड्याळाची आशा

सोडिली ? तिला साह्य करून घड्याळ गमावणें हें तुला फार अवघड पडलें असेल नव्हे ? ( आपलें घड्याळ बाहेर काढितो. ) हें घे. ह्या वेळेस हें एकच जरी मजकडे असतें, तरी मीं तुला दिलें असतें —

अंति०—( आनंदानें घेतो. ) अहा, महाराज ! पण हें चालतें आहेना ?

राजा०—भिऊं नको, चांगलें चालतें. ( अंतिक तें आईस दाखवायास तिजकडे धांवतो. ) शाबास मुला, मीं तुला जें दिलें होतें, त्याचें तूं चांगलें सार्थक केलें. ( त्यास मोहरांची पिशवी देतो. ) ही घे; ह्यांत शंभर मोहरा आहेत; ह्या मीं तुला बक्षीस केल्या.

अंति०—( त्यांकडे साश्चर्य पाहतो. ) महाराज हें काय !

राजा—तूं अनमान करितोस ? घे ह्या.

अंति०—काय ! सगळी पिशवी ! ( परत द्यावयास लागतो.) महाराज, हें फार आहे.

राजा—होय, तुला फार खरेंच. पण मी ह्यासाठीं देतों कीं, तूं ह्यांचा चांगला उपयोग करावा. बरें, ह्याचा विशेष उपयोग कोणास आहे ?

अंति०—विशेष उपयोग कोणास आहे ? (तो राजाकडे आणि आईकडे पाळीपाळीनें पहातो. ) ह्या घे आई तुला.

सगु०—(राजापुढें येते. ) महाराजांचे मजवर फार—

राजा—उपकार मानायाचें कांहीं कारण नाहीं. हें मी थोडें दिलें. मला वाटतें कीं, इतक्यांत तुमचें संकट दूर होणार नाहीं. पण बाई (मुलाकडे हात करितो. ) हा मुलगा माझ्या चाकरीस फार लहान आहे, माझ्या उपयोगीं नाहीं, म्हणून मी ह्यास परत करितों, ह्याचें तुम्हांला वाईट वाटूं नये. कां ? तुम्ही बोलत नाहीं ?

सगु०—महाराजांनीं क्षमा करावी—

राजा—काय ?

सगु०—माझें दारिद्य पाहून मला लज्जा वाटते. ह्याला मी परत नेऊन काय करूं? माझ्यानें ह्याचें पोषण कसें होईल? मी ह्यावर आशा फार धरिली होती. आतां मी पुनः भव-जाळांत पडलें! मी आतां प्राणधारण कसें करूं! (रडें आटोपते.) हा फार लहान; ह्यास बाप नाहीं; पुढें ह्याचा परिणाम कसा होईल? महाराज, मी अल्पबुद्धि, निर्भीड होऊन बोललें ह्याची क्षमा असावी.

अंति०—(रंजिस होऊन राजाचा हात धरितो.) महाराज, बया रडते.

राजा—तूं आपल्या आईपाशीं राहतोसना?

अंति०—(आर्जवानें) महाराज, तर आपण मला घरीं लावून देतां?

राजा—तूं जावयास राजी नाहींस? बरें तर बाई. असूं द्या ह्याला मजकडे. पण एथें राहून ह्याचें कसें होईल? हा कदाचित् बिघडेल. असो, पण ह्याचें मला भय वाटत नाहीं.

सगु०—हा बिघडेल? (मुलाकडे डोळे लाविते.) हा बिघडेल आपण म्हणतां महाराज?

राजा—नाहीं, हा बिघडणार नाहीं?

सगु०—(भयानें) महाराज, मी आपला अभिप्राय चांगला समजलें नाहीं म्हणून माझ्या निर्भीडपणाची क्षमा असावी.

राजा—माझा अभिप्राय असा कीं, माझे दुसरे अंतिक आहेत, त्यांचे गुण चांगले नाहींत; हा त्यांच्या सोबतीनें बिघडेल; पण अनुभवून पाहूं या—

सगु०—(मुलाचा हात धरिते.) नाहीं महाराज, हा तसा नाहीं.

राजा—पण पहा; ह्याचा दूरवर विचार करा—

सगु०—त्याविषयीं मला संशयच नाहीं. ह्याला कोठेंही असूं द्या.

राजा—विद्याभ्यासावांचून ह्याचें कसें होईल?

सगु०—भगवान काय करील तें खरें; त्याला मी शरण आहें.

जर हा परिश्रम करून उदयास येणार नाहीं, तर मजूरी करील, दरिद्र भोगील; पण यानें दुराचरणी मात्र होऊं नये; इतकी माझी इच्छा आहे.

**राजा**—बाई, तुमचा थोरपणा पाहून मला संतोष झाला. तुम्हांस सर्व प्रकारें साह्य करावें, हें मला योग्य आहे. (मोठ्या आवडीनें) तुमची काय इच्छा आहे? कोणत्या गोष्टीनें मी तुमचें प्रिय करीन? मोकळें मन करून बोला. मी तुमचा मित्र आहें; शंकूं नका.

**सगु०**—(सद्गदित होऊन) मी तुमची कशी उतराई होईन!

**राजा**—तुमची अवस्था काय आहे? तुमची मालमत्ता काय आहे तें मला सर्व सांगा.

**सगु०**—माझी मालमत्ता जी आहे ती आतां माझी नव्हे.

**राजा**—तर मला वाटतें तुम्हांला फार कर्ज आहे! सरकारांत तुमची कांहीं पंचाईत चालली आहे असें मी ऐकतों. त्याचें कसें काय आहे?

**सगु०**—महाराज, एक कज्जा माझ्या इनाम गांवाचा आहे त्याचा केव्हांच निकाल व्हावा; पण मजपाशीं पैसा नाहीं, मला कोणाचा आश्रय नाहीं, म्हणून मी तो घरांतल्या घरांत मिटवावा ह्यासाठीं आलें होतें, पण तसें होत नाहीं.

**राजा**—बरें तर तें कांहीं वाईट झालें नाहीं. तुमचा इनसाफ आतां वाजवी होईल; माझें वचन घ्या; आणि मी तुम्हांस एक हजार रुपयांचें स्वास्थ्य करून देतों. मला वाटतें कीं, मग तुमच्या सर्व अडचणी दूर होतील.

**सगु०**—(लोटांगण घालिते.) मज हतभाग्येवर इतकी कृपा!

**राजा**—(तिला उठवितो.) काय तुम्ही करितां हें बाई, मी हात जोडून सांगतों कीं उठा. तुमच्या भ्रतारानें जी सरकारची चाकरी बजावली आहे, ती पाहिली असतां मी हें करितों हें फार थोडें आहे. सांगा मला आतां, तुम्ही मुलास परत न्याल कीं नाहीं?

सगु०—महाराज, हे उपकार मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं!

राजा—आणि मुला, तूं आतां आईपाशीं जाशील कीं नाहीं ?

अंति०—(घड्याळाशीं खेळतो.) आईपाशीं? होय महाराज.

राजा—तूं मजकडे रहात नाहींस तर ?

अंति०--जशी महाराजांची मर्जी.

राजा—जर मीं आतां तुला आईकडे लावलें तर तूं मजपाशीं नाहींसा होशील नव्हे? आणि तुझी तर इच्छा आहे कीं मजपाशीं असावें; आणि तुझ्या आईचीही तशीच इच्छा आहे. असो, मला कांहीं दुसरी तजवीज केली पाहिजे. बाई तुम्ही एथें असा; मी हाच आलों.

---

## प्रवेश १२.

सगुणाबाई व अंतिक.

सगु०—( बांकावर बसते. ) अहा ! काय सुदिन हा ? काय अकल्पित सुख हें !

अंति०—कां आई, कां तूं आतां खुशाललीसना ?

सगु०—( त्यास जवळ घेते. ) अगा माझ्या जिवलगा, माझ्या परम प्रिया मुला ?

अंति०—पण तुला फार हर्ष झाला असें मला दिसत नाहीं; तुला फार आनंद व्हावा असें मी इच्छितों.

सगु०—बाळा, मला आतां मोठी लज्जा होते, कांकीं मी भगवंतास शब्द लावीत होतें. तूं झालास तसेंच त्यांचें वर्तमान आलें, तेव्हां मी तुला कंटाळलें, आणि तूं कशास जन्मलास म्हणून तुला शब्द ठेविला; (ती त्याला आलिंगिते आणि त्याचा मुका घेते. ) आणि त्याच तुझ्या हातून मी आज सर्व संकटांतून मोकळी झालें! तूं आज माझें सर्व दुःख नाहींसें केलेंस, आसवें आटिलींस! हे भगवान, आतां मी आणखी कशाची वांछा करूं ? मी तृप्त झालें; मला

कांहीं अपेक्षा राहिली नाहीं. पण एक तेवढें तुझ्या भावाचें सुख मात्र मला उणें आहे; मग माझें सर्व नीट झालें.

अंति०—माझ्या भावाचें ? कां ? त्याचें काय आहे ?

सगु०—जर राजेसाहेबांस त्याचे गुण समजले तर—

अंति०—त्यांना समजलें तरी त्याचें काय होणार आहे ? तूं पाहिलें नाहीं का ते काय कृपाळू, काय थोर आहेत ते !

सगु०—खरें, पण आपणांवर, कांकीं आपण त्यांचा कांहीं अपराध केला नाहीं.

अंति०—पण त्यांनीं मला वचन दिलें आहे कीं, मी कोणापाशीं सांगणार नाहीं.

सगु०—( भिऊन. ) काय ! त्यांनीं तुला वचन दिलें आहे कसचें ?

अंति०—होय खरेंच. म्हणून तूं भिऊं नको.

सगु०—माझा थरकांप होतो, तूं त्यांस सांगितलें तर—

अंति०—नाहीं; सांगितलें म्हणशील तर कांहीं सांगितलें नाहीं, मला ठाऊक होतें तितकें मात्र सांगितलें. मग त्यांनीं मला त्याचें आचरण पुसलें; तें मी काय उगीच खोटें सांगूं ? तुला ठाऊक आहे कीं, तूं मला खोटें सांगायाची मनाई केली आहे.

सगु०—पण, मुला हें काय केलें तूं !

अंति०—कां बये; तूं चिंता कां करितेस ?

सगु०—अरे देवा, चिंता कां करितेस म्हणून आणखी पुसतोस ! जर महाराजांनीं आणखी चौकशी केली, आणि जर त्यांस तें समजलें, तर मग तुझ्या आईची आणि तुझ्या भावाची धडगत नाहीं.

अंति०—( तो रडूं लागतो. ) धडगत नाहीं !

सगु०—चूप, कोणी येत आहे. (ती त्याचें चुंबन घेते आणि त्यास अवसान देते.) एक शब्द बोलूं नको, डोळे पूस. तुला रडतां पाहिलें तर एकादा घात होईल; चिंता करूं नको.

---

## प्रवेश १३.

### सगुणाबाई, अंतिक, राजा, दलपतराव आणि हरबाजी.

राजा—( दलपतरावास ) या राव; आंत या. ( हरबाजीस ) रणधीररावांचे पुत्र हरबाजी नाईक गाडदी ते तुम्हीच काय?

हर०—( फार लवून ) होय महाराज.

राजा—योग्य. तुमचे तीर्थरूप बहुत सज्जन, आणि मोठे शूर होते. माझी खातरी आहे कीं, तुम्हींही त्यांची चाल धरिली असेल; आणि जेणेंकरून तुम्ही त्यांचे पुत्र साजाल, असें करीत असाल.

हर०—महाराज, तसें मीं करावें हें मला योग्यच आहे.

राजा—खरेंच; तुम्ही योग्य आहां त्या पक्षीं योग्य असेल तेंच कराल. ही पहा तुमची आई; हिचे गुण आणि ह्या मुलाचें शुभलक्षण पाहून, तुमचें कुटुंबच थोर आहे असें माझ्या प्रत्ययास आलें; आणि मला वाटलें कीं, तुम्हां सर्वांस एके ठायीं पहावें; म्हणून तुम्हांस एथें बोलावून आणिलें आहे.

हर०—( आणखी अंमळ डौलानें लवतो. ) महाराजांनीं ही आज मला मोठी अबरू दिली !

राजा—तुम्हांस योग्य आहे त्यापेक्षां मीं कांहीं अधिक केलें नाहीं.

हर०—महाराजांची माझेवर मोठी कृपा झाली आहे.

राजा—खरेंच, तुम्हांस भाग्यास चढवावें, अशी माझी फार इच्छा आहे; परंतु तुमचें स्वरूप माझ्या बुद्धीस आलें आहे, तसेंच वास्तविक आहे, अशी माझी खातरी झाली पाहिजे; कांकीं, तुमच्या निस्पृहपणाच्या बोलण्याचा, तुमच्या प्रौढीचा, डौल पाहून—

हर०—अहा ! महाराज, धन्य मी !

राजा—त्यावरून मला वाटतें कीं, एक तर तुम्ही बहुत थोर असाल, किंवा बहुत वाईट मनुष्य असाल; पण अशा आई-

बापांच्या पोटीं आणिकसा पुत्र होणार नाहींच नाहीं. बरें पण ह्या समयीं मी तुमच्या उपयोगीं कसें पडावें ? तुम्हांस एक पायरी वर चढविलें तर त्यानें तुमची योग्यता फार वाढेल, असें कांहीं दिसत नाहीं. बरें, तुम्हांस कसें वाटतें ?

हर०—( अंमळ विचार करून ) खरेंच महाराज.

राजा—बरें एक पायरी टाकून दुसऱ्या पायरीस चढविलें असतां तुम्ही जमादार मात्र व्हाल; शंभर मनुष्यांवर सर! त्यांतही कांहीं विशेष नाहीं. पण प्रथम, ( दलपतरावाकडे फिरतो ) राव, तुमच्या भाच्याच्या योग्यते विषयीं तुमचें काय मत आहे ?

दल०—( अंमळ गांधळून ) माझें महाराज ? माझें मत ?

राजा—ह्या भाषणावरून विपरीत असावेंसा भास होतो.

दल०— नाहीं महाराज, फार सुपरीत आहे; मला वाटतें कीं, हा हिमती आहे, आणि पुढें शूर निपजेल.

राजा—( हरबाजीकडे आनंदानें पाहतो.) काय हो ? हें खरें ?

दल०—आणखी हा स्वरूपानेंही फांकडा दिसतो.

राजा—होय, हा चांगला जवान आहे हें मला प्रत्यक्ष दिसतें; पण ह्याचें आचरण, ह्याची रीति कशी आहे ? तुह्मांला असल्या हलक्या गोष्टी विचारायास मला लाज वाटते. पण मुख्यत्वेंकरून हा कोणत्या प्रकारचा मनुष्य आहे तें मला समजलेंच पाहिजे.

दल०—( हंसून ) अमळसा रंगेला; कोणे समयीं अंमळसा धट्टही; पण महाराज हीं शिपायास दूषणें नव्हत.

राजा—खरेंच ? मला हें आजपर्यंत समजलें नव्हतें. आता बाई मला तुमची साक्ष मात्र पाहिजे. तुम्ही ह्याविषयीं काय म्हणतां ? ( अंमळ विसांवून ) कांहीं नाहीं मला वाटतें.

सगु०—मीं त्याविषयीं काय सांगावें महाराज ?

राजा—काय तुम्हांस दिसत असेल तें; खरें काय असेल तें सांगा.

सगु०—पण महाराज, मला तें सांगवेल काय? मला त्याची

प्रशंसा कर्तव्य आहे, ती जर मीं त्याच्या समक्ष केली, तर महाराजांस मानेल काय ? अथवा, ज्यांच्या हातीं त्याच्या आचरणाप्रमाणें त्यास फळ तत्काळ देण्याची सत्ता आहे, अशांजवळ मला त्याची वांकडी गोष्ट बोलवेल काय ?

**राजा**—( हंसून ) बाई तुम्ही मोठ्या सुज्ञ आहां. ह्या उत्तरांत, तुम्ही आईचा कनवाळूपणा राखून बायकांचा प्रौढपणा दाखविला. तुमची प्रशंसा मी कशी न करूं ? ( हरबाजीस अमळ गंभीर वाणीनें ) रावजी, एकएकाची चाल निरनिराळी असते तशी माझीही आहे. कोणास वाढवावें असें माझ्या मनांत आलें म्हणजे मी पहिल्यानें त्यास पहाऱ्यांत देतों. हें तुम्हांस कसें दिसतें बरें ?

**हर०**—( भिऊन आणि घाबरून ) महाराज ! हँहँहँ—

**राजा**—होय माझी चाल अशीच आहे. तुझी तरवार दलपतरावांच्या स्वाधीन कर. तुझ्याठायीं मला अमळ संकोच आढळला असता तर इतकें होतेंना. पण अहंकार ! हा बोलण्यांत धीटपणा ! आपण दुर्गुणी आहों हें आपल्या मनांत समजूनही जो अशीं भरंवशाचीं बोलणीं बोलतो त्या मनुष्यापासून कसची आशा धरावी ? त्या मनुष्यानें मला राग आणिला असें कोणास वाटेल? त्या मनुष्यानें आपल्या महाथोर आईस ह्याप्रमाणें गांजलें असें कोण मानील? इतकें करूनही पुनः—( रागानें ) घालाहो ह्याला एक महिना बंदीखान्यांत. बाई, खरेंच सांगतों, तुम्हांकरितां मीं ह्याचें कांहीं अधिक मनास आणिलें नाहीं. एरवीं ज्या गोष्टी माझ्या कानीं आल्या आहेत त्यांवरून मला दिसून येतें कीं, हा महान अपराधी आहे. (रोषयुक्त आणि तीव्र वाणीनें) दलपतराव, ह्याउपर ह्याचें कांहीं वांकडें आचरण आढळलें असतां मला तत्काळ कळवा-समजलें ? पुढें मी ह्यास योग्यतेस चढविणार आहें, म्हणून (दलपतरावाकडे पाहून ) दलपतराव तुम्हीं, अथवा ( सगुणाबाईकडे वळून

नम्रत्वाणीनें) तुम्हीं बाई, मजकडे ह्या समयीं ह्याची रदबदली करूं नये. ह्याला कोणत्याही मिषानें कांहीं देऊं नये. ह्याला हवा असला तर ह्यानें आपल्या रोजमुऱ्यांत खर्च चालवावा. (बोटानें सूचना करितो.) आतां जावें राव बंदीशाळेंत.

( दलपतराव आणि हरबाजी जातात. )

---

## प्रवेश १४.

### राजा, सगुणाबाई व अंतिक.

**राजा**—कां बाई तुम्ही कष्टीशा दिसतां ?

**सगु०**—महाराज—मी आई आहें.

**राजा**—पण मुलाला अमळ दुःख होईल म्हणून त्यास ज्या शिक्षा करीत नाहींत, अशा अज्ञान आयांसारख्या तुम्ही नाहीं.

**सगु०**—त्या ममता करितात ती खोटी ममता. पण मला चिंता इतकीच कीं, तो आतां जन्मवर महाराजांच्या कृपेंतून गेला असें न व्हावें.

**राजा**—त्याविषयीं तुम्ही काळजी करूं नका; माझ्या मनांत इतकेंच कीं मी त्यावर जे पुढें उपकार करणार त्यांस त्यानें योग्य व्हावें, आणि त्याच्या वयाकडेही कांहीं पाहिलें पाहिजे, म्हणून मी त्यास झाले अपराध क्षमा करीन; पण असें सदा सर्वदा करणार नाहीं. पाहुं या कसें होतें तें. एकाद्यास पश्चात्ताप होऊन तो ठिकाणीं येतो, एकादा उलटा अधिक बिघडतो. पण तें कसेंही होऊ, तुम्हीं स्वस्थ असावें, मला वाटतें आतां तुमचा मुलगा मार्गावर येईल, आणि तो जसजसा सुधारेल तसतशी मी त्यावर कृपा करीन. (अंतिकाकडे वळून) ह्या मुलाविषयीं तुम्हाला समजलें मीं काय योजलें आहे तें ?

**सगु०**—तें जें कांहीं असेल तें, त्याच्या कल्याणार्थच असेल महाराज. महाराज, आपला थोरपणा ऐकुन, आपलें कल्याण चिंतन केल्यावांचून माझा एक दिवसही रिकामा गेला

नाहीं. पण आपले गुण आज प्रत्यक्ष पाहून मला वाटलें कीं, मीं आपलें स्वरूप कांहींच ओळखिलें नव्हतें.

राजा— तुम्हांस ठाऊक आहे? मी इच्छितों कीं, हा माझ्या राज्याचा स्तंभ, माझा विश्वासू सेवक, आणि माझ्या मुलांचा मित्र करून ठेवावा—कीं जो एकाद्या दिवशीं प्रसंग पडला असतां आपल्या बापाप्रमाणें राज्याच्या कल्याणार्थ प्राण खर्च करील!

---

## प्रवेश १५.

### राजा, सगुणाबाई, अंतिक आणि खिजमतगार.

सेवक—महाराज, विनंति आहे, बाहेर राजशाळागुरु आले आहेत.

राजा— त्यांस आंत येऊं दे. बाई, माझ्या मनांत आहे तें मी आतां तुमच्यासमक्ष करितों, तुम्हांला तें रुचावें मात्र.

---

## प्रवेश १६.

### राजा, सगुणाबाई, अंतिक आणि राजशाळागुरु.

गुरु— (नमस्कार करतो.) महाराजांची आज्ञा ऐकायास सिद्ध आहें.

राजा—बहुत संतोष झाला. बोलाविलें होतें इतक्याकरितां कीं, राजशाळेंत थोरांचीं मुलें तुम्हांस काय देत असतात?

गुरु–थोरांचीं मुलें महाराज? तें आईबापांच्या थोरपणावर आहे.

राजा— असो, पण तुम्ही काय घ्याल तें सांगावें?

गुरु— सहाशें रुपये वर्षास; महाराजांची आज्ञा झाल्यास.

राजा— बरें तर. हा मुलगा तुमच्या स्वाधीन करायास मी इच्छितों. ह्यास बाप नाहीं, म्हणून मी ह्यास बापाच्या जागीं झालों आहें, त्या अर्थी ह्यास जें पाहिजे तें सर्व मी पुरवीन. पण प्रथम मला सांगा कीं, मुलांच्या चौकशीवर कोण असतो; कां कीं, तें मुख्य पाहिलें पाहिजे.

**गुरु**—वेगवेगळाले उपगुरु आहेत महाराज.

**राजा**—ते मला वाटतें कीं, आपआपल्या कामास योग्य असेच असतील; पण मी त्यांस ओळखीत नाहीं. माझा सर्व भरंवसा तुम्हांवर आहे. तुम्ही माझ्या खातरीस उतरलां आहां, म्हणून कृपा करून तुम्हीं स्वतः ह्या मुलाचें सर्व कांहीं पहावें.

**गुरु**—जशी आज्ञा.

**राजा**—मी आज्ञा म्हणून नाहीं सांगत; तुम्हीं संतोषानें हें कबूल करावें.

**गुरु**—महाराजांचा ज्यांत संतोष तेंच मीं करावें. त्यांतच माझें कल्याण.

**राजा**—मी तुमचा आभारी होईन. (अंतिकास हातीं धरून) माझ्या मुला, ये. हे गुरु पाहिलेना? हे बहुत शांत आणि सज्जन आहेत; तूं ह्यांजसंगतीं जाऊन ह्यांकडे रहा; आणि चांगला विद्याभ्यास कर.

**अंति०**—(पळभर गुरूच्या तोंडाकडे पाहून) होय महाराज.

**राजा**—पण हे तुझे हितकर्ते असें तूं ह्यांस मान. ह्यांच्या वचनावेगळा चालूं नको. ह्यांची मोटी मर्यादा ठेव; आणि जर का ह्यांनीं तुझी फिर्याद आणली—

**अंति०**—त्याविषयीं महाराजांनीं निश्चित असावें.

**राजा**—कांकीं आतांच तुझ्या दृष्टीस पडलें कीं, मी जसा गुणवानास चांगला, असाच दुर्गुणी लोकांस वाईट आहें! तुझा यत्किंचित् बोभाट ऐकिला असतां—हो.

**अंति**—(मोठ्या नम्रतेनें गुरूस नमतो.) गुरुजी, तुम्हीं मजवर रागावाल असें मी कधीं करणार नाहीं.

**राजा**—हें मुलगें तुम्हांस कसें वाटतें?

**गुरु**—महाराज, आपला वरद हस्त ज्याच्या माथां त्यास काय पहायाचें आहे? मी ह्याला आपल्या मुलाप्रमाणें वागवीन.

**राजा**—बरें तर; ह्याला घेऊन जा. बाई ह्या गोष्टीची तुम्हांस कांहीं अडचण नाहीं मला वाटतें?

सगु०—हे भगवान! अडचण महाराज?

राजा—जा तर माझ्या प्रियकरा; आणि कधीं सदाचरण, सचवटीचा मार्ग सोडूं नको. तुला कोणत्याही गोष्टींचें मी उणें पडूं देणार नाहीं. पण तूं मला खिन्नसा दिसतोस?

अंति०—(राजाचा हात धरितो.) ईश्वर आपल्यास सर्व सुखें देऊ!

राजा—(कोमल अंतःकरणानें) आणि तुलाही तशींच देऊ; आणि तुझें कल्याण करू माझ्या मित्रा! अहा! त्याचें हृदय किती दाटलें आहे! (गुरूस) आतां तुम्हीं ह्याला घेऊन जावें, आणि (सगुणाबाईस) बाई तुम्ही ह्यांबरोबर जावें, आणि तुमचा मुलगा राहणार तें स्थळ पहावें.

सगु०—(साष्टांगनमस्कार घालिते.) महाराजांचे उपकार—मी काय—(तिचा गळा दाटला, अश्रूंचे लोट चालले, तिच्यानें बोलवत नाहीं.)

राजा—तुम्ही काय करितां हें बाई? हें मला आवडत नाहीं.

सगु०—मला हे पाय—

राजा—(तिला बलात्कारानें उठवितो.) माझे माते, तूं मला इतका थोरपणा देऊं नको. ऊठ, उभी रहा.

सगु०—(उठते.) बरें तर मी आतां निरोप घेतें. (वर हात करिते.) मी हें असें नित्य देवाकडे करीत जाईन, आणि आपणांसारिखे उदार, दीनदयाळ ह्यांचें सदा कल्याण असो म्हणून त्यापाशीं प्रार्थना करीन.

राजा—(तिला चार पावलें पोहोंचवितो.) यावें बाई, तुमचें देव बरें करू.

(सर्व निघून जातात.)

**समाप्त.**

